# टिळक-भारत




—शि. ल. करंदीकर

# टिळक-भारत

लेखकः
## शिवराम लक्ष्मण करंदीकर
'सावरकर-चरित्र' व 'पाकिस्तानचें संकट'
*या पुस्तकांचे कर्ते.*




प्रथमावृत्ति

१ ऑगस्ट १९४४ ] ☆ [ किंमत ४. रुपये

# स्वगत

" य. गो. जोशी प्रकाशन " म्हणून लोकमान्यांच्या २४ व्या पुण्यतिथीचे दिवशीं त्यांचें हें चरित्र प्रसिद्ध करण्याचा योग येत आहे याबद्दल माझ्या मनाला होणारा आनंद शब्दांनीं व्यक्त करतां येत नाहीं. आणि शिवाय 'लोकमान्य चरित्रकार' म्हणून मला माझे स्नेही श्री. शि. ल. करंदीकर हे लाभले याबद्दल मी माझें स्वतःचेंच अभिनंदन करतों.

या चरित्रप्रकाशनाची कल्पना उशिरा सुचूनहि–चरित्र-लेखन संपलें गुरुवार ता. २७ जुलै १९४४ रोजीं रात्रीं आणि आज प्रत बाजारांत विक्रीस येत आहे. राजगुरु प्रेस, त्यांतील मॅनेजर गानू, महाजन, कंपॉझिटर औंधळे–यांचे साहाय्यक, बापू बायंडर, ब्लॉकमेकर मोघे, आर्टिस्ट जे. बी. दीक्षित, आंतील फोटोचें काम घाईनें पुरें करणारे माझे हार्दिक स्नेही श्री. यशवंतराव गद्रे–दादुआण्णा रानडे, माझे धंद्यांतील सहकारी श्री. रा. यं. पटवर्धन–वाचकांना कदाचित् या आभार-प्रदर्शनाचें कांहींच वाटणार नाहीं–पण ज्याचे घरीं कार्य असतें त्यालाच या मंडळींचें खरें कौतुक आणि तें व्यक्त करण्यांतला खरा आनंद !

या पुस्तकांत वापरलेले कांहीं छायाचित्रांचे ब्लॉक चित्रशाळेचे मॅनेजर दादुअण्णा जोशी–केसरीचे व्यवस्थापक यांनीं दिले–तसेंच लोकमान्यांचे फोटो वगैरे लागले तें साहित्य त्यांचे पौत्र श्री. जयंतराव टिळक यांनीं दिलें आणि पुण्याच्या डेक्कन पेपर मिल्चे–श्री. मोडक–भावे–बाबुराव वैद्य यांनीं कागद दिला–वाचकांच्या व माझ्या वतीनें त्यांचे आभार.

" लोकमान्यांचीं इतकीं चरित्रें असतांना आणखी या चरित्राची जरूरी काय ? " या शंकेनें व्याकुल झालेल्या माझ्या कांहीं मित्रांना अभिवादन करून—

य. गो. जोशी प्रकाशन
६९३/१५ सदाशिव, पुणें २.
१ ऑगस्ट १९४४

सर्वांचा कृपाभिलाषी
यशवंत गोपाळ जोशी.

# स म र्थ न



वादविवेचन मालेतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांत 'हिंदुत्व' या ग्रंथाचा समावेश करण्याचें ठरविल्यावर, त्या मालेचे प्रवर्तक, प्रसिद्ध लघुकथालेखक श्री. यशवंत गोपाळ जोशी यांनी तो ग्रंथ लिहिण्याबद्दल मला सुचविलें. त्यांची विनंति मान्य करून मी 'हिंदुत्व' या विषयाचा अभ्यास करण्यासाठीं ग्रंथ वाचू लागलों. वाचन सुरू झाल्यावर मला असें आढळून आलें कीं स्मृतिग्रंथ, महाभारतासारखे इतिहासग्रंथ, हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास इत्यादि विषयांचा नीट अभ्यास केल्याशिवाय हा ग्रंथ मनाजोगा लिहिता येणार नाहीं. ग्रंथ पुरा करण्याला वर्ष-दोन वर्षांची सवड असती तर, अभ्यास करून मीं तो ग्रंथ लिहिलाहि असता; पण ग्रंथ निश्चित कालमर्यादेंत लिहिला जावा अशी अपेक्षा होती. त्यामुळें, मनांत असूनहि मला श्री. जोशी यांची विनंति मान्य करता आली नाहीं. ही गोष्ट माझ्या मनाला लागून गेली. श्री. जोशी यांच्या-करिता दुसरें कोणतें तरी पुस्तक लिहून, आपण त्यांना दिलेला शब्द अंशतः तरी पाळावा असें पुष्कळ दिवस मनांत होतें. पुढें मे महिन्यांत श्री. जोशी यांनीं 'टिळक चरित्र' लिहिण्याबद्दल माझ्याशीं बोलणें सुरू केलें. १ ऑगस्ट १९४५ रोजीं राष्ट्रगुरु बाळ गंगाधर टिळक यांच्या निधनाला पंचवीस वर्षें पुरीं होत असल्यामुळें, त्या दिवशीं प्रसिद्ध करण्याच्या हेतूनें टिळक-चरित्र लिहावें हा विचार तत्पूर्वी कांहीं दिवस माझ्या मनांत घोळत होता. त्यामुळें मीं श्री. जोशी यांच्या म्हणण्याला मान्यता दिली. पुस्तकाच्या लेखनाचें काम प्रत्यक्ष सुरू करण्याला अनेक कारणांमुळें मे महिना प्रतिकूल ठरला. आज प्रसिद्ध होत असलेल्या या पुस्तकाविषयीं मूळ कल्पना पुष्कळच मर्यादित असल्यामुळें, महिना-भरांत पुस्तक सहज पुरें होईल, अशी माझी समजूत होती. दि. १५ जूनच्या सुमारास मीं लिहिण्याच्या कामाला हळूहळू सुरवात केली. प्रत्यक्ष लिहूं लागल्या-वर असें दिसलें कीं, टिळकांचें चरित्र कितीहि मर्यादित स्वरूपांत लिहावयाचें म्हटलें तरी, तें दोनशें पानांच्या आसपास संपविणें कठीणच आहे. श्री. जोशी यांना मीं ही अडचण सांगितली. चरित्र थोडें मोठें झालें तरी हरकत नाहीं असें त्यांनीं सांगितलें, आणि त्यानंतर, १ जुलैच्या सुमारास या पुस्तकाच्या,

लेखनाला खऱ्या अर्थाने प्रारंभ झाला. दि १ ऑगस्टला पुस्तक प्रसिद्ध करावयाचेंच असा श्री. जोशी यांचा निर्धार असल्यामुळें, पुस्तकाच्या लेखनाचें काम पुष्कळच जल्दीनें संपवावें लागलें यामुळें पुस्तकात काहीं किरकोळ दोष राहिले असले तर, वाचकांनीं त्याच्याकडे दुर्लक्ष करावें, अशी विनंति आहे.

इंग्रजी शाळांतून शिकणारे वरच्या वर्गांतले विद्यार्थी, इंग्रजी मुळींच न शिकलेले मराठी वाचक, थोडेफार इंग्रजी शिकलेल्या महाराष्ट्रीय स्त्रिया अशा वाचकवर्गाला टिळकांचें चरित्र समजून घेण्याची इच्छा झाली तर, समग्र पण आटोपशीर असें चरित्र मराठींत उपलब्ध नाहीं, हें मला माहीत होतें. अशा वाचकवर्गासाठीं एकादें 'टिळक-चरित्र' मराठींत पाहिजे, असें श्री. जोशी यांनीं मला म्हटलें. मी हें पुस्तक अशा वाचकवर्गासाठींच मुख्यत. लिहिलें आहे. राजकारणातील गहन तत्त्वें, पूर्वीच्या काळीं गाजलेल्या राजकीय अगर सामाजिक वादाचे तपशील, इत्यादि विषयांच्या ऊहापोहात शिरण्याची अशा वाचकाची सामान्यत. प्रवृत्ति नसते. चरित्र नायकाच्या जीवनातील महत्त्वाचे प्रसंग कळावे, अशी त्याची अपेक्षा असते हे महत्त्वाचे प्रसंग सभोंवतालच्या परिस्थितींत गुंफून त्याचें सुबोध भाषेंत विवेचन व्हावें, इतकीच या वाचकाची प्राय. मागणी असते आज प्रसिद्ध होत असलेल्या या पुस्तकामुळें ही अपेक्षा पुष्कळशी सफल होईल, असा माझा अंदाज आहे.

मी हें चरित्र लिहीत आहें असें माझ्या परिचयाच्या कित्येक सद्गृहस्थाना कळल्यावर, 'मराठींत टिळक-चरित्रें आहेत, फिरून कशाला लिहिता' असा प्रश्न त्यांनीं मला विचारला. टिळकांच्या मृत्यूपूर्वी लिहिलें गेलेलें त्यांच्या संबंधींचें चरित्रात्मक वाङ्मय, त्यांच्या मृत्यूनंतर गेल्या चोवीस वर्षांत प्रसिद्ध झालेलें याच स्वरूपाचें वाङ्मय या सगळ्याचा एक महोदधीच आहे, ही गोष्ट मला माहीत आहे. टिळकांच्या पहिल्या श्राद्ध दिनाच्या प्रसंगींच– म्हणजे दि. १ ऑगस्ट १९२१ रोजीं–माझे मित्र श्री वामन त्रिंबक आपटे व कै. गंगाधरपंत लेले या दोघांनीं टिळकांचें चरित्र प्रसिद्ध केलें तेव्हापासून आजपर्यंत टिळकांचीं अनेक चरित्रें मराठींत लिहिलीं गेलीं आहेत येवलें येथील श्री आपटेगुरुजी, पुण्याचे श्री. दा. न. शिखरे यांनीं लिहिलेलीं चरित्रें आटोपशीरहि आहेत. साहित्यसम्राट् तात्यासाहेब केळकर यांनीं जवळजवळ दोन हजार पानें होतील एवढें निबंधात्मक विस्तृत टिळक-चरित्र साधार लिहिलें आहे श्री. आठल्ये यांनीं इंग्रजींत लिहिलेलें टिळक-चरित्रहि वाचनीय आहे. दे भ स वि.

नित्यं' या नियमानुसार वागण्याची टिळकांची हातोटी बापटांनींहि उचलली असल्यामुळें, त्यांनीं माझ्या हस्तलिखित प्रकरणांवर पसंतीचा छाप मारला!

टिळक-चरित्रें खूप झालीं असें म्हणणारी मंडळी चरित्र आणि चरित्र-साधनें यांतला भेद नीटसा ओळखीत नाहींत, असें म्हणणें प्राप्त आहे. श्री. बापट यांनीं संपादिलेल्या 'आठवणी व आख्यायिका' हें एक बहुमोल चरित्र-साधन आहे. कै. दादासाहेब खापर्डे यांच्या आन्हिकींतल्या महत्त्वाच्या नोंदी मिळवितांना श्री. बापट यांना किती श्रम करावे लागले असतील याची मला स्वानुभवावरून थोडीशी कल्पना आहे. अशा नोंदी हेंहि एक महत्त्वाचें चरित्र-साधन आहे. 'लोकमान्य टिळक यांचें चरित्र' या ग्रंथराजाच्या उत्तरार्धाचे दोन खंड सजवितांना श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं प्रकरणाप्रकरणांतून टिळकांनीं केलेला व टिळकांशीं इतरांनीं केलेला महत्त्वाचा पत्रव्यवहार प्रसिद्ध केला आहे. असला पत्रव्यवहार हें चरित्रलेखनाचें एक बहुमोल साधन आहे. चिरोलकेसमधील टिळकांचे बॅरिस्टर सर जॉन सायमन यांनीं लिहिलेलें एक आत्मचरित्रात्मक पुस्तक प्रसिद्ध झाल्याचें वृत्त अलीकडे प्रसिद्ध झालें आहे. त्यांत टिळकचरित्राला साधनीभूत होणारा कांहीं मजकूर आढळेल, असें दिसतें. अशा व अशा प्रकारच्या विविध साधनांचें रसायन म्हणजे चरित्रग्रंथ. अशीं साधनें निर्माण होण्याचें काम जोंपर्यंत चालत राहील, तोंपर्यंत टिळकचरित्ररूपी रसायन पुनःपुनः सिद्ध करण्याचें काम थांबण्याचें कांहीं कारण नाहीं, असें मला वाटतें.

छत्रपति शिवाजीमहाराज, नेपोलियन, बिस्मार्क, रानडे, टिळक यांच्यासारख्या युगकर्त्या पुरुषोत्तमांचीं चरित्रें कितीहि तयार झालीं तरी त्यांचीं नवीं नवीं चरित्रें निर्माण होण्याची अवश्यकता उरतेच! श्री. केळकर यांनीं जसें टिळक-चरित्र लिहिलें तसेंच दे. भ. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांनींहि जर टिळकचरित्र लिहिलें तर तें अवश्य आहे. श्री. स. वि. बापट यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'आठवणींत' खाडिलकरांच्या आठवणी मुळींच आलेल्या नाहींत. त्यामुळें क्षणभर असाहि भास होतो कीं, स्वतःच टिळकचरित्र लिहिण्याचा विचार काकासाहेब खाडिलकर यांच्या मनांत घोळत असावा. काकासाहेब आतां थकून गेले आहेत; पण, श्री. न. र. फाटक, यशवंतराव खाडिलकर अशा जाणत्या नि आस्थेच्या माणसांना मदतीला घेऊन ते अजूनहि टिळक-चरित्र लिहितील तर, महाराष्ट्र त्या चरित्राचें उत्सुकतेनें स्वागतच करील.

राष्ट्रगुरु लोकमान्य टिळक यांचे पौत्र

( कै० श्रीधरपंत अर्थात बापुराव यांचे चिरंजीव )



चि. श्रीकांत नि श्री. जयंतराव बी. एस्‌सी.

यांना

त्यांच्याशीं समवयस्क असणाऱ्या महाराष्ट्रीय

तरुणांचे प्रतिनिधि म्हणून

सप्रेम समर्पण

अशा अनेक पुरुषांकडून आपापल्या माहितीच्या आधारें टिळक-चरित्र लिहिलें जाणें अवश्य होतें व आहे; कारण, टिळक ही विभूतीच इतकी अनेकांगी होती कीं, कोणाहि एका माणसाला तिच्या सर्वांगीण चरित्राचें आकलनच करतां आलें नसतें. दिवंगत धोंडोपंत विद्वांस यांनी प्रयत्न करून टिळक-चरित्र लिहिलें असतें तर, त्याचा रस कांहीं वेगळाच उतरला असता! आणि, टिळकांचे परम मित्र रसिकश्रेष्ठ विद्वद्वर्य कै. दादासाहेब खापर्डे यांनी आपल्या उतारवयांत टिळक-चरित्र लिहिलें असतें तर, त्या ग्रंथामुळें मराठी भाषेचें ऐश्वर्य किती तरी पटीनें वाढलें असतें. टिळकांच्या निकट सान्निध्यांत रहाण्याचें भाग्य ज्यांना दीर्घकाळपर्यंत लाभलें अशी पुष्कळ मंडळी सुदैवानें अजूनहि आपल्यांत आहेत. ही मंडळी मनांत आणतील आणि टिळक-चरित्र रंगवितील तर, टिळक-चरित्राचा बोध करून घेण्यासाठीं उत्सुक असलेल्या माझ्यासारख्या माणसाला आनंदच वाटेल.

टिळकांचीं कितीहि चरित्रें लिहिलीं गेलीं तरी तीं हवींच आहेत हें वाचकांना पटावें एवढ्याच हेतूनें या सर्व गोष्टी सांगितल्या. प्रस्तुत चरित्र अगदीं मर्यादित हेतूनें लिहिलेलें आहे, हें सांगून झालेंच आहे. या चरित्राला विवेचनात्मक भाग मुळींच जोडलेला नाहीं, याचें कारण उघड आहे. चरित्रच अशा भूमिकेवरून लिहिलेलें आहे कीं, कोणत्याहि मुद्द्याचें विवेचन वाचकाला अवश्य वाटणार नाहीं. टिळकांच्या आयुष्यांतील अनेक महत्त्वाच्या प्रसंगीं उपस्थित असलेल्या व्यक्तींनीं जें पाहिलें, जें ऐकिलें जें म्हटलें किंवा जें अनुभविलें तें प्रायः त्यांच्याच शब्दांत सांगण्यांत आलेलें असल्यामुळें, कोणत्याहि गोष्टीची अधिक चिकित्सा होण्याची अवश्यकताच उरणार नाहीं, असें वाटतें. मराठी पांचसहा इयत्तांचेंच ज्यांचें शिक्षण झालेलें आहे, अशाहि माणसांना चरित्र समजावें, त्यांतील मर्म कळावें आणि चरित्रनायकाच्या अंगीं असलेल्या अनेक लोकोत्तर गुणांचा ठसा त्यांच्या मनावर उमटावा इतक्या बेतानें चरित्र लिहिलेलें र हे. वाचकांना फार खोल पाण्यांत न्यावें या हेतूनें चरित्र लिहिलेलें नाहीं.

पुस्तकाच्या छपाईच्या कामाला सुरवात करीपर्येत पुस्तकाचें नांव 'टिळक-चरित्र'. [illegible] टिळकचरित्रांनीं या परिचित नांवावर आपला अधिकार पूर्वींच प्रस्थापित करून ठेवला असल्यामुळें, दुसरें कांहीं तरी नांव द्यावें असा विचार मनांत

पूर्वकच व्हावयाला पाहिजे. मी केलेली निवड अयोग्य आहे, असें कोणी म्हणेल हें शक्य वाटत नाहीं. टिळकांचे नातु या दृष्टीनें तर ही निवड योग्यच आहे; पण ज्या तरुण पिढीसाठीं हें सुटसुटीत पुस्तक मुद्दाम लिहिलें जात आहे त्या पिढीचे प्रतिनिधि म्हणूनहि ही निवड यथार्थ आहे, असें मला वाटतें. पंधरा ते पंचवीस वर्षें वयाच्या महाराष्ट्रीय तरुणांनीं निदान एवढें तरी टिळक-चरित्र वाचावें आणि टिळकांनीं जन्मभर आचरिलेला कर्ममार्ग आचरण्याचा या वयांतच त्यांनीं निर्धार करावा, अशा हेतूनेंच हें पुस्तक लिहिलें आहे. श्री. जयंतराव टिळक व त्यांचे बंधु यांनीं पुस्तकाच्या अर्पणाच्या बाबतींत माझा जो हेतु होता त्याला हरकत घेतली नाहीं, याबद्दल मी त्यांचे आभार मानिले तर ती गोष्ट त्यांना पसंत पडणार नाहीं, हें मला माहीत आहे; पण, या बाबतींत त्यांच्या नापसंतीकडे दुर्लक्ष करणें, हेंच माझें कर्तव्य आहे.

हें पुस्तक इतक्या अल्पावधींत माझ्या हातून लिहून झालें याचें सर्व श्रेय श्री. यशवंतराव जोशी यांना आहे. त्यांचा नेट मागें लागलेला नसता तर, माझ्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें हें काम कांहींसें लांबलें असतें; पण, काम वेळेवर संपून मीहि पुढील उद्योगाला मोकळा झालों याचें जितकें समाधान वाटतें तितकेंच टिळकांच्या पुण्यतिथीच्या स्फूर्तिदायक प्रसंगीं हें पुस्तक वाचकांच्या हातीं देता आलें, यामुळेंहि मला समाधान वाटत आहे. हस्तलिखित तयार करण्यासाठीं श्री. रा. शं. पटवर्धन हे रात्रीअपरात्रीं तत्पर-तेनें आले नसते तर हें काम वेळेवर उरकलें नसतें, हें उघड आहे; म्हणून श्री. पटवर्धन यांचेहि आभार मी कर्तव्यबुद्धीनें मानतों.

येनास्य पितरो याता येन याताः पितामहाः
तेन यायात्सतां मार्गं तेन गच्छन्न रिष्यते ॥

या वचनावर विश्वास ठेवून, हें पुस्तक वाचणारे महाराष्ट्रीय तरुण टिळकांचें आदर्श जीवन दृष्टिसमोर ठेवितील अशी आशा व्यक्त करून, हें पुस्तक मी वाचकांच्या स्वाधीन करतों.

सदाशिव पेठ, पुणें.
दि. ३०-७-४४.

शिवराम लक्ष्मण करंदीकर



# टिळक–सारत

## अनुक्रमणिका

मुल्लरकडून ऋग्वेद ग्रंथाची भेट : विठ्ठल छापखान्याचे इमारतीला आग : टिळकांच्या सुटकेची वाटाघाट : टिळकांची सुटका (पृ. १०६).

'पर्व सातवें : 'पुनश्च हरिः ॐ' : पृष्ठें १०६ ते १३१

सिंहगडावर विश्रांति–चाफेकरप्रकरणाची निरवानिरव : टिळकांनीं केसरीचें डिक्लेरेशन केलें (पृ १०९) मद्रासेंत महाराष्ट्रीयांची मेजवानी : टिळकांचा आशावाद–सीलोनपर्यंन्त सचार–द्रविड बंधूंचा खून–'ग्लोब' व 'टाइम्स' पत्रांची माफी–चाफेकर प्रकरणाची इतिश्री– (पृ. १११) लॉ क्लास कायमचा बंद–प्लेग पुनः सुरू–लस टोंचण्याचा वाद : कृष्णाजी आबाजी गुरुजी– टिळक लखनौ कॉंग्रेसला गेले–कलकत्त्याहून ब्रह्मदेशांत– छत्रे यांच्या सर्कशीचा ब्रह्मदेश व चीनमध्यें संचार–नाना फडणिसांच्या मृत्यूला शंभर वर्षें झालीं : वेळास येथें उत्सव : –शुद्ध पंचांगाच्या कार्याला चालना–सातारा येथें मुं इ. प्रां. परिषद : लॉर्ड सॅन्डर्स्ट यांचें सार्वजनिक स्मारक करण्याच्या प्रश्नावर खडाजंगी : वेदोक्तप्रकरणासंबंधीं टिळकांचे नेमके उद्गार (पृ. ११४) जाइल्ससाहेबाच्या धोरणांतील आक्षेपार्ह भाग–प्रो. मॅक्समुल्लरवरील मृत्युलेख–लाहोर कॉंग्रेसमध्यें भाषण–विसाव्या शतकाला सुरवात : न्या. मू. रानडे व राणी व्हिक्टोरिया यांचा मृत्यु–The Arctic Home in the Vedas ग्रंथाची जुळवाजुळव (पृ. ११६–११७) –ताईमहाराजांसाठीं दत्तकमुलाचा शोध : औरंगाबाद येथे दत्तविधान–दत्तकप्रकरण कोर्टांत गेलें–जमीनमहसूल कायद्याच्या दुरुस्तीवर टिळकांची टीका–कलकत्ता कॉंग्रेसमध्यें भाषण–'हिंदुधर्म'वर जाहीर व्याख्यान–स्वामी विवेकानंद व टिळक यांची भेट : 'माताजींच्या कन्याशाळे'ला भेट (पृ. १२२–२३) नागपुराध सभा व टिळकांना मानपत्र–केसरीचा आकार वाढविला–जपानची वाढती सत्ता व भारतीय नेत्यांनीं घ्यावयाचा बोध–ताईमहाराज दत्तकप्रकरणांत ॲस्टनचा निकाल (पृ. १२५)–फौजदारी गुन्ह्यांच्या चौकशीला सुरवात–हायकोर्टाकडून ट्रस्टींचे अधिकार कायम : फौजदारी खटल्याला सुरवात–प्लेगचा धुमाकूळ : विश्वनाथपंतांचा बळी (पृ. १२६–२७)–उमरावती औरंगाबाद मार्गांत दौरा–'डिफेन्स' तयार केला–प्रो. जिन्सीवाले यांचा मृत्यु– फौजदारी खटल्याचा निकाल : टिळकांना हातकड्या घातल्या (पृ. १२९) ताईमहाराजाचा मृत्यु–टिळक हायकोर्टांत निर्दोषी.

प्रथहि चाचले–सुटकातील अपलेलनाऱ्या मर्यादा–काँग्रेस निष्प्रभ झाली–दादासाहेब खापर्डे–टिळक भेट (पृ २१२)–टिळकांच्या मुक्ततेस लॉर्ड सिडनहॅम यांचा विरोध–गीतेवरील ग्रंथ लिहिण्याला प्रारंभ–टिळकांच्या पत्नीचा मृत्यु. टिळकांना असह्य आघात (पृ २१४, २१५)–गीतारहस्य लिहून संपलें–पॅ पेल्मचे टिळकांबद्दलचे उद्‌गार–शिक्षेचा समाप्तिसमय समीप येत चालला मंडालेंत जमविलेला ग्रंथसंग्रह परत पाठविण्याची व्यवस्था–मंडाले, रंगून, मद्रासवरून टिळकांना पुण्यास आणलें गायकवाड वाड्याचे दारात सुटका–नरसोपंतांबद्दल गौरवोद्गार.



टिळकांच्या मुक्ततेची वार्ता अपरात्रींच पुणेकरांना कळविली–टिळकांचें जाहीर स्वागत. टिळकांचें आश्वासन–गायकवाडवाड्यापुढें सरकारी पहारा–गीतारहस्याचें हस्तलिखित हस्तगत होण्याची चिंता–युरोपांत महायुद्ध सुरू झालें–टिळकांचें पत्रक (पृ. २२२)—गीतारहस्याचें हस्तलिखित सरकारकडून मिळालें–बेझंट यांच्या भेटीबद्दल टिळकांचें धोरण–काँग्रेसप्रवेशाच्या अटी. टिळक, बेझंट व गोखले यांच्या वाटाघाटी–मेथाकडून गोखले यांना कानमंत्र–गोखले यांचें गुप्तपत्र. टिळक-गोखले चर्चा–ना. गोखले यांचा मृत्यु (पृ. २२७)–'एम्डेन' जहाजाच्या हालचाली–पुण्यांत राष्ट्रीय पक्षाची परिषद–ताईमहाराज दत्तक-प्रकरणाचा प्रिव्ही कौन्सिलांत अनुकूल निकाल–'गीतारहस्य' प्रसिद्ध झालें. ग्रंथाची थोरवी



होमरूल लीगची चळवळ–फेरोजशहा मेथांचा मृत्यु–मुंबईची खेडची काँग्रेस काँग्रेसप्रवेशाची तयारी–'लीडर'च्या चिंतामणींची पुण्यास भेट–चिरोल प्रभृतींवरील फिर्याद दाखल झाली–लॉर्ड हार्डिंजचा गौरव–बेळगावची राष्ट्रीय पक्षाची परिषद. डॉ मुंजे यांचें मतपरिवर्तन–हिंदी स्वराज्यसंघाची स्थापना–आगरकरांचें पुण्यस्मरण (पृ. २४४)–टिळकांचा षष्ठ्यब्दिपूर्तिसमारंभ एक लाखाची थैली मानपत्र : टिळकांचें उत्तर (पृ २४५, २४६)–टिळकांवर जामिनाची नोटीस : हायकोर्टांत निर्दोषी–काँग्रेसचा सुधारणांचा मसुदा व लीगच्या मागण्या–ब्रिटनचे पंतप्रधान ॲस्क्विथ गेले, लॉईड जॉर्ज आले–गदगला टिळकांवर भाषणबंदी–लखनौ काँग्रेसला टिळकांचें प्रयाण. वाटेंत

# टिळक-भारत



पर्व पहिलें : : : बाल्य व विद्यार्थिदशा

> शिवाजी आणि टिळक जोंपर्यंत महाराष्ट्राच्या तरुणांत जागृत आहेत तोंपर्यंत महाराष्ट्रच हिंदी स्वराज्याचा प्रश्न सोडवील.
>
> —दिवंगत सर फेरोजशहा मेथा

एका प्रबळ नि परक्या राष्ट्राच्या पकडींत सांपडून पारतंत्र्याचें दुःख भोगीत असलेल्या आपल्या या प्राचीन, पवित्र नि संपन्न मायदेशाचा उद्धार व्हावा म्हणून अहर्निश धडपडणारे महात्मा गांधी, स्वातंत्र्यवीर सावरकर, पंडित जवाहरलाल नेहरू वगैरे थोर देशभक्त सुदैवानें आपल्यामध्यें वसत-वावरत आहेत. थोरांच्या प्रत्यक्ष दर्शनाचा तरुण मनावर जो ठसा उमटतो तो या देशभक्तांच्या दर्शनानें आपल्या मनावर उमटावा अशी तळमळ ज्यांच्या मनांत उसळत असेल त्यांना या महंतांचें दर्शन घेतां येईल. पण आज ज्या तरुण-तरुणी १५-२० वर्षांच्या वयाच्या आगेमागें असतील त्यांना अशाच एका थोर विभूतीचें प्रत्यक्ष दर्शन घडणेंहि शक्य नाहीं व घडलें असणेंहि शक्य नाहीं. लोकमान्य टिळक १९२० सालीं इहलोक सोडून गेले. त्या वेळीं, आज तरुण असलेल्या कित्येकांचा जन्महि झाला नसेल; आणि कित्येकांचा जरी जन्म झालेला असला तरी, त्या थोर देशभक्ताच्या दर्शनाचा योग त्यांना साधला असे प्रायः कोणीहि नसतील! आपली परिस्थिति, आपलें सामर्थ्य, आपलें बुद्धिबळ या सर्वांचा आवांका ओळखून या देशांतल्या प्रत्येक सुशिक्षित तरुण-तरुणीनें देशोद्धारासाठीं अहर्निश कांहीं तरी करीत राहिलें पाहिजे हें कर्मयोगी टिळकांच्या आयुष्याचें सार असल्यामुळें, महाराष्ट्रांतल्या तरुण-तरुणींनीं

या वयातच लोकमान्यांच्या जीवनकार्याचा परिचय करून घ्यावा हें इष्ट व अवश्यहि आहे.

लोकमान्य टिळकांच्या जीवनकार्याचें वर्णन करणाऱ्या त्यांच्या एका प्रतिपक्षीयानें त्यांना उद्देशून Father of Indian Unrest (भारतांतील असंतोषाचे आद्यप्रवर्तक) हे शब्द वापरले आहेत. हे शब्द अगदीं यथार्थहि आहेत. पण, या शब्दाचा स्वीकार करतांना एक मुद्दा अवश्य लक्षांत ठेविला पाहिजे. नव्या धर्तीच्या व नव्या पद्धतीच्या स्वातंत्र्यानें आपला हा मायदेश संपन्न व्हावा ही महत्त्वाकांक्षा देशभर पसरविणाऱ्या टिळकांनीं तत्कालीन राजकीय परिस्थिती-विरुद्ध लोकांचीं मनें प्रक्षुब्ध केलीं. या अर्थानें ते भारतांतल्या राजकीय असंतोषाचे आद्यप्रवर्तक ठरतात हें खरें आहे; पण, या देशांत नांदूं लागलेल्या परकीय राजसत्तेविरुद्ध टिळकांपूर्वी असंतोष उद्भवलाच नव्हता अगर व्यक्त झाला नव्हता असा अर्थ या वर्णनपर शब्दांतून कोणी काढूं पाहील तर तो मात्र बरोबर ठरणार नाहीं! नवें स्वराज्य मिळवावयाचें आहे व इंग्रज तें देत नाहींत, या जाणिवेच्या पोटीं जो असंतोष निर्माण झाला त्याच्या प्रवर्तनाचें महत्कार्य टिळकांनीं केलें; पण, असलेलें स्वराज्य इंग्रजांनीं हिरावून घेतलें या जाणिवेच्या पोटीं जो असंतोष निर्माण झाला होता त्याचा स्फोट टिळकांच्या कार्यकर्तृत्वाला सुरवात होण्याच्या आधींच देशभर ऐकूं आला होता व विरामहि पावला होता! २३।७।१८५६ ला रत्नागिरी शहरांत टिळकांचा जन्म झाला व त्यानंतर आठ-दहा महिन्यांतच—म्हणजे १०।५।५७ रोजीं—मिरत येथील हिंदी सैनिकांनीं ब्रिटिश राजसत्तेविरुद्ध उठावणी केली! टिळक गर्भावस्थेंत होते त्याच वेळीं या सत्तावनच्या क्रांतियुद्धाची ऊर्मीहि गर्भावस्थेंत होती. गेलेलें स्वराज्य व टिळकांचा जन्मकाळ यांच्यामध्यें सरासरी चाळीस वर्षांचेंच अंतर होतें. मिळवावयाच्या स्वराज्याचीं साधनें कोणतीं या प्रश्नाच्या उत्तराच्या बाबतींत टिळकांच्या बुद्धीचा ठाम निश्चय असल्याचें त्यांच्या चरित्राच्या परिशीलनावरून स्पष्ट होतें. याचें एक कारण हेंहि असावें कीं, उपभोगलेलें स्वराज्य व टिळकांचा जन्मकाळ यांमध्यें फारसें अंतर नाहीं! स्वराज्य उपभोगूं पाहणारी पिढी उपभोगलेल्या स्वराज्यापासून जसजशी दूर दूर सरकते तसतसा, स्वराज्यप्राप्तीच्या उपायांविषयींचा गोंधळ तिच्या मनांत वाढण्याचा संभव असतो! टिळकांच्या व त्यांच्या पूर्वींच्या

पिढींतलीं जाणतीं माणसें उघडपणें लिहितांबोलतांना कांहींहि म्हणालीं असलीं तरी, स्वराज्यप्राप्तीचे खरे व प्रभावी मार्ग कोणते याबद्दल त्यांच्या विचारांत गोंधळ नव्हता!

श्रीशिवछत्रपतींनीं प्रस्थापित केलेल्या स्वराज्याच्या राजधानीवर— रायगड या प्रसिद्ध किल्ल्यावर— १० मे १८१८ रोजीं इंग्रजांचें यूनियन जॅक फडकूं लागलें! या तिथीपासून टिळकांच्या जन्मतिथीपर्यंतचा सुमारें चाळीस वर्षांचा काळ पाहिला तर असें दिसून येतें कीं, नवी राज्यव्यवस्था, नवें शिक्षण इत्यादींचा प्रसार महाराष्ट्रांत हळूहळू होत होता. या नव्या व्यवस्थेचा नीटसपणा पाहून माणसांचीं मनें मोहाविष्ट होत होतीं हें खरें; पण या मोहजालांतून बाहेर पडण्याविषयींची कल्पनाहि कोणाच्या मनांत उद्भवत नसेल, असें कसें म्हणतां येईल? समाजाचें नेतेपण ज्यानें स्वाभाविकपणें पत्करावयाचें तो जुना सरदारवर्ग अवकळेनें ग्रस्त होत चालला होता. नव्या पद्धतीच्या अत्यल्प शिक्षणाच्या आधारावर अधिकारसंपन्न होणारा व सुस्थितींत नांदणारा समाजांतला वर्ग कांहींसा उच्छृंखल बनत होता. स्वत्वाचें विस्मरण, स्वीय संस्कृतींत कांहीं टिकविण्याजोगें असूं शकेल याविषयींचें अज्ञान, स्वार्थापलीकडे जाऊन कांहीं करावयाला पाहिजे यासंबंधींची अनास्था इत्यादि दोष समाजांत या काळांत नांदत होते हें खरें; पण या सर्व अनिष्ट प्रवृत्तींना धक्का देणारीं चार तरी ठळक माणसें या काळांतच पुढें येत होतीं हेंहि ध्यानांत ठेवलें पाहिजे. विष्णुबुवा ब्रह्मचारी, ज्योतिबा फुले, लोकहितवादी व न्यायमूर्ति रानडे या सर्वांचें तारुण्य या काळांतलेंच आहे हें विसरून चालणार नाहीं. टिळकांचे वडील गंगाधरशास्त्री हेहि याच काळांत आपल्या संसाराची व्यवस्था सांवरीत होते.

टिळकांचा जन्म झाला त्या सुमारास गंगाधरशास्त्री रत्नागिरी येथें रहात होते. परिस्थितीच्या प्रतिकूलपणामुळें गंगाधरपंतांना इंग्रजी शिकतां आलें नाहीं व विशीच्या वयांतच त्यांना मराठी शाळेंतल्या शिक्षकाची नोकरी पत्करावी लागली. रत्नागिरीस येण्यापूर्वी गंगाधरपंतांनीं मालवण, चिपळूण वगैरे ठिकाणीं नोकरी केली होती. ते रत्नागिरीस बदलून गेले त्या वेळीं त्यांना दरमहा पंचवीस रुपये पगार मिळूं लागला. यापूर्वींच गंगाधरपंत संसारी बनले होते. त्यांच्या पत्नीचें नांव पार्वतीबाई. गंगाधरपंतांचा पगार बेताचा होता हें खरें; पण, त्यांची राहणी व्यवस्थित होती. कर्जबाम न करतां, असेल त्या प्राप्तींत

व्यवस्थित संसार चालवावयाचा हें दुसऱ्या रीतीचें वळणच होतें. इतिहास, व्याकरण, गणित वगैरे विषयांची शालोपयोगी पुस्तकें लिहून गंगाधरपंत आपल्या प्राप्तींत भर टाकीत असत. त्यामुळें गंगाधरपंतांचा संसार टाकटिकीनें चालला होता. गंगाधरपंतांचें संस्कृतचें अध्ययनहि चांगलेंच झालेलें होतें. या सुमारास प. वा. डॉ. रामकृष्णपंत भांडारकर हे नोकरीच्या निमित्तानें रत्नागिरीस रहात होते. गंगाधरपंतांचें संस्कृतभाषेवरील प्रभुत्व भांडारकरांच्याहि आदराला पात्र होण्याइतक्या दर्जाचें होतें. गंगाधरपंतांच्या या विद्वत्तेमुळें समाजांत त्यांना 'गंगाधरशास्त्री' हा बहुमानदर्शक शब्दहि लावीत असे.

गंगाधरपंतांच्या पत्नी पार्वतीबाई यांना १८४६ सालीं पहिलें अपत्य झालें. या पहिल्या मुलीच्या पाठीवर आणखी दोन मुलीच झाल्या. पुत्रप्राप्ति व्हावी म्हणून या माउलीनें सूर्याची उपासना सुरू केली. या कडक उपासनेचें फल म्हणून आपल्याला पुत्रप्राप्ति झाली अशी या माउलीची श्रद्धा होती. या माउलीनें आपल्या मुलाचें नाव 'केशव' असें ठेविलें, पण 'बाळ' या लाडक्या नावानेंच ती त्याला संबोधूं लागली. हेंच नाव पुढें रूढ का झालें या प्रश्नाचें उत्तर देतांना लोकमान्य टिळक पुढें एकदा म्हणाले*, 'माझी मातुश्री तपस्विनी होती. पुत्रप्राप्तीस्तव तिनें वर्षदीडवर्ष सूर्याराधनाचें खडतर तप केलें होतें. तिनें प्रेमानें जें नांव ठेविलें व जें सर्वांनीं प्रचारांत आणलें, तेंच मी उपयोगांत आणूं लागलों.' सूर्य-उपासनेचें फळ म्हणून लाभलेलें हें पुत्ररत्न पुढें सूर्यासारखेंच तेजस्वी होईल असा विश्वास या तपस्विनीला वाटत असला तर ती गोष्ट साहजिकच आहे. तर्कबुद्धीनें विचार करणारे प्रो. केरूनाना छत्रे यांनींहि डेक्कन कॉलेजांत शिकत असलेल्या टिळकांच्या गणिती बुद्धीचें कौतुक करतांना पुढील उद्‌गार[1] काढलेच की नाहीं ! : 'त्या सूर्याच्या पिलाचा प्रभाव आतां नाहीं तुम्हां कोणास कळणार, पण, ऐन मध्यान्हकाळीं त्याचा प्रकाश कोणासहि सोसणार नाहीं, हें लक्षांत ठेवा.'

१८६६ सालांत गंगाधरशास्त्री यांची असिस्टंट डेप्युटी एज्युकेशनल

---

* आठवणी आणि आख्यायिका, खं. १ भा. २ : पृ. २०

१ - पृ. १८३

इन्स्पेक्टर या जागेवर बदली झाली व ते रत्नागिरीहून बदलून पुण्यास गेले. हे स्थित्यंतर होईपर्यंतचें टिळकांचें बालजीवन रत्नागिरी शहरांतच व्यतीत झालें. १८६१ सालीं दसऱ्याच्या मुहूर्तावर त्यांना शाळेंत घालण्यांत आलें रत्नागिरीस टिळकांचें शालेय शिक्षण झालें हें खरें; पण, त्यांचें या वयांतलें खरं शिक्षण घरीं गंगाधरशास्त्र्यांच्या मार्गदर्शनामुळेंच झालें, यांत संशय नाहीं १८६४ सालीं टिळकांची मुंज झाली; त्यापूर्वीच गणित, संस्कृत इत्यादि विषयांत त्यांची चांगलीच गति झालेली होती व ब्रह्मकर्मापैकीं पुष्कळसा भाग त्यांनीं पाठ करून टाकिला होता. या बालवयांतच टिळकांचें मन संस्कृत वाङ्मयाकडे किती ओढलें जात असे व या सुमारासहि टिळकांची गणित विषयांत किती प्रगति झाली होती हें दर्शविणारी एक आख्यायिका उपलब्ध आहे. गंगाधरशास्त्री बाणाची कादंबरी वाचताना किती तन्मय होतात हें बाळानें पाहिलें होतें. त्यामुळें तो ग्रंथ आपणहि वाचावा अशी त्याला इच्छा झाली. स्तोत्रपठण वगैरे गोष्टींत आपण जशी सहज मजल मारली तशीच या पुस्तकाच्या बाबतींतहि मारूं अशा विश्वासानें बाळानें पुस्तक मागितलें. मुलाच्या बुद्धीची ही झेंप पाहून गंगाधरशास्त्र्यांना कौतुकच वाटलें; पण, पुस्तक देतांना मुलाची परीक्षा पाहण्याचेंहि त्यांच्या मनांत आलें. बरेंचसें कठीण असें एक उदाहरण त्यांनीं निवडलें व 'हें सोडवून दाखव म्हणजे पुस्तक देतों' असें ते चिरंजीवांना म्हणाले. बराच वेळ झटून-झगडून बाळानें तें उदाहरण बरोबर सोडवून दाखविलें व वडिलांकडून पुस्तक व शाबासकी हीं दोन्हीं मिळविलीं !

गंगाधरशास्त्री रत्नागिरीस होते त्या काळांतच घडलेल्या एका घरगुती गोष्टीचा टिळकांच्या बालमनावर बराच संस्कार झाला असेल, असें वाटतें. संसाराचा भार चिरंजीवांवर सोंपवून गंगाधरशास्त्र्यांचे वडील रामचंद्रपंत हे उत्तरभारतांत गेले होते. कांहीं दिवस ते पेशव्यांकडे कोठी-कामगार होते. १८५७ ची धामधूम सुरू होण्याच्या सुमारास ते काशीक्षेत्रीं होते. त्यांचा संन्यास घेण्याचा विचार होता; पण, तो त्यांना तावडतोब अमलांत आणतां येईना. म्हणून ते काशीक्षेत्राहून रत्नागिरीस आले. इतक्या दुरून अवचित आलेल्या आजोबांना पाहून नातवाला जसें आश्चर्य वाटलें असेल त्याप्रमाणेंच आपल्या कुलदीपक नातवाला पाहून आजोबांनाहि संतोष वाटला असेल.

नानासाहेब पेशव्यांच्या संघर्षांची माहिती, पंढरपूरची हकीकत वगैरेचें कथन रामचंद्रपंत करीत असतील त्या वेळीं त्यांच्या बुद्धिवान् नातवानें तें कसें ऐकलें असेल व त्या ऐकण्यामुळें त्याच्या मनावर कोणते संस्कार उमटले असतील याविषयींची कल्पना लेखविणें फारसें अवघड नाहीं. रामचंद्रपंतांनीं कांहीं दिवस कोंकणांत घालविले व पिहून ते उत्तरभारताकडे वळले. संकल्पाप्रमाणें त्यांनीं संन्यासहि घेतला. पुढें ते काशीक्षेत्रांतच समाधिस्थ झाले.

नेटका संसार करणारे गंगाधरशास्त्री भोंवतालच्या मंडळींत मान्यता पावत त्याप्रमाणेंच भोंवतालीं होणाऱ्या घडामोडींत ते भागहि घेत. १८६२ सालीं रत्नागिरीचे कलेक्टर मि. क्रॉफर्ड यांनीं समाईक भांडवल गोळा करून रत्नागिरी येथें एक सुतारकामाचा कारखाना काढिला. या कारखान्यासाठीं गंगाधरशास्त्र्यांनीं एक हजार रुपये भांडवल पुरविलें होतें. हे पैसे पुढें बुडाले हें खरें; पण, अल्प प्राप्ति असूनहि गंगाधरशास्त्री किती व्यवस्थितपणें वागत असले पाहिजेत हें त्यांनीं पुरविलेल्या या रकमेवरून स्पष्ट होतें. घरांतल्या दैन्याची झळ लागल्यामुळें होतकरू मुलें खुरटतात व कोळपून जातात हें जसें खरें, त्याप्रमाणेंच हेंहि खरें कीं, घरांतल्या श्रीमंती डामडौलामुळें मुलें फुकट जातात. टिळकांना या दोन्ही अतिरेकांची बाधा झाली नाहीं, हें त्यांचें व हिंदुस्थानचें सद्भाग्य होय. स्वाभिमान गळून जावा अशा तऱ्हेचें दैन्यहि टिळकांच्या वांट्यास आलें नव्हतें; मिजास वाढावी व चोखले करण्यांत भूषण वाटावें अशी श्रीमंतीहि त्यांना लाभली नव्हती! स्वाभिमानी मध्यमवर्ग म्हणजे समाजरक्षणार्थ तळपणारी दुधारी तरवार हें वर्णन टिळकांच्या जीवनक्रमाकडे पाहून यथार्थ वाटतें! टिळक स्वाभिमानी मध्यमवर्गाचे प्रतिनिधि म्हणून जगापुढें येऊं शकले याचें पुष्कळसें श्रेय त्यांच्या वडिलांना दिलें पाहिजे.

गंगाधरशास्त्री १८६६ सालीं रत्नागिरीहून पुण्यास आले व तुळशीबागेजवळ दातारांच्या वाड्यांत बिऱ्हाडानें राहूं लागले. त्यांनीं आपल्या मुलाचें नांव दोन नंबरच्या शाळेंत घातलें. ही शाळा त्या वेळीं ढोलकर-आळींत पत्र्यामारुतीजवळ भरत असे. या शाळेंत इंग्रजी व मराठी शिक्षणाची एकत्र सोय होती. ही शाळा त्या वेळीं सकाळदुपार भरत असे. या शाळेंत नांव घालण्यात आलें तेव्हां टिळकांचें शिक्षण इंग्रजी तिसऱ्या इयत्तेपर्यंत झालेलें होतें. या वेळचा टिळकांचा तोंडवळा म्हणजे मेसाव्यास म्हातारी कळा, अंगांत बाराबंदी व डोकीला गोंडयाची

पांढरी लांबडी दुहेरी टोपी, असा असे. या वेळींहि टिळक बरोबरीच्या मुलांबरोबर राजकीय विषयांची चर्चा करीत असत. वर्गासाठीं नेमलेला मॉरिसनचा इतिहास एकतर्फी लिहिलेला आहे हें आपलें मत ते स्पष्टपणें बोलून दाखवीत. केरोपंत छत्रे हे गणितज्ञ तुळशीबागेजवळच गंगाधरशास्त्र्यांच्या शेजाराला रहात असत. शाळेंतल्या शिक्षकांचा व टिळकांचा वर्गांतलें एक उदाहरण सोडविण्याच्या रीतीबद्दल एकदां तटा झाला. तेव्हां टिळकांनीं तडक केरूनानांचें घर गांठलें व मास्तरांनाहि मागोमाग केरूनानांची भेट घ्यावी लागली. गंगाधरशास्त्री पुण्यास आल्यावर थोडक्याच दिवसांत– म्हणजे १८६६ च्या जुलै महिन्यांत– त्यांची पत्नी मरण पावली. उपासतापास, नेमधर्म इत्यादि आचारांमुळें या माउलीची प्रकृति अशक्त झालेली होती. टिळकांचा बालवयांतला अशक्तपणा प्रसिद्ध आहे. त्यांच्या ठिकाणचा हा दोष मातृदत्त असावा, असें वाटतें. गंगाधरशास्त्र्यांना नोकरीच्या कामानिमित्त जिल्हाभर पुष्कळच हिंडावें लागे. त्यांचे बंधु गोविंदराव हे कुटुंबांतलें कामकाज उरकीत. गंगाधरशास्त्र्यांच्या पत्नीच्या मृत्यूनंतर, गोविंदरावाच्या पत्नीनें टिळकांचें लालनपालन केलें.

पुण्याच्या सिटीस्कुलांत व बाबा गोखले यांच्या शाळेंत टिळक कांहीं दिवस जात होते; पण, त्यांचें इंग्रजी शाळेंतलें शिक्षण मुख्यतः पुणें हायस्कुलांत झालें. संस्कृत भाषेंत चांगल्या कविता रचण्याइतकें संस्कृत भाषेवरील प्रभुत्व टिळकांनीं या वयांतच संपादिलें होतें. शिक्षकांनीं सांगितलेलें संस्कृत उताऱ्यांचें इंग्रजी भाषांतर चोपडीवर लिहून घेण्याचा किंवा शिक्षकानें फळ्यावर सोडवून दाखविलेलें उदाहरण वहींत टिपून घेण्याचा टिळकांना कंटाळा वाटे. याचें एक कारण हातानें लिहिण्याचा कंटाळा हें तर खरेंच; पण, खरें व महत्त्वाचें कारण बुद्धि स्वावलंबी व स्वतंत्र ठेवण्याची हौस हें होय! शुद्ध-लेखनांत आलेला 'संत' शब्द तीन प्रकारांनीं लिहून टिळकांनीं शिक्षकांना चकित केलें वगैरे गोष्टींत त्यांच्या या स्वतंत्र व स्वावलंबी बुद्धीचीच ओळख पटते. परीक्षेच्या प्रश्नपत्रिकेंतलीं साधीं व सोपीं उदाहरणें टिळक सोडवीतच नसत. अवघड उदाहरणें सोडविणें म्हणजे बुद्धीची मशागत करणें होय, असें त्यांना वाटे! पुष्कळसे विद्यार्थी ज्या उदाहरणांच्या वाटेसहि जाण्यास धजत नसत तीं कठीण उदाहरणें नेमकीं निवडून टिळक तीं सोडवीत. त्यामुळें, खूप गुण मिळविण्याचें किंवा वर्गांत वरचा नंबर पटकविण्याचें श्रेय त्यांना मिळालें

नाहीं! मात्र लोकविलक्षण, बुद्धिवान्, स्वाभिमानी व करारी विद्यार्थी म्हणून ते मान्यता पावले. इंग्रजी शाळेतले शिक्षण चालू असतांनाच, १८७१ साली वैशाख महिन्यांत टिळकांचे लग्नहि झाले. दापोली तालुक्यांतल्या लाडघर गांवचे बाळ यांच्याकडे टिळकांची सासुरवाडी. टिळकांच्या पत्नीचे नांव तापीबाई हें होतें; नवें नांव 'सत्यभामा' हें ठेवण्यांत आलें.

एकुलत्या एक मुलाचे लग्न गंगाधरशास्त्र्यांनी करून दिले व हा कर्तृत्ववान् मुलगा मॅट्रिकच्या वर्गांत गेलेलाहि त्यांनीं पाहिला. पण, त्यानंतर त्यांना फारसें आयुष्य लाभले नाहीं. उदराचा विकार होऊन, ३१ ऑगस्ट १८७२ रोजीं 'नाना' इहलोक सोडून गेले, त्या वेळीं त्यांच्या चिरंजिवाची मॅट्रिकची परीक्षा दोन-तीन महिन्यांवर आलेली होती. स्वतःला इंग्रजी शिक्षणाचा लाभ मिळाला नाहीं तो आपल्या मुलाला अवश्य मिळावा म्हणून गंगाधरशास्त्र्यांनी स्वतःच्या हयातींत अशी सर्व प्रकारची तजवीज केली तशीच, आपल्या पश्चातहि मुलाच्या शिक्षणांत व्यत्यय येऊं नये या हेतूनें त्यांनीं याच ती सर्व तजवीज करून ठेविली. मुलगा आपलें कॉलेजमधील शिक्षण बहुधा स्वावलंबनानें करील असा विश्वास गंगाधरशास्त्री यांना वाटत असावा. मुलाचें बी. ए. पर्यंतचें शिक्षण पूर्ण होण्यासाठीं 'कांहीं, मदत लागल्यास' आपण शिल्लक ठेवीत असलेल्या रकमेंतून खर्च करण्यात यावा, असें गंगाधरशास्त्री यांनीं आपल्या मृत्युपत्रांत लिहून ठेविलें होतें. गंगाधरशास्त्री यांच्या मृत्युपत्रान्वयें टिळकांना सुमारें पांच हजार रुपये मिळण्याजोगे होते व टिळकांचे चुलते गोविंदराव यांना सुमारें अडीच हजार रुपये मिळण्यासारखे होते. कोंकणांतल्या मूळ गांव चिखलगांव येथील स्थावर मिळकतीचे दोन हिस्से व्हावे, एक हिस्सा आपल्या मुलाला मिळावा व दुसरा भावाला मिळावा, अशीहि इच्छा गंगाधरशास्त्री यांनीं व्यक्त करून ठेविली होती. वडिलांच्या मृत्यूनंतर सुमारें चार महिन्यांनीं—१८७२ च्या डिसेंबर महिन्यांत—टिळक मॅट्रिक परीक्षेत उत्तीर्ण झाले.

गृहपरिस्थितीकडे पाहून आपल्या पुतण्यानें नोकरी धरावी, पुढील शिक्षणाच्या नादीं लागूं नये, अशी गोविंदरावकाकांची इच्छा होती; पण, गंगाधरशास्त्र्यांचा आदेश नि स्वतः टिळकांचा निश्चय यांपुढें या इच्छेचें कांहीं चाललें नाहीं. टिळक डेक्कन कॉलेजांत जाऊं लागले तत्पूर्वी त्यांचें बिऱ्हाड

डोळकर-आळींत भटाचे वाड्यात गेलेलें होतें. बिऱ्हाडासचर्धीची सर्व जबाबदारी चुलत्यावर टाकून टिळकांनीं आपल्या भावी जीवनाच्या तयारीला खरा प्रारंभ केला हा वेळपर्यंत टिळकांची शरीरप्रकृति फारच दुबळी होती कॉलेजमधील पहिलें वर्ष केवळ शरीर कमाविण्याच्या कामाकडे लावावयाचें, या वर्षी अभ्यास करावयाचाच नाहीं अशा निश्चयानें टिळक वागले तालीमबाजी, पोहणें, नौकाविहार इत्यादि गोष्टींचा भरपूर फायदा घेऊन टिळकांनीं या वर्षांत– व यापुढील काहीं वर्षांत– जी शरीरसंपदा कमाविली तिचा त्याना जन्मभर फायदा झाला. कुस्ती वगैरे तालीमबाजीच्या छंदात दाजीसाहेब खरे हे टिळकांचे सोबती असत. वाटलें तर वर्गांतल्या व्याख्यानाकडे लक्ष द्यावें, सरासरी हजेरी मात्र लावावी, रात्रीं मित्रमंडळीबरोबर मनसोक्त गप्पा माराव्या, लाडिकपणानें किंवा नखरेलपणानें वागणाऱ्या समवयस्क विद्यार्थ्यांना उच्छाद द्यावा, अशा थाटात टिळकांनीं कॉलेजमधलें पहिलें वर्ष घालविलें वर्ष फुकट दवडावयाचें या योजनेनेंच हा कार्यक्रम चालला असल्यामुळें, वर्षअखेर परीक्षा हुकली तरी टिळकाना त्या गोष्टीचें काहीं वाटलें नाहीं. १८७४ च्या शेवटीं टिळक कॉलेजमधील प्रथम वर्षाची परीक्षा उत्तीर्ण झाले..

१८७५ सालीं पहिले पाच सहा महिने टिळक मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजात जात होते डेक्कन कॉलेजात असताना टिळकांनीं रचिलेल्या संस्कृत कविता पाहून प्रो जिनसीवाले संतुष्ट झाले होते व टिळकांच्या गणित विषयातल्या प्रावीण्याविषयीं प्रो केरूनाना छत्रे हे त्याना वारंवार धन्यवाद देत असत. केरूनानांच्या या सच्छिष्याला एल्फिन्स्टन कॉलेजमधील गणिताचे प्राध्यापक अगदींच सामान्य वाटत परीक्षेतल्या प्रश्नपत्रिका सोडविताना टिळकांचें सोप्या, सीध्या प्रश्नाकडे लक्षच नसे त्यामुळें हे प्राध्यापक टिळकाना निष्काळजी व अव्यवस्थित समजत पण, गणित विषयातली टिळकांची बुद्धि सूक्ष्म व स्वतंत्र आहे हें त्याना मान्य करावें लागे. या प्राध्यापक महाशयानीं एकदा टिळकाना केंब्रिज जर्नलमधले काहीं कूट प्रश्न सोडवावयास दिले स्वतः प्राध्यापकमहाशयहि हे प्रश्न सोडविण्यास झटत होतेच. टिळकांनीं एकदा बैठक मारली आणि सपाट्यासरशीं सर्व प्रश्न सोडविले हे प्रश्न सोडविण्याची टिळकांची पद्धत अगदीं स्वतंत्र होती व त्यात त्यांचें बुद्धितेज चांगलेंच व्यक्त झालें होतें. टिळकांनीं हे प्रश्न इतक्या अल्प वेळात इतक्या

रुपाईनें सोडविले हें पाहून प्राध्यापकमहाशय थक्कच झाले. त्यांनीं टिळकांना धन्यवाद दिले.

टिळक एक टर्म मुंबईस राहिले व फिरून ते डेक्कन कॉलेजांत दाखल झाले. याच कॉलेजमधून ते १८७६ सालीं बी. ए. च्या परीक्षेला बसले व पहिल्या वर्गांत उत्तीर्ण झाले. त्यांनीं या परीक्षेला गणित हाच विषय 'विशेष विषय' म्हणून निवडिला होता. व्यायाम, पोहणें, नौकाविहार, गप्पाटप्पा इत्यादि उद्योगांत मनमुराद वेळ घालविणारे टिळक एकदां वाचनाकडे अगर अभ्यासाकडे वळले म्हणजे त्यांत त्यांची समाधीच लागत असे. अशा तंद्रींत रंगून गेलेले टिळक प्रसंगीं पहाटेचे तीन वाजेपर्यंतहि वाचीत पडत असत. आणि त्यांचें वाचन किती विविध प्रकारचें असेल यासंबंधींची कल्पना एका आख्यायिकेच्या मदतीनें आजहि करतां येत आहे. मोरोपंतांच्या कवितांचें प्रकाशन करणारे रामकृष्णपंत पराडकर यांना पंतांच्या मंत्ररामायणांतील कांहीं वृत्तांची सरणी उलगडेना. या विषयावरील एक पुस्तक टिळकांच्या ग्रंथसंग्रहांत आहे असें त्यांना समजलें. पराडकर टिळकांच्या घरीं गेले तेव्हां टिळक कांहीं कामांत होते; म्हणून जागचें उठून ग्रंथालयातलें पुस्तक काढून देण्याचें काम टिळकांनीं तत्काळ केलें नाहीं. पण, बसल्या जागीं त्यांनीं पंत पराडकरांना हवी होती ती सर्व माहिती उलगडून सांगितली. या वेळीं टिळक पराडकरांना म्हणाले:*

मी डेक्कन कॉलेजांत विद्यार्थी असतांना या सर्व प्रस्तार वृत्तांची चटकन् समजूत पटण्याकरितां सहज एका कागदावर विसपेन्सलीनें एक कोष्टक रचून ठेविलें आहे. तोहि कागद शोधून तुम्हांला देईन.

टिळक बी. ए. झाले त्या वर्षी व ते एम. ए. चा अभ्यास करीत होते त्या वर्षी भोंवतालचें वातावरण अनेक उलाढालींनीं प्रक्षुब्ध होऊं लागलें होतें. पुनरुक्त होणारी दुष्काळाची आपत्ति, सावकारी कर्जांत रुतून गेलेल्या शेतकऱ्यांचें असह्य जीवन इत्यादि घटनांचा परिणाम म्हणून महाराष्ट्राच्या कांहीं भागांतून दंगेधोपे होऊं लागले होते व या असंतोषाचा फायदा घेऊन राजकीय उठावणी करणारे वासुदेव बळवंत फडके यांच्या हालचालींचीं वृत्तेंहि लोकांच्या कानांवर येऊं लागलीं होतीं. खुद्द टिळकांचा एक जवळचा

* आठवणी व आख्यायिका : १ : भाग २ : पृ. ८४.

नातलग वासुदेव बळवंत फडके यांच्या उठावणींत सामील असल्याची ऐकीव माहिती श्री. न. चिं. केळकर यांनीं नमूद केली आहे.* या नातलगाकडून कळणाऱ्या गोष्टी नुसत्या ऐकून टिळक स्वस्थ राहिले असतील हें त्यांच्या स्वभावरचनेचा विचार केल्यास अशक्य दिसतें. "किरकोळ तयारीनें कांहीं होणार नाहीं. आम्ही या सर्व गोष्टी करून मागलो आहोंत,† असा इशारा नाशिकच्या क्रांतिकारक-गटाशीं चर्चा करतांना टिळकांनीं पुढें १९०६ सालीं दिला. "वासुदेव बळवंतानें केलेल्या किरकोळ तयारीची मजल कोठवर जाऊं शकते याचा प्रत्यक्ष अनुभव घेऊनच मीं आपला मार्ग ठरविला" या शब्दांत टिळकांच्या या म्हणण्याचा अनुवाद करतां येण्यासारखा आहे.

बी. ए. ची परीक्षा होईपर्यंतच्या अवधींत टिळकांनीं जें अध्ययन केलें त्याचा हेतु बरोबरीच्या विद्यार्थ्यांत अग्रेसरत्व मिळविणें हा नव्हता. कॉलेजांत कांहीं दिवस त्यांना ज्यूनियर स्कॉलर म्हणून मासिक दहा रुपयांची छात्रवृत्ति मिळत होती हें खरें; पण छात्रवृत्ति अगर बक्षिसें हस्तगत करणें हा टिळकांच्या अभ्यासाचा हेतु नसे. बुद्धि ज्या विषयाकडे वळवावयाची तो विषय समूळ हस्तगत करावयाचा या उद्देशानें टिळकांचें अध्ययन चाले; आणि आपल्या बुद्धीच्या कक्षेत विविध विषय यावेत अशीहि टिळकांची धडपड असे. गणित, संस्कृत, इतिहास, खगोलविज्ञान हे विषय तर त्यांनीं आत्मसात् केलेच; याशिवाय डॉक्टरीच्या अभ्यासातल्या Anatomy, Physiology या विषयांवरीलहि कांहीं पुस्तकें त्यांनीं वाचून काढिलीं. पुस्तकी ज्ञान प्रायोगिक कसोटीवर पारखून घेण्याचा महिमा आधुनिक युगांत वाढत आहे हें टिळकांनीं या वयांत जाणलें होतें. खगोलशास्त्राच्या प्रायोगिक ज्ञानासाठीं ते रात्रीं जागून केरूनाना छत्रे यांच्यासमवेत दुर्बिणींतून आकाशाचें निरीक्षण करीत. मानवी शरीरांतल्या हृदयाच्या व डोळ्यांच्या रचनेचा अभ्यास करीत असतांना टिळकांनीं मेलेल्या बैलाचें हृदय व डोळे आपल्या घरीं खोलींत आणून ठेविले होते. त्यांनीं त्यांची चीरफाडहि करून पाहिली होती.

मोठ्या दक्षतेनें आपल्या बुद्धीचा विकास करून घेणारे टिळक आपल्या

---

* टिळक-चरित्र : पूर्वार्ध : पृ. ८३

† आठवणी व आख्यायिका : १ : भा. १ : पृ. ७४

ठिकाणी अन्य गुणांचीहि वाढ व्हावी यासाठी झटत असते. डेक्कन कॉलेजांत असतांनाच टिळकांच्या अंगी साहसी वृत्तीचा परिपोष कोणत्या मर्यादेपर्यंत झाला होता हें स्पष्ट करणारी एक आख्यायिका प्रसिद्ध झालेली आहे. कांहीं समवयस्क तरुणांबरोबर टिळक एकदां रात्रीं वसतिगृहाच्या गच्चीवर गप्पागोष्टी करीत बसले होते. या वेळीं येथून एकाएकीं नाहींसें होण्याचा प्रसंग आला तर कोण काय करील असा प्रश्न निघाल्यामुळें, पुष्कळांनीं हें अशक्य आहे असें सांगून निसटून जाण्याची युक्ति लढविली. टिळकांनीं मात्र काच्या मारला व 'मी हें करीन' असें म्हणत त्यांनीं उडी ठोकून दिली. टिळकांचा हातपाय मोडला असेल अशा भीतीनें, त्यांचे स्नेही गडबडीनें खालीं जाण्यासाठीं जिन्याकडे धांवले, तों टिळकांची स्वारी पुनः वर येण्यास जिन्यापर्यंत आलेली पाहून सर्वांनीं 'आश्चर्यानें तोंडात बोटें घातलीं." 'तुम्हाला संस्कृत शिकवितां येत नाही म्हणून वर्गात बसत नाहीं' हें प्रो. कीलहॉर्न यांना तोंडावर सांगण्यात टिळकांचें मानसिक साहस व्यक्त झालें तद्वतच वरील प्रसंगीं त्यांचें शारीरिक साहसहि व्यक्त झालें. साधूला शोभून दिसणारा मानसिक कोमलपणा व कठोरपणा टिळकांच्या अंगीं असल्याचें त्यांच्या पुढील आयुष्यांत अनेक प्रसंगीं प्रगट झालें. कोमलपणा व कठोरपणा यांच्या साहचर्याचीं लक्षणें टिळकांच्या ठिकाणीं त्यांच्या प्रौढ विद्यार्थिदशेपासूनच व्यक्त होत असत हें सांगणारी पुढील आठवण सूचक आहे :

आमच्या स्नेहांत कृष्णाजी सदाशिव मराठे या नांवाचा...एक विद्यार्थी होता. एकदां मराठे शीतज्वरानें आजारी पडला. त्याला कै. डॉ. अण्णासाहेब पटवर्धन हे औषध देत होते. त्यांनीं...बजाविलें कीं याची शुश्रूषा फार काळजीनें करावयास पाहिजे...हें टिळकांना कळल्याबरोबर ते,...मराठे यांची शुश्रूषा करण्याकरितां अहोरात्र जागत असत व सर्व प्रकारची मेहनत स्वतः करीत. परंतु शेवटीं त्या दुखण्यांत मराठ्यांचा अंत झाला...सोनापुरांत मराठे यांचें प्रेत नेल्यावर दहनाचे वेळेस सरणावर त्यांच्या शरीराचा गुडघ्या-

* आठवणी–आख्यायिका: ख. २ : पृ. १६०.

† आठवणी व आख्यायिका : ख. १ : भा. १ : पृ. ४२.

चालचा भाग बाहेर पडला. त्यासरशीं सर्व एकमेकांकडे टकमक पाहूं लागले. पण, चट्कन् टिळक मात्र पुढें होऊन त्यांनीं तो भाग तोडून दुःखानें सरणांत टाकून दिला.

गणित विषय घेऊन एम्. ए. च्या परीक्षेंत उत्तीर्ण व्हावें म्हणून टिळकांनीं एक वर्ष त्या नादांत दवडिलें; पण ही पदवी त्यांना मिळूं शकली नाहीं. यानंतर त्यांनीं एल्एल्. बी. कडे लक्ष पुरविलें व १८७९ च्या अखेरीस त्यांनीं ही पदवी पदरांत पाडून घेतली. पुढें टिळक लॉ क्लास चालवूं लागल्यावर एकदां ते वर्गांत Equity हा विषय शिकवीत होते व त्याची अध्यापनसमाधि लागली असल्यामुळें, वर्गांत मागच्या बाजूला न्या. मू. माधवरावजी रानडे केव्हां येऊन बसले हें त्यांच्या लक्षांतहि आलें नाहीं. प्रतिपाद्य विषयावरील टिळकांचें प्रभुत्व पाहून माधवरावजींनीं कौतुकानें मस्तक डोलविलें. टिळकांनीं अर्थलाभासाठीं वकिलीचा धंदा जन्मांत केव्हांच केला नाहीं. पण, दूरदूरचे, अनोळखी लोक आपल्या कोर्टकामाच्या नाना भानगडी घेऊन टिळकांना भेटत. टिळकांनीं विद्यार्थिदशेंत वेगवेगळ्या कायद्यांचें सूक्ष्म अध्ययन केलें होतें; तें त्यांना या भानगडींचीं उत्तरें देतांना उपयोगी पडलें. हिंदु लॉचा अभ्यास करतांना त्यांनीं याज्ञवल्क्यस्मृति वगैरे स्मृति व महत्त्वाच्या टीका यांचें सूक्ष्म परिशीलन केलें होतें. त्याचा त्यांना पुढील जीवनांत अनेक प्रकारांनीं उपयोग झाला. सामाजिक सुधारणेविषयींचे वाद चालवितांना डॉ. सर रामकृष्णपंत भांडारकर यांच्यासारखा मान्यवर प्रतिस्पर्धी भेटला तरी टिळक डगमगत नसत; याचें एक कारण हेंच कीं, विद्यार्थिदशेंत त्यांनीं महत्त्वाच्या स्मृतिग्रंथांची छाननी करून टाकली होती; 'ताकापुरतें रामायण' या न्यायानें त्यांनीं कायद्याच्या परीक्षाचा अभ्यास उरकून टाकला नव्हता!

एल्एल्. बी. च्या अभ्यासासाठीं टिळक डेक्कन कॉलेजांत राहिले त्या सुमारासच, या कॉलेजमध्यें जवळजवळ टिळकांच्याच वयाचे दुसरे एक गृहस्थ एम्. ए. चा अभ्यास करण्यासाठीं येऊन राहिले होते. या गृहस्थांचें नांव गोपाळराव आगरकर. गरिबींतून दिवस काढीत काढीत, शिक्षणांत व्यत्यय येत होते तरी चिकाटीनें शिक्षणक्रम पुढें चालवीत, बी. ए. होण्यापूर्वींच बारीकसारीक नोकऱ्यांतले दुर्धर अनुभव पचनीं पाडून गोपाळराव बी. ए.

झाले होते व एम्. ए. ची परीक्षा दिल्यावर पुढें कोणत्या सदुद्योगांत आयुष्य खर्च करावयाचें या विचाराकडे त्यांचे मन वळत होतें. हल्लीं कॉलेजांतून विद्यार्थ्यांची खोगीरभरती झालेली आढळते व त्यामुळें प्राध्यापकांना विद्यार्थ्यांचें अंतरंग कळणें जसें प्रायः दुर्घट होतें त्याप्रमाणेंच विद्यार्थ्यांनाहि परस्परांच्या अंतरंगाची ओळख पटणें अशक्यच होऊन जातें. टिळक-आगरकरांच्या वेळीं डेक्कन कॉलेजची अशी स्थिति झालेली नव्हती. प्राध्यापक व छात्रगण यांचीं हृद्गतें परस्परांना कळणें जसें शक्य होतें त्याप्रमाणेंच, विद्यार्थ्यांपैकीं पुष्कळांनाहि परस्परांचीं हृद्गतें कळणें शक्य होतें. टिळक हे जुन्या भारतीय संस्कृतीचे अभिमानी आहेत, ते नव्या विचारांचा स्वीकार करण्याला तयार असले तरी सोवळेंओवळें, देवधर्म, जुनी रीतभात इत्यादींचा त्यांना माफक अभिमान वाटतो हा टिळकांचा मनोधर्म जसा आगरकरांच्या लक्षांत आला असेल तसाच आगरकरांचाहि मनोधर्म टिळकांच्या लक्षांत आला असेल. पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या एकतर्फी वाचनाचा मनावर अतिरिक्त पगडा बसल्यामुळें आपल्या या मित्राला स्वकीय समाज, स्वधर्म, स्वसंस्कृति यांतील दोषच तेवढे दिसूं लागले आहेत, हें टिळकांनीं ओळखलें असेल. परस्परांच्या मनोरचनेमधील हे भेद दोघांच्याहि लक्षांत आले असले पाहिजेत. हे भेद असले तरी, भोंवतालच्या समवयस्क नवशिक्षितांपेक्षा आपल्या मनाला वेगळी कांहीं तरी भूक लागलेली आहे, हेंहि या बाळ-गोपाळांच्या पुढील उमगलेंच असेल. सुशिक्षित बनल्यावर इतर लोक स्वतःचा संसार, स्वतःचें सांसारिक स्वास्थ्य व स्वतःची सामाजिक बढाई यांच्याच मागें लागतात. या मार्गानें जाण्याला आपलीं मनें तयार नाहींत, ही जाणीव उभयतांच्याहि मनांत उदय पावली असेल.

आगरकरांचे व आपले विचार जुळतात किती नि जुळत नाहींत किती याची कल्पना टिळकांनीं नक्की ठरविली ती पुष्कळ दिवस विचारविनिमय करून नि वादविवाद करून मगच ठरविली. या वादविवादाच्या नि विचारविनिमयाच्या नादांत टिळक नि आगरकर यांनीं कित्येक चांदण्या रात्री कॉलेजच्या आसपासच्या भूभागांत भटकत घालविल्या. सध्यां ज्या टेकडीवर 'पर्णकुटी' नांवाचा शेठ ठाकरसी यांचा बंगला विराजत आहे त्या सादिरचोवाच्या टेकडीवरील एकूण एक खडकानें व पाऊलवाटेनें टिळक-आगर-

करांचे त्या वेळचे संवाद ऐकिलेले आहेत. 'या टेकडीवर व तिच्या आसपास मनसोक्त हिंडत असतांना, टिळक-आगरकरांनीं आपल्या आयुष्याचे व आपल्या देशस्थितीच्या भवितव्याचे किती तरी चित्रपट रेखाटले आहेत. पारतन्त्र्यामुळें पिचून गेलेला आपल्या देशांतला अफाट लोकसमाज फिरून सतेज, स्वाभिमानी, व सामर्थ्यवान् कसा बनेल, देशाचें स्वातंत्र्य फिरून मिळविण्याचा यशस्वी प्रयत्न करावयाचा तर आपल्या समाजरचनेंतल्या कोणत्या गोष्टी टिकविल्या पाहिजेत व कोणत्या टाकल्या पाहिजेत, इंग्रज या देशात आपल्या कल्याणासाठीं आले आहेत ही समजूत कशी भ्रांतिष्टपणाची आहे, मूठभर इंग्रज लोकांनीं आपला एवढा देश आत्मसात् केला व त्यावरील सत्तेची पकड त्यांनीं पक्की केली ती कोणत्या गुणांमुळें, इत्यादि अनेक प्रश्नांची मनमुराद चर्चा या भागांत टिळक-आगरकरांनीं केली. तिची साक्ष या भागांतले जुनाट वृक्ष नि खडक कदाचित् अद्यापहि देतील. अनेक दिवसपर्यंत चाललेल्या या चर्चेतून जो निष्कर्ष निघाला तो हा होता कीं, स्वदेशाची सुस्थिति जवळ यावयाची असेल तर लोकांचीं मनें बदलली पाहिजेत. समाजाच्या मनाचा घाट बनतो तो शिक्षणाच्या पद्धतीमुळें बनतो हें तत्त्व या तरुणांना पटलें असल्यामुळें, भावी पिढीला स्वतःच्या कल्पनांप्रमाणें शिक्षण देण्याची खटपट करावयाची, असें त्यांनीं ठरविलें.

आगरकरांसारख्या मित्राच्या सहवासांत विचार करणाऱ्या टिळकांच्या मनांत या वयांतच देशाच्या अवनतीचीं कारणें, देशाच्या उत्कर्षाचे खरे मार्ग इत्यादि प्रश्नांसंबंधींच्या कल्पना निश्चित स्वरूप धारण करू लागल्या असल्यामुळें, देशभक्तीचें अवसान आणून कोणी समवयस्क उथळपणानें व उठवळपणानें वागूं लागला तर टिळकांना ती गोष्ट आवडत नसे. खोलींत लावलेलें व्हिक्टोरिया राणीचें रंगीत चित्र टरकावून टाकणाऱ्या एका 'देशभक्त' विद्यार्थ्याला ताळ्यावर आणण्यासाठीं टिळकांनीं काढलेले उद्गार* या दृष्टीनें संस्मरणीय आहेत :

**अरे, त्या बिचाऱ्या निरुपद्रवी कागदानें तुमचें काय केलें आहे? दारें लावून चंडखोरी करणें म्हणजे आपल्या मनाच्या कमकुवतपणा**

* आठवणी व आख्यायिका : खं. १ : भा. १ : पृ. १९०

**व क्लैब्य दर्शविणें आहे. हिंमत असेल तर सदाशिवरावभाऊ पेशव्यांप्रमाणें घण घालून टडनचें तक्त फोडून पायाखालीं तुड- विण्याची महत्त्वाकांक्षा धरा. निदान याच दिशेनें यावज्जन्म आपल्या यत्नांची शिकस्त करण्याची आज मनानें तरी शपथ घ्या, तरच हें चित्र फाडण्याचा तुमचा आदेश मी खरा समजेन.**

स्वदेशाच्या भवितव्यासंबंधींचे हे विचार टिळक-आगरकरांच्या मनांत स्वतंत्रपणें घोळत होते त्या सुमारासच, पुण्यांतल्या दुसऱ्या एका तडफदार तरुणाच्या मनातहि असलेच विचार परिपक्व होत होते. सरकारी शाळेत शिक्षकाची नोकरी करीत असतांनाच, 'निबंधमाला' हें मनावशाली मासिक काढून व चालवून विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं महाराष्ट्रांतल्या सुशिक्ष समाजाला खडबडून जागें केलें होतें. या गृहस्थाना स्वतःच्या कर्तृत्वाविषयी विलक्षण आत्मविश्वास वाटत असे. 'मी मराठी भाषेचा अनन्यसामान्य छत्रपति आहें' असें ते स्वतःविषयींच्या यथार्थ अभिमानानें म्हणत असत. सरकारी नोकरीची दृक्षा झुगारून यावयाची व तरुणांच्या शिक्षणासाठीं पुण्यांत स्वतंत्र संस्था स्थापावयाची हा विचार त्यांच्या मनांत जोरजोराने घोळत होता. आपल्या संकल्पित शिक्षणसंस्थेसाठीं आपल्या विचाराचीं माणसें मिळविण्याच्या उद्योगात विष्णुशास्त्री आहेत अशी वार्ता टिळक-आगरकरांना समजली. १८७९ च्या सप्टेंबर महिन्याच्या प्रारंभीं टिळक-आगरकर ही जोडी विष्णु- शास्त्री चिपळूणकरांना भेटली. आपल्या मनांत काय आहे हें त्यांनीं शास्त्री- बुवांना सांगितलें. टिळक-आगरकरांसारखे दोन पदवीधर तरुण आपल्या धाडसी उद्योगांत आपल्याशीं सहकार्य करू इच्छीत आहेत हा आपल्या कार्याला होत असलेला शुभशकुनच होय, असें शास्त्रीबोवांना वाटलें असलें तर त्यांत आश्चर्य नाहीं! टिळक, आगरकर व विष्णुशास्त्री यांची ही भेट झाल्यावर थोड्याच दिवसांनी विष्णुशास्त्र्यांनीं सरकारी नोकरीचें त्यागपत्र देऊन टाकिलें. इंग्रजी वर्षाच्या पहिल्या दिवशीं—म्हणजे १।१।१८८० ला—पुण्यांत नवी इंग्रजी शाळा निघणार ही बातमी बाहेर फोडली जाऊं लागली. या धाडसी उद्योगांत कोण कोण सामील आहेत यांविषयींची चर्चा लोकांत सुरू झाली. मध्यंतरीं टिळकांनीं एल्‌एल्. बी. च्या दुसऱ्या परीक्षेला बसून येणसे होते व आगर- करहि एम्. ए. च्या परीक्षेला बाऊन आले होते.

## पर्व दुसरें : : : 'त्रिमूर्तीचा संयोग-वियोग'

"आम्ही निकृष्ट देशस्थितीच्या विचारानें भणाणलेल्या डोक्याचीं माणसें होतों; आणि पुष्कळ विचारानंतर, शिक्षणांतच आमच्या देशाचा उद्धार आहे, असें आमचें मत बनलें होतें—"

—टिळक

१८७९ च्या सप्टेंबर महिन्याच्या प्रारंभीं चिपळूणकर, टिळक व आगरकर यांची भेट होऊन, शिक्षणसंस्था स्थापण्याविषयींचें त्यांचें बोलणें झालें. या वेळीं— व यानंतर कांहीं दिवसपर्यंत— टिळक-आगरकरांचें मत आरंभीं कॉलेजच स्थापावें असें होतें. या वर्षाच्या ऑक्टोबर महिन्याच्या पहिल्या तारखेला चिपळूणकरांनीं सरकारी नोकरीचें त्यागपत्र धाडून दिलें. नवीन शिक्षणसंस्था स्थापूं पाहणारी ही मंडळी साधा पंतोजीपणा करणारी मंडळी नव्हत, असें त्या वेळच्या लोकांच्या पुढील वाटे. याचें प्रत्यंतर विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं दिनांक १ ऑक्टोबर १८७९ रोजीं लिहिलेल्या पत्रांतील पुढील वाक्यावरून पटतें : "I am resolved to try what might be done for public good with the potent instrumentality of a press establishment worked by a vigorous hand." (मुद्रणालय हें जनहित साधण्याचें एक प्रभावी साधन आहे. म्हणून, मुद्रणालयाचा मांड मांडावयाचा, त्याची व्यवस्था एका खंबीर माणसाकडे सोंपवावयाची व अशा रीतीनें जनहित साधण्याचा प्रयत्न करावयाचा, असा माझा निश्चय झालेला आहे.)

याच वर्षाच्या डिसेंबर महिन्याच्या मध्याच्या सुमारास, या मंडळींनीं मनांत योजिलेलें 'न्यू इंग्लिश स्कूल' नवीन वर्षाच्या प्रथम दिवशीं सुरू होणार असल्या-बद्दलच्या जाहिराती वाटण्यांत आल्या. दिनांक १-१-८० रोजीं संकल्पा-प्रमाणें ही शाळा सुरु झाली. मध्यंतरीं मुंबई विद्यापीठाच्या परीक्षांचे निकाल जाहीर झाले होते. टिळक एल्‌एल्. बी. च्या परीक्षेंत उत्तीर्ण झाले होते; पण आगरकरांना एम्. ए. च्या परीक्षेंत अपेश आलें होतें. आगरकरांनीं आपला

अभ्यास पुरा करून मग शाळेला येऊन मिळावें असें सर्वानुमतें ठरल्याप्रमाणें, न्यू इंग्लिश स्कूलला अगदीं आरंभीं लाभलेल्या शिक्षकवर्गात आगरकर सामील होऊ शकले नाहींत

ही शाळा सुरू होण्याची जाहिरात प्रसिद्ध झाली तेव्हां, या पदवीधर तरुणाचा हा साहसी उद्योग हाच अनेक लोकांच्या चर्चेचा विषय होऊन बसला. पुण्याच्या सरकारी हायस्कूलच्या प्रमुखानीं तर या तरुण मंडळींची व त्यांच्या साहसाची थट्टा चालवली सुरू केली. पहिल्या दिवशीं शाळेत नांवें नोंदविणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्याहि फार मोठी नव्हती. असें असूनहि, ठरल्याप्रमाणें ठरल्या दिवशीं ही शाळा सुरू झाली व दिनांक २-१-८० पासून शाळेतल्या शिक्षणाचें काम नियमितपणें सुरूहि झालें. आगरकर शाळेला येऊन मिळू शकले नाहींत हें खरें, पण इतर कित्येक सहकाऱ्यांची मदत शाळेला प्रथम दिवसापासूनच मिळाली. टिळकांच्या अनेक उद्योगात त्यांना पुढें उपयोगी पडलेले व कोणतेंहि काम अंगावर घेतल्यानंतर तें यशस्वी करण्याच्या आपल्या बाण्यामुळें आपल्या मित्रमंडळींत 'पत्तोजिंग' म्हणून ओळखले जाणारे माधवराव नामजोशी हे पहिल्याच दिवशीं शाळेच्या चालकांत समाविष्ट झाले होते. संस्कृतशास्त्री म्हणून पुढें प्रसिद्धि पावलेले मंद्गोळकर आणि इतिहास-संशोधक, नाटककार वगैरे नात्यानीं पुढें मान्यता पावलेले वासुदेवशास्त्री खरे ही जोडी पहिल्या दिवशींच शाळेला येऊन मिळाली होती.

शाळेचें काम व्यवस्थितपणें सुरू झालें व शाळेतील विद्यार्थ्यांची संख्याहि हळूहळू वाढत गेली. सरकारी हायस्कूलच्या शिक्षणपद्धतीहून वेगळें कांहीं तरी करावयाचें हा या मंडळींचा बाणाच असल्यामुळें, त्यांनीं शिक्षकांची योजना वर्गवारीनें न करिता शक्यतोंवर विषयवारीनें केली. मातृभाषेचा अभ्यास जास्त पद्धतशीर रीतीनें व्हावा यासाठींहि या मंडळींनीं प्रथमपासूनच खटपट सुरू केली. विषय शिकवावयाचे ते मुलांच्या बुद्धीच्या विकासाच्या दृष्टीनें पद्धतशीरपणें शिकवावयाचे, नुसत्या घोकपट्टीवर भागवावयाचे नाहीं असेंहि धोरण या मंडळींनीं आखलेलें. गणिताचा अभ्यासक्रम वर्गवारीच्या विकासाच्या तत्त्वावर आखण्याचें काम व बहुतेक सर्व वर्गांना गणित हा विषय शिकविण्याचें काम सहजच टिळकांकडे आलें होतें. माधवराव नामजोशी इतिहास व भूगोल हे विषय शिकवीत, आणि विष्णुशास्त्री चिपळूणकर हे मुख्यतः

वरच्या वर्गांना इंग्लिश व मराठी शिकवीत. या प्रत्यक्ष शिक्षणाच्या कामाव्यतिरिक्त किती विविध प्रकारचें काम टिळकांनीं केलें असेल हें पुराव्यानिशीं सांगणें आज शक्य नाहीं. दिनांक १-१-१८८० रोजीं शाळा सुरू व्हावयाची; त्याच्या आदल्या रात्रीं टिळक व नामजोशी यांनीं मोरोबादादांच्या वाड्यांतली शाळेची जागा स्वतः सारवली होती व हें काम संपल्यावर जमिनीवर फळे टाकून ते तेथेंच झोपले होते, ही प्रसिद्ध झालेली आठवण टिळकांच्या बहुविध कामाची ओळख करून देण्याला पुष्कळ उपयोगी पडेल.

पहिल्या वर्षी उन्हाळ्याची सुटी होऊन शाळा बंद होण्याच्या वेळीं विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं विद्यार्थ्यांना जो उपदेश केला तो त्यांच्या बाणेदारपणाला शोभण्यासारखाच होता. ही सुटी संपून शाळा सुरू झाली त्या सुमारास शाळेला एक चांगले गृहस्थ येऊन मिळाले होते. श्री. वामन शिवराम आपटे हें यापूर्वीच एम्. ए. झालेले होते. आपल्या योग्यतेला साजेल अशी शिक्षणखात्यांतली सरकारी नोकरी मिळविण्याची खटपटहि त्यांनीं केलेली होती. ही खटपट करीत असतांना त्यांना कांहीं कटु अनुभव आला व त्यामुळें त्यांनीं न्यू इंग्लिश स्कूलकडे आपला मोर्चा वळविला. या वेळीं 'न्यू इंग्लिश स्कूल'ला येऊन मिळणाऱ्या पदवीधरांना वेतन मिळत असे तें अगदींच तुटपुंजें मिळत असे! महिन्याला तीस रुपये पगार घेऊन बहुतेक सर्व मंडळी काम करीत असत. चिपळूणकर व टिळक यांनीं तर पहिलीं एकदोन वर्षें हें वेतनहि घेतलें नाहीं. आपटे शाळेला येऊन मिळण्यात शाळेचा लाभ होईल असें वाटल्यामुळें, आपट्यांच्या बाबतींत कांहीं सवलती मान्य करण्यांत आल्या. शाळेबाहेर कांहीं उद्योग करून आपटे यांनीं कांहीं द्रव्यार्जन केलें तरी चालेल, अशी सवड देण्यात आली होती. शिस्त व पद्धतशीरपणा हे गुण आपट्यांच्या ठायीं प्रामुख्यानें आहेत ही जाणीव 'न्यू इंग्लिश स्कूल'च्या चालकांना असल्यामुळें, शाळेच्या अंतर्गत व्यवस्थेची जबाबदारी आपटे यांच्यावर सोंपविण्याला ही मंडळी तयार झाली. आपटे यांना हें काम प्रतिष्ठेनें करतां यावें म्हणून, सुपरिंटेंडेंट हा नवा हुद्दा निर्माण करण्यांत आला. चिपळूणकर हेडमास्तर व आपटे सुपरिंटेंडेंट अशी योजना होऊन शाळेचें काम जोरानें चालू राहिलें.

नुसती शाळा चालवून समाधान मानावयाचें नाहीं. लोकशिक्षणाच्या अन्य

मार्गाकडेहि वळवायाचें हा विचार चिपळूणकर-टिळक यांच्या मनांत आरंभापासूनच घोळत होता. १८८० साली पावसाळ्यात न्यू इंग्लिश स्कूलमधील प्रमुख मंडळी काही घरगुती प्रसंगाने एकत्र जमली असतां, या कल्पनेची चर्चा फिरुन सुरु झाली. लोकशिक्षणासाठी एक मराठी साप्ताहिक काढावें व लोकांचे हृद्गत सरकारी अधिकाऱ्यांना कळविण्यासाठी आणि महाराष्ट्राचें मनोगत इतर प्रांतांना कळविण्यासाठी एक इंग्रजी साप्ताहिकहि काढावें हा विचार या प्रसंगीं ठरला. 'केसरी' हें मराठी आणि 'मराठा' हें इंग्रजी अशी दोन साप्ताहिकें नव्या वर्षाच्या सुरवातीलाच काढावयाची हा विचार पक्का ठरुन, ऑक्टोबर महिन्यांत या मंडळींनी हा विचार जाहीरहि केला. वृत्तपत्रें चालवावयाची तर मुद्रणालय स्वाधीनचें असलेलें बरें, ही कल्पना स्वाभाविकच पुढें आली. माधवराव नामजोशी हे पूर्वीपासूनच वृत्तपत्रांच्या व मुद्रणालयाच्या सृष्टींत वावरत असल्यामुळें, कोठें काय आहे व छापखान्याला कशाचा उपयोग होण्यासारखा आहे याची माहिती त्यांना होती. आडगाळ म्हणून पडून राहिलेला एक छापखाना हस्तगत करावयाचा, या छापखान्याच्या मालकाला रक्कम द्यावयाची ती हप्तेबंदीनें द्यावयाची वगैरे गोष्टीहि झटपट ठरत गेल्या. 'केसरी' व 'मराठा' या वृत्तपत्रांबरोबरच पुढें जें आर्यभूषण मुद्रणालय निघालें तें या खटपटींतूनच निघालें. केसरी पत्र निघण्यापूर्वी ऑक्टोबर-नोव्हेंबरच्या सुमारास टिळक मुंबईस गेले होते. किर्लोस्कर नाटक कंपनीचे नाटक सुरु होण्याच्या वेळीं, केसरीची प्रसिद्धिपत्रकें थिएटरांत टिळकांनी स्वतः आपल्या हातानें वाटलीं, अशी माहिती मिळते.

१८८० सालीं झालेल्या मुंबई विद्यापीठाच्या मॅट्रिक्युलेशन परीक्षेला 'न्यू इंग्लिश स्कूल'मधून एकंदर बारा विद्यार्थी पाठविण्यात आले होते. या बारा जणांपैकीं आठ विद्यार्थी यशस्वी झाले व भांडारकर रामचंद्र भाटे या 'न्यू इंग्लिश स्कूल'च्या विद्यार्थ्याला विद्यापीठांत जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति मिळाली. यामुळें शाळेचा लौकिक स्वाभाविकपणेंच सगळीकडे पसरला. पहिलें वर्ष संपलें त्या वेळीं शाळेंत शिकत असलेल्या विद्यार्थ्यांची संख्या तीनशेंच्या पुढें गेली होती. शाळेचें पहिलें वर्ष संपण्यापूर्वीच आगरकर एम्. ए. च्या परीक्षेंत उत्तीर्ण होऊन शाळेंत काम करूं लागले होते. नव्या वर्षापासून सुरु होणाऱ्या 'केसरी' पत्राचे संपादक म्हणून त्यांची योजना

करण्यांत आली व 'मराठा' पत्राच्या संपादकाची जबाबदारी टिळक यांच्याकडे सोंपविण्यांत आली

'केसरी', 'मराठा' पत्रांच्या पहिल्या वर्षाच्या लेखांतून मराठी संस्थानांविषयींचे बरेच लेख आलेले आहेत. बडोदें व कोल्हापूर या दोन्ही संस्थानाचे धनी त्या वेळीं वयांत आलेले नव्हते. यामुळे संस्थानांचा कारभार सार्वभौम सत्तेला इष्ट अशा पद्धतीनें चालत असे. कारभार अशा रीतीनें चालविणाऱ्या दिवाणांवर केसरी व मराठा पत्रांतून पुष्कळच टीका करण्यांत येत असे कोल्हापूर संस्थानचे धनी शिवाजीमहाराज यांच्याबद्दल तर केसरी-मराठा पत्रांच्या लेखांत विशेषच आपलेपणा दाखविण्यांत येत असे. शिवाजीमहाराज हे औरस राजपुत्र नव्हते; दत्तक होते. त्यांना दत्तक घेतल्यानंतर त्यांच्या दत्तक आईची बुद्धि बदलली असल्याचा त्या वेळीं बराच बोभाटा झालेला होता. शिवाजीमहाराजांना वेडे ठरवावें आणि आपल्या तंत्रानें वागणारा दुसरा एखादा मुलगा दत्तक घ्यावा असा विचार या बाईच्या मनांत असावा, असा संशय त्या वेळीं अनेकांना आलेला होता. त्या वेळीं रा. ब. महादेव वासुदेव बर्वे हे कोल्हापूरचे कारभारी होते. शिवाजीमहाराजांना वेडे ठरवून राज्यभ्रष्ट करण्याचें कुटिल कारस्थान शिजविण्यांत रा. ब. बर्वे यांचेही अंग असावें असा भ्रम त्या वेळीं झालेला होता. 'केसरी-मराठा' या पत्रांचें पहिलें वर्ष अजून संपावयाचें होतें; तोंच हें कोल्हापूर-प्रकरण केसरींत प्रगट होऊं लागलें.

१८८१ सालच्या नोव्हेंबर महिन्याच्या शेवटींशेवटीं या कोल्हापूर-प्रकरणीं पुण्यात एक जाहीर सभा झाली. गोपाळराव हरी देशमुख अर्थात् लोकहितवादी हे या सभेचे अध्यक्ष होते. नाना भिडे नावाच्या कोल्हापूर येथील एका वकिलानें या सभेंत कारभारी बर्वे यांच्या वर्तनाचें मोठें रसभरित वर्णन केलें. येथपासून या कोल्हापूर-प्रकरणाला खूप रंग चढत गेला. कारभारी बर्वे यांनीं लिहिल्यासारखीं दिसणारीं कित्येक पत्रें या वेळीं पुण्यांतील प्रमुख मंडळींच्या अवलोकनांत आलेलीं होतीं. या पत्रांतील मजकूर कारभारी बर्वे यांची बेअब्रू करणारा होता. हीं पत्रें प्रथम ज्ञानप्रकाशानें प्रसिद्ध केलीं व पुढें तीं केसरी व मराठा या दोनहि पत्रात प्रसिद्ध झालीं. आपल्या विरुद्ध इतका गवगवा झाल्यावर आपण स्वस्थ बसलों तर लोक आपल्याला बाहेर तोंड काढूं देणार

नाहींत असें कारभारी बर्वे यांना वाटूं लागलें; म्हणून १८८२ च्या फेब्रुवारी महिन्यांत त्यांनीं आगरकर, टिळक, ज्ञानप्रकाशचे प्रकाशक वगैरे पुणेकर मंडळींवर मुंबई येथें अब्रुनुकसानीची फिर्याद केली.

हें कोल्हापूर-प्रकरण रंगूं लागण्याच्या सुमारास टिळक, आगरकर, आपटे ही मंडळी शनिवार पेठेंतल्या तांबे यांच्या वाड्यांत शेजारी म्हणून राहूं लागली होती. ही मंडळी प्रथम कांहीं दिवस तरी समाईक कुटुंबपद्धतीनें रहात होती असें म्हटलें तरी चालण्यासारखें आहे. टिळकांना यापूर्वीच एक मुलगी झालेली होती. शाळा वाढूं लागली त्या प्रमाणांत मोरोबादादांच्या वाड्यातली जागा अपुरी वाटू लागली. याच वाड्यांत कांहीं दिवस काढल्या-वर, १८८३ च्या आरंभीं शाळा गद्रेवाड्यात नेण्यांत आली. हा गद्रेवाडा शाळेला मिळविण्याची खटपट मुख्यतः टिळकांनींच केली. या खटपटींत अस-ताना टिळकांना सातारा जिल्ह्यांत माण तालुक्यांतल्या एका गांवीं कांहीं दिवस तळ देऊन रहावें लागलें होतें. याच निमित्तानें त्यांना सावंतवाडी व वडोदें या ठिकाणींहि जाऊन यावें लागलें.

या वेळीं टिळकांचा एकंदर खाक्या कसा असे व शाळेचें काम ते किती निष्ठेनें व निरलसपणानें करीत हें दर्शविणारी एक आख्यायिका* उपलब्ध आहे. न्यू इंग्लिश स्कूलमधील ड्रिलशिक्षक गंगाधरपंत दीक्षित, यांच्याकडे चिपळूणकर-टिळक-आगरकरप्रभृति शिक्षक मंडळी कांहीं निमित्तानें दुपारीं जेवावयाला गेली होती. पंक्तींत आग्रह सुरू झाला. 'आग्रहाचें कारण नाहीं; आपल्याला वेळेवर शाळेंतहि जावयाचें आहे' असें टिळकांनीं सांगून पाहिलें, पण त्यांचें ऐकणार कोण? शेवटीं पैज मारण्यापर्यंत मजल पोंचली. बेसनाचे एक्कवीस लाडू खाऊन टिळकांनीं पैज तर जिंकलीच; पण लेंडक शाळेंत जाऊन कामालाहि सुरवात केली. घरीं जाऊन विष्णुशास्त्री शाळेंत आले तों टिळकां-चा तास सुरू झालेला! इतर शिक्षकांनीं चिठ्ठी धाडून सबंध दिवसाची रजा कळविली होती तर कांहींजणांनीं उशिरा येण्याबद्दल कळविलें होतें. टिळकांनीं या दिवशीं आपले सगळे तास घेतलेच; कांहीं शिक्षक न आल्या-मुळें मोकळे पडलेले कांहीं वर्गहि त्यांनीं घेऊन टाकले! 'टिळक शाळेंत

* आठवणी व आख्यायिका : खंड १ : भा. १ : पृ. २५०-५१.

आहेत तोंपर्यंत तरी शाळा बुडण्याची मला काळजी नाहीं' असे उद्‌गार विष्णुशास्त्र्यांनीं या प्रसंगीं काढले. दुसऱ्या वर्षीहि न्यू इंग्लिश स्कूलचा मॅट्रिक्युलेशन परीक्षेचा निकाल चांगला झाला. बोडस नांवाच्या विद्यार्थ्यानें या वर्षीहि पहिली जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप पटकाविली. १८८१ च्या आरंभीं शाळेंतील विद्यार्थ्यांची संख्या पांचशें होती ती वर्षअखेर सहाशेंच्या आसपास गेली.

रावसाहेब बर्वे यांनीं टिळक-आगरकर यांच्यावर केलेल्या अब्रुनुकसानीच्या फिर्यादीचें प्रकरण १८८२ च्या फेब्रुवारीपासून पुढें पांच-सहा महिने पुरवलें. २९-२-८२ रोजीं प्रे. मॅजिस्ट्रेट मि. वेब यांच्यापुढें खटला निघून तो सेशन कमिट झाला. टिळक-आगरकरांच्या गुणांवर लुब्ध असलेले मुंबईचे एक अनोळखी गृहस्थ या प्रसंगीं जामीन राहण्याच्या तयारीनें पुढें आले. टिळकांच्या आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत टिळकांच्या प्रत्येक कार्यांत त्यांना मदत करणारे व आर्थिक व्यवहारांच्या बाबतींत टिळकांच्या संपूर्ण विश्वासाला पात्र ठरलेले श्री. यशवंत विष्णु अर्थात् अण्णासाहेब नेने म्हणजेच हे गृहस्थ! आपल्याकडे आकृष्ट झालेल्या माणसाला आपलासा करून घेण्याच्या विद्येंत कुशल असलेल्या टिळकांनीं नेने यांचें नांवगांव वगैरे सर्व महत्त्वाची माहिती तपशीलवार विचारून घेतली.* पुण्यातले एक प्रख्यात व्यापारी उरवणे हेहि अनाहूतपणें टिळकांना जामीन राहण्यासाठीं या प्रसंगीं पुढें आले. या उरवणे घराण्याचा नि टिळकांचा संबंधहि शेवटपर्यंत अबाधित राहिला.

टिळक-आगरकरांवर कोल्हापूर-प्रकरणीं झालेला खटला ही न्यू इंग्लिश स्कूलवर आपत्तीच होती; पण या आपत्तीला निर्भेळ आपत्ति म्हणता येणार नाहीं. या खटल्यामुळें टिळक-आगरकरांना मनस्ताप झाला, तुरुंगांत त्यांचे मनस्वी हाल झाले, वगैरे दृष्टींनी ही आपत्ति असली तरी, सत्येच्या दृष्टीनें हें प्रकरण इष्टापत्तीसारखेंच ठरलें. कायद्याच्या काटेकोर दृष्टीला टिळक-आगरकर दोषी दिसले हें खरें असलें तरी, समजस समाजाच्या सत्यान्वेषी दृष्टीला खरे दोषी कोण हें समजलेंच होतें. टिळक-आगरकरांवरील खटल्याच्या कामीं आर्थिक साहाय्य कमी पडूं नये म्हणून माधवराव नामजोशी, [illegible]

*आठवणी व आख्यायिका : ख १ : भा. १ : पृ २४५

नेम्हां निधीला साहाय्य करून लोकांनी आपलेपणा प्रगट केला. गोपाळराव गोखले प्रभृति डेक्कन कॉलेजमधील विद्यार्थ्यांनी एक नाट्यप्रयोग करून त्याचें उत्पन्न टिळक-आगरकरांवरील खटल्याच्या खर्चासाठीं दिलें. टिळक-आगरकरां विषयीं समाजाला वाटत असलेलें ममत्व यानें वर्षांच्या शेवटीं न्यू इंग्लिश स्कूलला कसें लाभकारक ठरलें हें एका प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टीवरूनच स्पष्ट होत आहे. न्यू इंग्लिश स्कूलसारख्या संस्थेजवळ चांगलासा प्रयत्नगृह नाहीं याचें अकोल्यासारख्या दूरच्या ठिकाणीं राहणाऱ्या चार वकिलांना वैषम्य वाटलें. या शाळेचें हें वैगुण्य अशतः नाहींसें व्हावें म्हणून, श्री पांडुरंग गोविंद वकील, रघुनाथ नरसिंह मुधोळकर, देवराव विनायक दिगंबर व दत्तात्रय विष्णु भावट या वकील-चतुष्टयानें दि २३।१२।८२ ला शाळेच्या चालकांना एक पत्र लिहिलें व प्रत्येकाची तीनशें रुपयांची देणगी या हिशोबानें बाराशें रुपये संस्थेकडे पाठवून दिले.

या व अशा अनेक दृष्टींनीं कोल्हापूर-प्रकरण हें न्यू इंग्लिश स्कूलला इष्ट पत्तीसारखें ठरलें १८८२ च्या मार्च महिन्यांत घडलेली एक गोष्ट मात्र या शाळेच्या दृष्टीनें शुद्ध आपत्तीच होती आपल्या अवघ्या बत्तीस वर्षांच्या इह-लोकच्या जीवनक्रमात कित्येक पिढ्यांना पुरेल इतकी जागृति करून व चिर जीव ठरणाऱ्या अनेक संस्थांची स्थापना करून, निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर १७।३।८२ रोजीं इहलोक सोडून गेले. न्यू इंग्लिश स्कूल व त्यां-तून उत्क्रांत झालेलें फर्ग्युसन कॉलेज यांच्यावर पहिल्या दहापंधरा वर्षांतच यमराजाचा जो रोष व्हावयाचा होता त्याची ही कठोर चुणूकच होती! आपल्या सहकाऱ्यांच्या कर्तृत्वाचा पूर्ण विश्वास पटल्यावर विष्णुशास्त्री मरण पावले, हीच त्यांतल्या त्यांत समाधानाची बाब मानिली पाहिजे

कोल्हापूर प्रकरणातले लेख लिहितांना व पत्रें छापतांना टिळक आगरकर ज्या लोकांवर भरंवसा ठेवून राहिले, त्यांतल्या कित्येकांनीं त्यांना ऐन वेळीं दगा दिला या दोघांवरील खटला सेशन कोर्टांत दि ६।७।८२ ला सुरू झाल्यावर, दि. ७ रोजीं दोघांनींहि प्रांजळ बुद्धीनें माफी लिहून दिली. पण, बर्वेमहाशयांचें येवढ्यानें समाधान झालें नाहीं. शेवटीं, दि. १७।७।८२ रोजीं उभयतांनाहि चार महिन्यांची साध्या कैदेची शिक्षा सांगण्यांत आली व मुंबईच्या डोंगरीच्या तुरुंगांत त्यांची रवानगी करण्यात आली. माफीचे वगैरे दिवस

वजा जाऊन त्यांना या कारागृहांत एकंदर १०१ दिवस काढावे लागले. दि. २६।१०।८२ रोजीं सकाळीं त्यांची कारागृहांतून मुक्तता झाली. या कारागृहात असतांना आगरकरांनीं शेक्स्पिअरच्या हॅम्लेट नाटकाचें 'विकारविलसित' नांवानें भाषांतर केलें. 'डोंगरीच्या तुरुंगांतले आमचे १०१ दिवस' या आगरकरांनीं लिहिलेल्या पुस्तकांत या तुरुंगांतल्या टिळक-आगरकरांच्या अनुभवांचें वर्णन दिलें आहे.

तुरुंगांत मिळणारें अन्न, कोठडींत प्रस्थापित झालेलें मत्कुणांचें साम्राज्य इत्यादि प्रकारांमुळें टिळक-आगरकरांचे तुरुंगात फार हाल झाले. तीन-साडेतीन महिन्यांच्या अवधींत टिळकांचें वजन २४ पौंड कमी झालें व आगरकरांचें १६ पौंड कमी झालें. पहिले २९ दिवस तर त्यांना लिहिण्यावाचण्याचीं साधनेंहि मिळालीं नाहींत. कॉलेजमध्यें असतांना या उभयतांनीं जे वाद केले होते व जे मनोरथ रचले होते त्यांची उजळणी करीत त्यांनीं या कारागृहांत कित्येक रात्री घालविल्या. वादाच्या भरांत हे स्नेही कित्येक वेळां इतक्या मोठ्यानें बोलत कीं रखवालदारांना खोलीशीं येऊन त्यांना इशारा द्यावा लागे.* आगरकर मूळपासून दमेकरी असल्यामुळें त्यांच्या वांटणीच्या अन्नांतला निम्मा भाग त्यांस खाववत नसे. अधिकाऱ्यांची परवानगी घेऊन, टिळकांनीं आपल्या वांटणीच्या अन्नांतला आगरकरांना चालणारा भाग त्यांना देण्याची व त्यांना न चालणारा भाग आपण स्वीकारण्याची पद्धत सुरू ठेविली होती.‡

टिळक-आगरकर डोंगरीच्या तुरुंगांतून सुटले त्या वेळीं त्यांचें स्वागत कसें करण्यांत आलें याविषयींची मनोरंजक माहिती प्रसिद्ध झालेली आहे§ : **(तुरुंगाजवळ) सुमारें शंभर सवारी गाड्या आलेल्या असून लोकसमाज सुमारें दोन हजारांवर जमला होता. कोणी एक गुजरचा उपदेशक पहांटे चार वाजतांच मोठी दोन घोड्यांची गाडी, टिळक-आगरकरांस पागोटें, शालजोडी, पोशाख घेऊन तुरुंगाचे दारापाशीं आला. बरोबर तो एक न्हावीहि घेऊन गेला होता. सुपरिंटेंडंटचे**

---

* आठवणी व आख्यायिका : खं. १ : भा. १ : पृ. १२४.

‡ आठवणी व आख्यायिका : ख. १ भा. १ : पृ. ५–६.

§ आठवणी व आख्यायिका : खं. १ : भा. १ : पृ. ४७.

परवानगीनें उभयतांची श्मश्रु, स्नान, पोशाख वगैरे करवून त्यानें त्यास आपल्या गाडींत आणून बसविलें होतें. सूर्योदयास मिरवणूक चालू झाली. मिरवणुकींत सर्व मंडळी पायींच चालली होती. दि. २८ ला टिळक आगरकर पुण्यास आले. डेक्कन कॉलेजमधील ५०।७५ विद्यार्थी खडकी स्टेशनवर त्यांना सामोरे गेले होते. टिळक आगरकर या तरुणांच्या डब्यांतून पुण्यापर्यंत आले. 'प्रजेच्या सर्वांगीण सुधारणेसंबंधानें आम्ही झटून प्रयत्न करणार, आम्हांस निर्मळ तरुणांचें साह्य हवें' हें या तरुणांशीं बोलण्याच्या टिळक आगरकरांच्या म्हणण्यांतलें सार होतें. मुंबईप्रमाणेंच पुण्यासही टिळक आगरकरांची मिरवणूक काढण्यांत आली होती. ही मिरवणूक गोसावी-पुऱ्यापासून अप्पा बळवंत चौकापर्यंत चालली होती, असें समजतें. पुण्यास आल्यादिवशींच टिळक-आगरकरांनीं शाळेतलें काम सुरू केलें. आपल्या गैरहजेरींत आपल्या सहकाऱ्यांनीं मोठ्या उमेदीनें काम चालविलें, आपल्या सहचारीवर्गांत दोन नवे पदवीधर समाविष्ट झाले, इत्यादि गोष्टी पाहून उभयतांना समाधान वाटलें.

टिळक-आगरकरांच्या गैरहजेरींत घडलेल्या एका गोष्टीमुळें लोकांच्या हें ध्यानांत आलें कीं, 'न्यू इंग्लिश स्कूल' या संस्थेला सरकारदरबारींहि चांगली मान्यता मिळत चालली आहे. हिंदुस्थानांतील शिक्षणप्रसाराच्या प्रश्नाचा सांगोपांग विचार करण्यासाठीं हिंदुस्थान सरकारनें दि. ८-२-१८८२ ला एक कमिशन नेमलें होतें. या कमिशनचे अध्यक्ष डॉ. हंटर या नांवाचे इंग्रज गृहस्थ होते. या गृहस्थांनीं ८-९-१८८२ ला न्यू इंग्लिश स्कूलला भेट दिली व शाळा पाहून आपल्याला फार संतोष वाटला असें त्यांनीं बोलून दाखविलें. स्कूलचे मुख्याध्यापक श्री. वामनराव आपटे यांची या कमिशनपुढें ९-९-१८८२ ला साक्ष झाली. या कमिशनच्या नेमणुकीपूर्वी मिशनरी लोकांनीं इंग्लंडमधून कोणता मतप्रचार केला होता याची वामनराव आपटे यांना चांगली कल्पना होती. सरकारी तिजोरींतून खर्च होणारा बहुतेक सर्व पैसा प्राथमिक शिक्षणावर खर्च व्हावा आणि दुय्यम व उच्च प्रतीचें शिक्षण देण्याची जबाबदारी बिनसरकारी संस्थांवर सोपविण्यांत यावी असा आग्रह धरणाऱ्या पाद्री मिशनरी लोकांचा कावा हा होता कीं, या निमित्तानें दुय्यम व उच्च शिक्षणाची सारी सत्ता आपल्या हातीं मिळवितां यावी. आपटे

यांच्या लक्षांत हा कावा आलेला असल्यामुळें, त्यांनीं आपल्या साक्षींत निर्भयपणानें असें सांगितलें कीं, प्राथमिक शिक्षणाप्रमाणेंच दुय्यम व उच्च शिक्षणावरहि सरकारी पैसा खर्च झाला पाहिजे. हें शिक्षण देण्याची जबाबदारी खाजगी संस्था पत्करूं इच्छितील यांविषयीं सरकारनें विश्वास बाळगावा, असें त्यांनीं सरकारला बजावलें. हें काम करणाऱ्या खाजगी संस्थांच्या अंतर्गत कारभारांत सरकारनें ढवळाढवळ करूं नये आणि खाजगी संस्थांना द्रव्यद्वारा मोटमर मदत करावी असेंहि सुचविण्याला आपटे यांनीं कमी केलें नाहीं. संस्था चालविण्याच्या मिषानें मिशनरी लोक खिस्ती धर्माचा फैलाव करतात, अशा संस्थांतून विद्यार्थ्यांचा धर्म, त्यांची संस्कृति, त्यांची मायभाषा, इत्यादींची गळचेपी होतें, ही तक्रारहि करण्याला आपटे कचरले नाहींत.

१८८३ या वर्षीं शाळेची उत्तरोत्तरच भरभराट होत गेली. मराठी शिक्षण पूर्ण केलेल्या विद्यार्थ्यांचें इंग्रजी शिक्षण झपाट्यानें व्हावें या हेतूनें १८८२ च्या आरंभीं शाळेंत Preparatory class सुरू करण्यांत आला होता. अशा विद्यार्थ्यांच्याकडून वर्षांत इंग्रजी दोन इयत्तांचें शिक्षण सहज पुरें केलें जातें हा अनुभव आल्यामुळें, १८८३ च्या आरंभीं या वर्गाविषयींच्या महत्त्वाकांक्षेत वाढच झाली. वर्षांत तीन इयत्ता पुऱ्या करून घेण्याच्या उद्योगाला शिक्षक मंडळी लागली व हा उद्योग त्यांनीं यशस्वी करून दाखविला. शाळेचें यश वाढूं लागलें असल्यामुळें व कोल्हापूर-प्रकरणांत आगरकर-टिळकांनीं संस्थानिकांची बाजू निर्भयपणें मांडली असल्यामुळें, संस्थानिकहि शाळेकडे आपलेपणानें पाहूं लागले होते. कागल संस्थानचे धनी श्रीमंत आबासाहेब घाडगे यांनीं १८८३ च्या सप्टेंबर महिन्यांत शाळेला भेट दिली. शाळेंतील हुशार विद्यार्थ्यांना बक्षीस देण्यासाठीं दरसाल कांहींतरी रक्कम संस्थेच्या हातीं असावी यासाठीं श्रीमंत आबासाहेब घाडगे यांनीं या भेटीच्या प्रसंगीं संस्थेला ५०० रुपये देणगी म्हणून दिले. या वर्षींच्या मुंबई विद्यापीठाच्या मॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेंत शाळेला अपूर्व यश लाभलें. त्यापूर्वीच्या वर्षी शाळेला जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति एकएक मिळत होती; या वर्षी या दोन्ही शिष्यवृत्त्या शाळेनें पटकाविल्या. भास्कर विष्णु जोशी या विद्यार्थ्याला पहिली व नारायण सखाराम पानसे या विद्यार्थ्याला दुसरी, याप्रमाणें दोन्ही शिष्यवृत्त्या शाळेकडे आल्या.

शाळेची वाढ होऊन लवकरच आपले कॉलेज पुण्यात चालू होणार असा विश्वास मंडळींना वाटूं लागला. शाळेच्या शिक्षकमंडळींत कॉलेजच्या कल्पनेची चर्चा होऊं लागली तेव्हां असें दिसूं लागलें की, खुद्द शिक्षकमंडळींनाच बी. ए. अगर एलएल्. बी. प्रोफेसरपेक्षा एम्. ए. प्रोफेसर अधिक मान्य वाटत आहे. या चर्चेवरून बोध घेऊन टिळकांनी मिळून एकवार एम्. ए.ला बसण्याचा संकल्प केला; आणि ८३-८४ सालीं कांहीं महिने या परीक्षेच्या अभ्यासासाठीं ते मुंबईस जाऊनहि राहिले. बापूजी नारायण टेकणे व टिळक हे मुंबईस एकत्र अभ्यास करीत असत. दोघेहि गणित विषयच घेऊन एम्. ए. ला बसत होते. गणित विषयांत टिळक अत्यंत पारंगत असल्यामुळे, टेकणे यांना टिळकापासून पुष्कळच शिकावें लागलें; पण, अखेरीस परीक्षेत टिळक नापास झाले व टेकणे पास झाले!

१८८३-८४ सालींच बडोद्याचे अधिपति श्रीमंत सयाजीराव महाराज हे पुण्यास आले व त्यांनी 'न्यू इंग्लिश स्कूल'ला भेट दिली. या भेटीनंतर घडलेली एक गोष्ट आख्यायिकेच्या रूपानें प्रसिद्ध झालेली आहे. टिळक व वामनराव आपटे हे दोघेहि विद्यार्थिवर्गामध्यें पूज्य मानिले जात असले तरी, या दोघांच्या वृत्तींतल्या फरकामुळे विद्यार्थ्यांची भक्ति टिळकांवर जास्त का असे हें या आख्यायिकेवरून* स्पष्ट होते. सयाजीराव महाराजांनी दिलेल्या पैशांतून विद्यार्थ्यांना खाऊ वाटावयाचा होता. विद्यार्थ्यांना एकदां दिवाणखान्यांत बोलवून तो वाटण्यांत आला. टिळक-आपटे वगैरे शिक्षकांनी सूचना दिल्यामुळें पुढे घुसलेले प्रौढ विद्यार्थी मागेच राहिले. "लहान मुलांना खाऊ वाटून द्या"- देतांच विकत आणलेल्या जिनसांतले सगळे चांगले जिन्नस खलास झाले. उरलेला गाळ प्रौढ विद्यार्थी घेईनात. बाजूला काढून ठेविलेली पेढे बर्फीचीं ताटें पुढे काढून टिळकांनी तीं या विद्यार्थिवर्गापुढे ठेविलीं. वामनराव आपटे यांना हें पटलें नाहीं. प्रत्येक विद्यार्थ्याला दोनदोन पेढे व बर्फीची एक वडी द्या, असें त्यांनी सांगितलें. शिस्त निमूटपणे पाळणाऱ्या टिळकांनी तसें केलें, पण, हा असला प्रकार त्यांना आवडला नाहीं. आपटे यांस न कळत, त्यांनीं आपल्याजवळचे पैसे शिपायाजवळ दिले, नवी मिठाई आणविली, आणि ती वाटून घेण्यास मुलांस परस्पर सांगितलें.

* आठवणी व आख्यायिका : खंड २ : पृष्ठ ४५४-४५५.

सयाजीराव महाराजांच्या या आगमनाच्या प्रसंगीं पुण्यांत घडलेल्या सर्वच गोष्टी येथें सांगण्याचें कारण नाहीं. यापूर्वी प्रसिद्ध न झालेली एक गोष्ट मात्र या ठिकाणीं नमूद करणें अवश्य आहे. सयाजीराव महाराज व टिळक याची वैयक्तिक स्वरूपाची भेट या वेळीं झालेली होती. पाश्चात्य देशात वाढत चाललेलें विज्ञान हिंदुस्थानातल्या अधिकाधिक लोकांनीं हस्तगत केलें पाहिजे ही इच्छा टिळकांच्या मनांत सतत वास करीत असल्यामुळें, या भेटीच्या प्रसंगीं, विज्ञानाच्या अध्ययनासाठीं टिळकांनीं युरोपांत जावें, असा विषय निघाला होता. ही गोष्ट घडली असती तर सयाजीराव महाराजांनीं टिळकांच्या या अध्ययनाच्या खर्चापैकीं कांहीं खर्च दिला असता! पण ही गोष्ट घडून येण्याचा योग नव्हता!

१८८३-८४ सालीं न्यू इंग्लिश स्कूलला सरकारदरबारात किती मान्यता मिळूं लागली होती हें १८८४ सालच्या प्रारंभींच झालेल्या एका समारंभाच्या वेळीं आणखीहि सिद्ध झालें. प्रांताच्या गव्हर्नरनें एकाद्या खाजगी शिक्षण संस्थेच्या बक्षिस-समारंभाच्या प्रसंगीं अध्यक्ष म्हणून उपस्थित रहावें ही गोष्ट त्या काळीं क्वचित् घडणारी होती. १३-२-८४ रोजीं गद्रेवाड्यात न्यू इंग्लिश स्कूलचा बक्षिस-समारंभ मोठ्या थाटात साजरा झाला. मुंबईचे गव्हर्नर सर जेम्स फर्ग्युसन हे समारंभाचे अध्यक्ष होते. गव्हर्नरसाहेबांनीं या प्रसंगीं शाळेला १२५० रुपये देणगी म्हणून दिले. शाळा सरकारमान्य होत असली तरी तिचें मूळचें उद्दिष्ट कायम आहे हें पाहून विष्णुशास्त्र्यांच्या आत्म्याला निश्चित समाधान वाटलें असेल! शाळेचें मूळ उद्दिष्ट कायम होतें ही गोष्ट या समारंभाबद्दल लिहिताना मुंबईच्या टाइम्सनें दि. २०-२-८४ रोजीं जे उद्गार काढिले त्यावरून स्पष्ट होत होती. या उद्गारातला पुढील भाग* तर फारच स्पष्टोक्तिपूर्ण आहे :

No doubt these enthusiastic men will preach love of country to their disciples; but it is better after all to have patriotism preached by educated men than wander-

* The History of the Deccan Education Society : Pp. 17-18

ing mendicants. We have given the people of India education and now it is for us to do all we can to have the moral energy created on our side and not against us. (ही उत्साही मंडळी आपल्या विद्यार्थ्यांना देशाभिमान शिकवितील हें खरें; पण भ्रमंती करणाऱ्या भिक्षुकांनीं देशाभिमान शिकविण्यापेक्षां, सुशिक्षित लोकांनीं तो शिकविला तर तेंच एकंदरीनें श्रेयस्कर होय! आपण हिंदुस्थानांतल्या लोकांना शिक्षण देऊन चुकलों आहों. या शिक्षणामुळें निर्माण होणारें नैतिक सामर्थ्य आपल्या बाजूला रहावें, तें आपल्याविरुद्ध जाऊं नये, यासाठीं आपण आतां शक्य तो प्रयत्न केला पाहिजे.)

कॉलेज काढण्याची कल्पना १८८३ सालींच शाळेच्या चालकांच्या मनांत रुजली होती. १८८४ सालीं तिचा चांगलाच विकास झाला. लवकरच निघणारें कॉलेज, पूर्वींच निघालेली शाळा व पुढें होणारी संस्थांची वाढ या सर्वांना आपल्या पोटांत सामावून घेणारी एक मध्यवर्ती संस्था स्थापणें शाळेच्या चालकांना अवश्य वाटूं लागलें. २४-१०-८४ रोजीं गद्रे-वाड्यांत निमंत्रित विद्वानांची व प्रतिष्ठितांची सभा होऊन 'डेक्कन एज्युकेशन सोसायटी'ची रीतसर स्थापना झाली. सोसायटीचे आद्य घटक म्हणून ज्या सात सभासदांचीं नांवें टिळकांनीं सुचविलीं त्यांत टिळक-आगरकर-आपटे यांच्याशिवाय माधवराव नामजोशी, वासुदेवराव केळकर, महादेव चिमणाजी गोळे व नारायण कृष्ण धारप हीं नांवें होतीं. पेट्रन्स व फेलोज् म्हणून जीं सव्वीस नांवें संमत झालीं त्यांत मुंबईचे गव्हर्नर सर जेम्स फर्ग्युसन, प्रिन्सिपल वर्ड्सवर्थ, प्रो. सेल्बी, डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर, रा. सा. विश्वनाथ नारायण मंडलीक, न्या. रानडे, नामदार का. त्रिं. तेलंग, रा. सा. सीताराम विश्वनाथ पटवर्धन, रा. सा. डॉ. विश्राम रामजी घोले अशा सर्वमान्य मंडळींचीं नांवें होतीं. डॉ. भांडारकर यांनीं या प्रसंगीं डेक्कन एज्युकेशन सोसायटी स्थापन करणाऱ्या तरुणांच्या निःस्वार्थीपणाचें मोकळ्या मनानें कौतुक केलें. टिळकांसंबंधीं बोलतांना डॉक्टरमहाशय म्हणाले*:

या सात गृहस्थांच्या अग्रभागीं एका फर्स्टक्लास एल्एल्. बी. चें नांव आहे.

* टिळक-चरित्र : पूर्वार्ध : पृ. १६६.

हा गृहस्थ या खाजगी शिक्षणाच्या नादीं न लागता व स्वहिताकडे पाहून सरकारी नोकरी धरता तर रावसाहेब होऊन कोठें तरी चैनींत असता!

डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या कौन्सिलची पहिली सभा १२-११-८४ ला झाली व कॉलेजला 'फर्ग्युसन कॉलेज' असें नांव देण्याचें या सभेंत ठरलें. या कल्पनेला गुव्हर्नरसाहेबांनीं मान्यता दिल्यावर, १९-११-८४ रोजीं कॉलेजला मान्यता मिळावी अशा आशयाचा अर्ज मुंबई विद्यापीठाकडे धाडण्यात आला. मान्यता मिळणार ही खात्रीच असल्यामुळें, पुढील सर्व तयारी जोरांत सुरू झाली. १९-१२-८४ रोजीं विद्यापीठाच्या सीनेटनें कॉलेजला मान्यता दिली. प्रथम तीन वर्षे या कॉलेजनें फक्त प्रीव्हियसचा एक वर्ग चालवावा, अशी अट घालण्यांत आली होती. नवीन वर्षाच्या आरंभापासून गद्रेवाड्यांत फर्ग्युसन कॉलेजचा प्रथम वर्षाचा वर्ग सुरू झाला.

डेक्कन कॉलेजमधील विद्याभ्यास संपल्यावरहि टिळक आपलेपणानें डेक्कन कॉलेजमध्यें पुष्कळ वेळां जात येत असत, असें दिसतें. निदान स्वतःचें कॉलेज सुरु करण्याच्या काळापर्यंत तरी डेक्कन कॉलेजचे माजी विद्यार्थी म्हणून ते आपलेपणानें त्या कॉलेजमध्यें जात येत असत. त्या वेळीं डेक्कन कॉलेजचीं संमेलनें मे महिन्यांत होत असत. अशा संमेलनांना टिळक जात असत. अशा एका प्रसंगीं त्यांनीं हातांत सांखळी घेऊन बरोबरीच्या एका पारशी गृहस्थाला 'आडवें गंध लाविलें अशी माहिती मिळते. डेक्कन कॉलेजच्या विद्यार्थ्यांचाहि टिळक-आगरकरांविषयींचा आपलेपणाचा भाव कायम होता. १८८२ सालीं टिळक-आगरकर सुटून पुण्यास परत आल्यावर, कोजागिरीचे रात्रीं डेक्कन कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं त्या उभयतांना दुग्धपानासाठीं बोलाविलें होतें, अशी माहिती प्रसिद्ध झालेली आहे. टिळकांना डेक्कन कॉलेजचें ग्रंथालय मोठें आकर्षक वाटत असलें पाहिजे; आणि व्यासंगी टिळक वाचनासाठीं या काळांत मधूनमधून डेक्कन कॉलेजमध्यें जात असले पाहिजेत.

१८८५ च्या आरंभीं फर्ग्युसन कॉलेज सुरु झालें तेव्हा प्रो. टिळकांच्या नांवावर गणित हा एकच विषय टाकण्यांत आला होता. पण अडल्या वेळीं टिळक कोणताहि विषय शिकवूं शकतात असा त्यांचा न्यू इंग्लिश स्कूलमधील लौकिक असल्यामुळें आणि टिळकांचें संस्कृत भाषेवरील प्रभुत्व नंदर्गीकर, खरे या शास्त्रीद्वयालाहि मान्य असल्यामुळें, टिळकांना कॉलेजमध्यें गणित व

संस्कृत हे दोन विषय देण्यात आले. पहिल्या वर्षी 'प्रीव्हियस'च्या वर्गाला कालिदासाचें 'मालविकाग्निमित्र' हें नाटक लावण्यात आलें होतें व काव्य म्हणून भर्तृहरीचीं शतकें नेमण्यात आलीं होतीं. वामनराव आपटे यांनी नाटक शिकविण्याचें काम स्वतःकडे घेतलें व काव्य शिकविण्याचें काम टिळकावर सोंपविलें. या वेळीं 'न्यू इंग्लिश स्कूल'मध्यें मॅट्रिक्युलेशनच्या वर्गाच्या तीन-चार तुकड्या पडत असत. त्या सर्वांना गणित शिकवून टिळक कॉलेजच्या वर्गांत गणित व संस्कृत काव्य हे विषय शिकवीत असत. शिवाय प्रसंग-विशेषीं खालच्या वर्गावर जाऊन कोणताहि तास घेण्याची टिळकाची तयारी असे. खूप मोठ्या आवाजांत दररोज पाच-सहा तास शिकविणारे टिळक शाळेंतमधीं कोणी पाहिले नाहींत.

टिळकाच्या हाताखालीं शिकण्याचें भाग्य ज्यांना लाभलें अशा काहीं गृहस्थांनीं टिळकाविषयींच्या आठवणी लिहिल्या आहेत. त्यावरून असें दिसतें कीं, शिक्षक या नात्यानें टिळकाचा बुद्धिमान् विद्यार्थ्यांना चांगलाच उपयोग होत असला तरी, मध्यम नि सामान्य विद्यार्थ्यांना त्याचें शिकविणें डोक्या-वरून पाणी गेल्यासारखें वाटत असलें पाहिजे.

> शिष्टा क्रिया कस्यचिदात्मसंस्था ।
> संक्रांतिरन्यस्य विशेषयुक्ता ।
> यस्योभयं साधु स शिक्षकाणाम् ।
> धुरि प्रतिष्ठापयितव्य एव ।

हें कालिदासानें केलेलें उत्तम शिक्षकाचें वर्णन मि. वामनराव आपटे यांना लागू पडत असे, टिळकांना तें लागू पडत नसे. हातांतील विषय शिकवितांना थोडें विषयांतर करून, अवांतर गोष्टी सांगून, हसत-खेळत शिकविण्याची आगरकरांची हातोटी टिळकाचे ठिकाणीं नव्हती, असें दिसतें. लोकप्रियता मिळविणाऱ्या शिक्षकाचे अंगीं अवश्य असणारी ही शैली टिळकांना साधत नसली तरी, इतर अनेक गुणामुळें मात्र, टिळक विद्यार्थिवर्गांत प्रियहि असत व पूज्यहि समजले जात.

गणित शिकवितांना टिळकाची दृष्टि कोणती असे हें गणित विषयाबद्दल त्यांनीं पुढें एके प्रसंगीं जे उद्गार* काढिले त्यावरून स्पष्ट होत आहे :

---

* आठवणी व आख्यायिका . खंड १ : भा. १ : पृष्ठ ७९.

" गणिताची ज्याला गोडी नाहीं किंवा गणितांत ज्याचें डोकें शिरत नाहीं त्याची विचारसरणी एक प्रकारें अपक्व रहाते. गणिताच्या योगानें विचारांची साखळी अनुटित व सुसंबद्ध होते. गणितांत काव्य नाहीं हें खोटें आहे. शाळांतून किंवा कॉलेजांतून जें गणित शिकवितात तें खऱ्या गणितशास्त्राची पहिली पायरी आहे तुम्ही जसे काव्यांत तल्लीन होतां तसे आम्ही गणितांत तल्लीन होतों. मुळाशीं पाहिलें म्हणजे सर्व शास्त्रें एकरूप आहेत. माणसानें आपल्या सोईसाठीं शास्त्रें निरनिराळीं कल्पिलीं; पण, सर्व शास्त्र मुळांत एक आहेत. गणितांत काव्य आहे व काव्यांत गणित आहे."

१८८६ सालीं कॉलेजच्या वर्गांत टिळकांनीं 'मेघदूत' काव्य शिकविलें. श्लोकाचें छुतलब्धीत इंग्रजी भाषांतर करणें हा टिळकांच्या शिकविण्याचा हेतु नव्हता. काव्यांतहि गणिताची रीतिबद्धता असते असें मानणाऱ्या टिळकांनीं 'मेघदूता'च्या एका श्लोकांतून दुसरा श्लोक नैसर्गिक क्रमानें कसा निष्पन्न होतो हें दाखवीतदाखवीत 'मेघदूत' शिकविलें. शिकविण्याला आरंभ करण्यापूर्वी टिळकांनीं मल्लिनाथाची टीकाहि बाजूला ठेवून हें काव्य अनेक वेळां वाचून काढलें होतें. कॉलेजमध्यें विद्यार्थी असल्यापासूनच, कालिदासाच्या काव्यसृष्टीशीं टिळकांचा उत्तम प्रकारचा परिचय झालेला होता. त्या काळीं छापील पुस्तकांचा सुळसुळाट सध्यांच्या इतका झालेला नसल्यामुळें, काव्यादि विषयांचें अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांना काव्याचे सर्गच्या सर्ग आपल्या हातानें लिहून घ्यावे लागत. डेक्कन कॉलेजमध्यें असतांना टिळकांनीं रघुवंशाचे कांहीं सर्ग अशा प्रकारें लिहून घेतले होते. टिळकांचें मेघदूत काव्याचें शिकविणें परीक्षार्थी विद्यार्थ्यांना कितपत रुचलें असेल हें सांगतां येत नाहीं; पण, नव्या दृष्टीचा लाभ होण्यात आनंद मानणाऱ्या विद्यार्थ्यांना हें शिकविणें उत्साहवर्धक वाटलें असेल, यांत शंका नाहीं.

शाळाकॉलेजांत ठराविक विषय शिकवावे लागत असले तरी, या काळांत टिळकांचें अनेक विषयांसंबंधींचें वाचन चाललें असलें पाहिजे. पुढें कांहीं वर्षांनंतर न्यू इंग्लिश स्कूलमध्यें चालू करण्यासाठीं निरनिराळ्या विषयांचीं क्रमिक पुस्तकें लिहिण्याचा प्रश्न निघाला व वेगवेगळ्या शिक्षकांकडे वेगवेगळे विषय सोंपविण्यांत आले. या प्रसंगीं Mechanics या विषयावरील पुस्तक लिहिण्याची कामगिरी टिळकांकडे देण्यांत आलेली होती. माधवराव गोळे

फर्ग्युसन कॉलेजमध्ये 'विज्ञान' हा विषय शिकवीत. त्यांनी एकदां एक छोटेखानी विमान तयार केले. हें विमान उडवून दाखविण्याचा प्रयोग सुरू झाला. यांत्रिक रचनेंत कांहीं दोष राहून गेल्यामुळें गोळे यांना विमान उडवून दाखवितां येईना. प्रोफेसर मंडळींपैकीं इतरांनीं खटपट करून पाहिली; तरी कांहीं जमेना! शेवटीं, सूक्ष्म दृष्टीच्या टिळकांनीं हा यांत्रिक दोष दुरुस्त केला व विमान उडवून दाखविलें. आगरकरांना विज्ञानाची महती कळून होती; पण, त्याचें प्रायोगिक अध्ययन त्यांनीं केलेलें नव्हतें. टिळकांची ही करामत पाहून त्यांना स्वाभाविकपणेंच मोठा अचंबा वाटला.

कोल्हापूर-प्रकरणांतील शिक्षा भोगून आगरकर-टिळक परत आले तेव्हां त्यांना असें आढळून आलें कीं, केसरी-मराठा हीं पत्रें व 'आर्यभूषण' छापखाना या संस्था आपल्या गैरहजेरींत चालू राहिल्या असल्या तरी, त्यांच्यावरील कर्जाचा बोजा वाढलेला आहे. हा बोजा कमी करण्याकडे या दोघांना लक्ष द्यावें लागे. वर्तमानपत्रांतील लेखनाचे परिणाम काय होतात हें कोल्हापूर प्रकरणामुळें आपल्यांच्या लक्षांत आलें. त्यामुळें त्यांचा वृत्तपत्रांत लिहिण्याच्या बाबतींतला उत्साह हळूहळू मंद होत चालला. आगरकरांची लेखणी मात्र यापुढें जास्तजास्तच तेजस्वी होत गेली; आणि केसरीच्या लेखनाची पुष्कळशी जबाबदारी आगरकर स्वतःवर घेऊं लागले. शाळाकॉलेजच्या कामाचा व्याप वाढू लागल्यामुळें आणि लिहिण्याची प्रकृतिसिद्ध आवड कमीच असल्यामुळें, टिळक या सुमारास 'केसरी'त अगर 'मराठ्या'त फारसें लिहीत नसत. छापखान्याची व्यवस्था सुधारण्याकडे त्यांनीं आपलें लक्ष वळविलें. 'मराठ्या'त लिहिण्याचें काम प्रो. वासुदेवराव केळकर हे मोठ्या हौसेनें करीत हळूहळू 'न्यू इंग्लिश स्कूल'च्या शिक्षक मंडळींच्या विविध विषयांवर चर्चा सुरू झाल्या. नव्यानें उत्पन्न होणाऱ्या सामाजिक प्रश्नांबाबतचीं आपलीं मतें एकरूप नाहींत, हें सर्वांच्या लक्षांत आलें. आपटे-टिळक-आगरकर हे तांब्याच्या वाड्यांत एकत्र रहात; तेथें या चर्चा जोरानें चालत; व शाळेंतहि या चर्चेचे प्रतिध्वनि उमटत. 'केसरी-मराठा' हीं पत्रें व 'आर्यभूषण' छापखाना या सर्व संस्था सामुदायिक मालकीच्या असल्यामुळें, पत्रांतील विचारप्रदर्शन बहुमताचें निदर्शक असावें अशी आवश्यकता वाटूं लागली. आगरकरांचें मन या बहुमताशीं जुळतें नसल्यामुळें, लोकदृष्ट्या ते 'केसरी'चे संपादक असूनहि,

स्वतःच्या नांवावर केसरींत लेख लिहिण्याचा प्रसंग त्याच्यावर आला. इकडे कॉलेज काढण्याच्या खटपटी जोरांत चालल्या होत्या त्या अवधींतच या मतभेदांनाहि चांगलीच उकळी फुटूं लागली होती!

यापूर्वींच मुंबईचे बेहेरामजी मेरवानजी मलबारी यांनीं सुरू केलेल्या एका वादामुळें डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या प्रमुख मंडळींच्या विचारांना खूप चालना मिळाली होती. बालविवाह व असंमत वैधव्य या अनिष्ट गोष्टींना आळा बसावा यासाठीं सरकारनें कायदा करावा असा मतप्रचार मलबारी शेठजींनी सुरू केला होता. संस्थेंतले आगरकरप्रभृति कांहीं धुरीण अशा बाबतींत कायदा व्हावा अशा मताचे होते. टिळक-नामजोशीप्रभृति मंडळींना बालविवाह अगर असंमत वैधव्य हे प्रकार इष्ट वाटत होते, असें नव्हे. तथापि, कायद्याच्या बळावर सामाजिक रूढि सुधारण्याची पद्धत या मंडळींना अमान्य होती. या प्रश्नावर संस्थेच्या प्रमुखांत दोन तट पडल्यामुळें, खाजगी वादावादीला खूप ऊत येऊं लागला व पत्रांतल्या लेखनामध्येंहि या वादावादीचें प्रतिबिंब उमटूं लागलें.

असें असलें तरी, १८८५ सालीं संस्थेच्या उत्कर्षाच्या दृष्टीनें करावयाच्या अनेक गोष्टींत् संस्थेच्या प्रमुखांचीं मनें गुंतलेलीं होतीं व त्यामुळें हे अंतःस्थ वाद फारसे विकोपाला गेले नाहींत. या सुमारासच गोपाळ कृष्ण गोखले हे संस्थेला येऊन मिळाले. गद्रेवाड्याची जागा अपुरी वाटूं लागल्यामुळें संस्थेला अधिक प्रशस्त जागा मिळविण्याची जरुरी भासूं लागली होती. मुंबईचे गव्हर्नर फर्ग्युसनसाहेब यांची मुदत भरत आली होती. ते जागेवर आहेत तोंपर्यंतच जागा पदरांत पाडून घ्यावी, यासाठीं खटपट सुरु झाली. या मंडळीच्या सर्वच मराऱ्या प्रचंड असल्यामुळें, शाळा व कॉलेज या दोहोंसाठीं मिळून इतिहासप्रसिद्ध शनिवारवाड्याची जागा मिळविण्याचा विचार त्यांच्या मनांत घोळूं लागला. हा विचार सफल होईल असेंहि कांहीं दिवस वाटलें; पण पुढें तो विचार सोडून द्यावा लागला. नानावाडा व बुधवारवाडा या दोहोंपैकीं कोणतें तरी एक ठिकाण हस्तगत करावें, असा उद्योग या मंडळींनीं सुरू केला. शेवटीं या उद्योगाला यश येऊन, डेक्कन एज्युकेशन सोसायटीला बुधवारवाड्याची जागा देण्याला मुंबई सरकार तयार झालें. ५-२-१८८५ रोजीं मुंबईचे गव्हर्नर सर जेम्स फर्ग्युसन यांच्या हस्तें या ठिकाणीं कोनशिला-समारंभहि साजरा करण्यांत आला. पण,

पुढें कांहीं दिवसांनीं ही सर्व योजना बदलावी लागली; आणि, कॉलेजसाठीं स्वतंत्र इमारत उभी करण्याचा प्रश्न फिरून उपस्थित झाल्यावर, १८९२ सालीं, ही कोनशिला— तिच्यावरील मजकूर बदलून— सध्यांच्या ठिकाणीं नेऊन बसविण्यात आली.

१८८५ च्या मार्च महिन्यात महाराष्ट्रांतील पांडित्याच्या दृष्टीनें— त्याप्रमाणेच व्यक्तिशः टिळकांच्या दृष्टीनें— अत्यंत दुःखद अशी एक घटना घडून आली. २८-३-१८८५ रोजीं प्रसिद्ध गणितज्ञ व ज्योतिर्विद प्रो. केरूनाना छत्रे वारले. या प्रसंगीं टिळकांनीं लिहिलेला केसरींतला मृत्युलेख पाहिला म्हणजे जातिवंत पंडिताच्या पांडित्याचें गुणग्रहण जातिवंत पंडितच कसा करूं शकतो, हें लक्षात येतें. १०-१२ वर्षांचे असतांना टिळक पुण्यात आले तेव्हांपासून हा काळपर्यंत, त्यांचा व केरूनानांचा संबंध एकसारखा वाढतच गेलेला होता. केरूनानांचा आपल्यावर किती विश्वास आहे हें टिळक जाणून होते. केरूनानांच्या मृत्यूनंतर त्यांच्या स्मारकाची योजना आखण्यासाठीं सभा झाली; तेव्हां आपला एक महिन्याचा पगार देऊन टिळकांनीं आपली कृतज्ञताबुद्धि व्यक्त केली. पण, एवढ्यानें टिळकांचें समाधान मात्र झालें नाहीं. वेदकाल-निर्णय, पंचांग संशोधन वगैरे कामांत सतत लक्ष घालून टिळकांनीं केरूनानांचें कार्य जिवंत ठेविलें. पंडिताचें खरें स्मारक त्याच्या पांडित्याची परंपरा टिकविण्यानेंच होतें, हें टिळक चांगलें जाणत असत.

कल्पना खेळत होत्या. सरकारी पैसा मुख्यतः औद्योगिक व व्यावसायिक शिक्षणाकडे खर्च व्हावा असें त्यांचे मत असल्यामुळें, डेक्कन कॉलेजसारख्या संस्था चालविण्याच्या जबाबदारींतून सरकार मुक्त झालें तर बरें, असें त्यांना वाटत होतें. या बाबतींत डेक्कन एज्युकेशन सोसायटीशीं प्रत्यक्ष पत्रव्यवहार सुरू करण्यापूर्वी रे साहेबांनीं संस्थेला भेट दिली असावी, असें दिसतें. साहेब शाळेच्या एका वर्गात गेले व त्यांनीं " सरकारी नोकरींत शिरण्याची कोणाची इच्छा आहे" असा प्रश्न विद्यार्थ्यांना विचारला. त्याबरोबर, समोरच्या विद्यार्थ्यांपैकीं पुष्कळांनीं आपले हात वर उचलिले! आगरकर-टिळकांना जेव्हां हा प्रकार कळला असेल तेव्हां त्यांच्या मनांत कोणते विचार आले असतील, हें कल्पनेनें ओळखणें कठीण नाहीं. आपण एखादा उद्योग एका विशिष्ट उद्देशानें सुरू केला तरी, त्या उद्योगाचें पर्यवसान आपल्या कल्पनेप्रमाणेंच होईल असें गृहीत धरून चालणें हें शहाणपणाचें नाहीं, हा अनुभव व्यावहारिक राजकारणांत टिळकांना पुढें अनेकवार आला. या अनुभवाचा श्रीगणेशा टिळकांनीं यापूर्वी गिरविला होता कीं नाहीं कोणास ठाऊक! या प्रसंगीं तरी त्यांनीं तो खासच गिरविला असेल!

* डेक्कन कॉलेज डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या हवालीं करण्याची रे-साहेबांची कल्पना १८८६ च्या फेब्रुवारीपासून विशेषच उचल करूं लागली. या बाबतींत होणाऱ्या सर्व खटपटींत व वाटाघाटींत टिळक, आगरकर व नामजोशी हे प्रमुख होते. या वाटाघाटी होताहोतां, शेवटीं कोणत्या अटींवर सोसायटीनें डेक्कन कॉलेज घ्यावें हें ठरविण्यापर्यंत मजल येऊन पोंचली. १८८६ च्या नोव्हेंबर महिन्यांत टिळक, आगरकर व नामजोशी हे या वाटाघाटींच्या निमित्तानें सरकारी अधिकाऱ्यांना भेटण्यासाठीं महाबळेश्वरास गेले होते. सरकारी अटी स्वीकार्य नाहींत असें या तिघांना वाटलें असावें. तरीहि, सरकारला अखेरचें उत्तर कळविण्यापूर्वी न्यायमूर्ति रानडे यांचा सल्ला घेणें त्यांना अवश्य वाटलें. न्या. मू. रानडे हे या सुमारास कांहीं सरकारी कामानिमित्त कलकत्त्यास गेलेले होते. त्यांना तारा करण्यांत आल्या; आणि त्यांचा अभिप्राय कळल्यावर, सरकारशीं कोणत्या धोरणानें वागावयाचें हें ठरविण्यांत आलें. डेक्कन कॉलेज स्वाधीन करण्याच्या निमित्तानें सरकार आपल्या डोक्यावर इंग्रजी प्रोफेसरांची संक्रांत लादीत आहे आणि संस्थेच्या

अंतर्गत कारभारांत थोडे निरंकुश रहात आहे असें संस्थाचालकांच्या मनानें घेतल्यामुळें, या वाटाघाटींना शेवटीं त्यांनीं नकारार्थी उत्तर दिलें. यामुळें रे. साहेब कांहीं दिवस डेक्कन एज्युकेशन सोसायटीवर फारच रुष्ट झाले होते. कॉलेजसाठीं सरकारकडून देण्यांत येणारी वार्षिक जादा ग्रँटहि सरकारनें यापुढें कांहीं दिवस रोखून धरिली होती, अशी माहिती मिळते. १८८६ च्या जुलै महिन्यांत इंदूर येथें श्रीशिवाजी महाराज होळकर यांच्या अधिकारप्राप्तीनिमित्त समारंभ झाला. संस्थेतर्फे या प्रसंगीं उपस्थित राहण्याचें काम टिळकांवर सोंपविण्यांत आलें होतें.

संस्थेबाबतच्या या कामाधामांत व उलाढालींत गढून गेलेले टिळक स्नेहभावानें जोडून ठेविलेल्या माणसांचीं खाजगी कामें पुरीं करण्यांत अत्यंत दक्षता बाळगीत असत. "कोल्हापूर-प्रकरणांतल्या लढ्यापासून मुंबईच्या 'टाइम्स'च्या कचेरींत काम करणारे श्री. वाकणकर हे टिळकांच्या परिचयाचे झालेले होते. त्यांच्या भावाच्या लग्नाच्या बाबतींत कांहीं शास्त्रीय वाद निघत आहे, असें टिळकांना समजलें. तेव्हां टिळकांनीं वरपक्ष-वधूपक्ष या दोन्ही पक्षांकडील मंडळींची समजूत पाडण्यासाठीं, धर्मशास्त्राचे ग्रंथ काळजीपूर्वक पाहिले. या मंडळींच्या विश्वासाचे एक शास्त्री सांगलीस रहात असत. त्यांची खात्री पटविण्यासाठीं टिळक उठून सांगलीस गेले."* त्या वेळचा सांगली-पुणें प्रवास सदर्न मराठा रेल्वेचाहि नव्हता हें लक्षांत ठेविलें म्हणजे, लोककार्यासाठीं झटणारे टिळक, या वयापासून ओळखीच्या माणसांसाठीं किती दगदग सोशीत असत, हें चांगलें ध्यानांत येतें.

गरिबी असली तरी तिला न जुमानतां, कांहीं एका शिस्तीप्रमाणें व तत्त्वाप्रमाणें वागणारें कुटुंब पुढें भरभराटीस आलें म्हणजे त्या कुटुंबांतील तरुण माणसांना चालू चळवळ तेवढी दिसते; कोणत्या तत्त्वांच्या परिपालनामुळें आपलें कुटुंब दैन्यांतून बाहेर पडलें, हें त्यांच्या ध्यानांत रहात नाहीं. यामुळें पुष्कळ वेळां असें घडतें कीं, ही कुलपरंपरा तरुण मंडळी जुन्या सत्त्वनिष्ठेचा अधिक्षेप करूं लागतात' व तत्त्वांचा उपहास करण्याचीहि त्यांना दिक्कत वाटत नाहीं. कुटुंबाला लागू पडणारा हा न्याय सार्वजनिक संस्थांनाहि लागू

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. २६७-६८.

पडतो. १८८४-८५ च्या सुमारास डेक्कन एज्युकेशन सोसायटीची स्थिति सांपत्तिक दृष्ट्या उत्तम म्हणतां येण्यासारखी नसली तरी, १८८२-८३ सालच्या मानानें ती पुष्कळच सुधारली होती. आर्थिक सुस्थितीबद्दल आशा वाटावी अशी तर स्थिति निश्चितच होती. सोसायटीचा व्याप वाढूं लागल्यामुळें नवे-नवे कार्यकर्ते संस्थेला कायमचे येऊन मिळत होते. यापूर्वी वेतन घेण्याचा जो शिरस्ता ठरला होता तो या नव्या मंडळींना चमत्कारिक वाटूं लागला! मासिक पगार ४० रुपये आणि एखाद्या कार्यकर्त्याची विशेष नड आहे असें ठरल्यास त्याला कांहीं अधिक रक्कम, ही त्या वेळची वेतनाची पद्धत होती. सोसायटींतलीच मंडळी वृत्तपत्रांतून लिहीत असत; पण, हें लेखन शुद्ध हौसेखातर करावें लागे; आणि, शुद्ध हौसेखातर लिहिण्याची ज्यांची तयारी नव्हती अशा कित्येकांनीं, या फुकटफौजदारीला कंटाळून, आपल्या लेखणीला नवे व किफायतशीर उद्योग लावून दिले! यामुळें अल्प वेतनावर संस्थेंत काम करणारे व वृत्तपत्रांतलें बिनकिफायतीचें लिहिणें हौसेनें चालू ठेवणारे गृहस्थ बिन-घोरणी आणि बिनव्यवहारी ठरूं लागले. सहजच आपापसांत धुसफूस व कुरबूर सुरू झाली. २०-१०-१८८५ रोजीं, त्या वेळपर्यंत प्रत्येकानें संस्थेकडून काय घेतलें याचा हिशोब काढण्यांत आला. हा हिशोब करण्यांत टिळकांनीं बरेंच लक्ष घातलें होतें. हा हिशोब झाल्यावर नव्या मंडळींपैकीं कांहींनीं एक विचित्र सूचना केली! आरंभापासूनचें सर्वांचें वेतन सारखें समजण्यांत यावें व टिळकांसारख्या ज्या कित्येकांनीं आरंभीं मुळीं वेतनच घेतलें नव्हतें त्यांना सर्व रक्कम एकदम देऊन टाकण्यांत यावी, असें ही मंडळी म्हणूं लागली. संस्थेच्या ध्येयासाठीं केलेल्या स्वार्थत्यागाचा असा आर्थिक हिशोब आणि क्रयविक्रय होऊं लागला, ही गोष्ट टिळकांना पटली नाहीं. पुढें ज्या अनेक कारणांमुळें संस्थेंत वाद माजले त्या कारणांतलें हें एक प्रमुख कारण होय.

डेक्कन एज्युकेशन सोसायटी, केसरी-मराठा पत्रें व आर्यभूषण मुद्रणालय या तिन्ही संस्था एकमेकींना पूरक व सर्वांच्या समाईक मालकीच्या समजण्यांत याव्या असा आरंभीं संकेत होता. पुढें डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या शिक्षण-कार्याचें स्वरूप निर्मळ व सोज्ज्वळ आहे असें भासविण्याची गरज निर्माण झाल्यामुळें, बाह्यात्कारी ह्या तीन संस्था भिन्न समजण्यांत येऊं लागल्या; तरी, त्या एक आहेत असें सर्व मंडळी मनोमन समजत असत. हळूहळू शिक्षण-

संस्थांची आर्थिक स्थिति सुधारूं लागल्यामुळें आणि मुद्रणालय नि वृत्तपत्रें यांची स्थिति लवकर तरी सुधारण्यासारखी नाहीं असें दिसूं लागल्यामुळे, सामुदायिक जबाबदारीची व मालकीची कल्पना टिकवावी कीं काय, या विषयाची चर्चा सुरू झाली. एकदां सामुदायिक मालकीची म्हटली तर त्यांतील संपादकीय लेखनाचें धोरण बहुमताला मान्य असेंच राहिलें पाहिजे, ही गोष्ट निर्विवाद होती. पण, प्रत्यक्ष व्यवहारांत ती पुष्कळ वेळेला घडत नसे. बालविवाह-प्रतिबंध, स्त्रीशिक्षण वगैरे बाबतींत चर्चा होत तेव्हां असें स्पष्ट दिसे कीं, सोसायटीच्या सभासदांपैकीं बहुतेकांचें मन टिळकांच्या बाजूचें असून, आगरकरांचें मत मान्य करणारे त्यांच्याखेरीज फारच थोडे लोक आहेत. वृत्तपत्रें व छापखाना यांची सामुदायिक मालकी व जबाबदारी, वृत्तपत्रांचें संपादकीय धोरण इत्यादि मुद्द्यांसंबंधीं वाद सुरू झाल्यावर त्या वादांना आणखी एका गोष्टीमुळें भरच आला. न्यायमूर्ति रानडे यांच्यासारख्या संस्थेच्या नियामक मंडळावर असलेल्या गृहस्थांवर 'केसरी'त कडक टीका येऊं लागली म्हणून डॉ. भांडारकर यांनीं नियामक मंडळाच्या एका सभेंत तक्रार केली. अशा अनेक बारीकसारीक प्रकारांमुळें, छापखाना व वृत्तपत्रें यांची व्यवस्था कशी काय ठरवावी हा मोठा भानगडीचा प्रश्न होऊन बसला! अखेरीस १८८६ च्या मध्याच्या सुमारास छापखाना व वृत्तपत्रें यांचे हिशोब काढण्यांत आले. आगरकर केसरीचे संपादक असल्यामुळें, छापखाना व वृत्तपत्रें त्यांनीं घ्यावीं अशी सूचना करण्यांत आली. ती अमान्य झाल्यावर, प्रा. वासुदेवराव केळकर यांनीं ही जबाबदारी पत्करण्याची सिद्धता दाखविल्यामुळें, त्यांच्याकडे ही व्यवस्था सोंपविण्यांत आली. छापखान्याची व्यवस्था पहाण्यासाठीं माहितगार म्हणून हरी नारायण गोखले या गृहस्थांना घेण्याचें ठरलें. हे गृहस्थ टिळकांमुळेंच लमन होते. छापखान्याची व्यवस्था मुख्यतः गोखले यांनीं पहावी, पत्राची व्यवस्था मुख्यतः वासुदेवराव केळकर यांनीं पहावी, पण, प्रसंग पडल्यास अखेरची जबाबदारी टिळकांनीं पत्करावी असें ठरविण्यांत येऊन, सोसायटीनें वृत्तपत्रांशीं व छापखान्याशीं असलेला आपला संबंध तोडून टाकला. वासुदेवराव केळकर हे सोसायटीचे आजीव सभासद होते. त्यांना सोसायटींत काम बेताचें वाटे, पण पगार मात्र पूर्णपगाराइतकाच घ्यावा असें ठरल्यामुळें, सोसायटी व या संस्था यांचा अन्योन्य संबंध काय उरला असेल तेवढाच!

ही व्यवस्था झाल्यामुळें आगरकरांची पूर्वीपासून होत असलेली कुचंबणा थांबली तर नाहींच; उलट ती वाढली! अखेरीस २५-१०-१८८७ च्या केसरींत असें जाहीर करण्यांत आलें कीं, टिळक हे केसरीचे प्रकाशक झाले असून, प्रकाशकत्वाची सर्व जबाबदारी त्यांच्याच शिरावर आहे. आगरकर यांच्यावर ही जबाबदारी राहिलेली नाहीं, असें स्पष्टपणें जाहीर करण्यांत आलें. केसरीची जबाबदारी टिळकांवर येऊन पडली तरी, या सुमारास टिळक केसरींत घेताचेंच लिहीत. पण, पुष्कळ वेळां असें घडे कीं, टिळकांनीं लिहिलेल्या लेखांतील विचारसरणी पसंत न पडल्यामुळें, विरुद्ध विचारसरणीचा आगरकरांचा लेख टिळकांच्या लेखामागून केसरींत प्रसिद्ध होत असे. १८८७ सालीं टिळकांनीं 'फीमेल हायस्कुलांतील शिक्षणक्रम' या विषयावर केसरींत एक लेखमाला लिहिली. या लेखमालेवरील आगरकरांची टीका पुढें केसरींतच प्रसिद्ध झाली. असाच क्रम चालू राहिला असता तरी, टिळकांनीं त्याला हरकत घेतली नसती, असें दिसतें. पण आपलीं मतें मोकळेपणानें प्रतिपादूं पहाणाऱ्या आगरकरांची भूक या व्यवस्थेनें शमणारी नव्हती. म्हणून, त्यांनीं १८८८ च्या ऑक्टोबर महिन्यांत शेवटीं आपलें स्वतंत्र 'सुधारक' पत्र सुरू केलें. प्रो. गोपाळ कृष्ण गोखले हे सोसायटीमधील अंतर्गत भांडणांत प्रायः आगरकरांच्याच बाजूचे असत. सोसायटींतलें काम करीत असतांना, न्या. रानडे यांचें राजकारणी शिष्यत्वहि त्यांनीं पत्करिलें होतें. टिळकांच्या मतप्रतिपादनांत रानडे यांच्यावर जी टीका होत असे ती गोखले यांच्या हळुवार मनाला मानवण्यासारखी नव्हती. यामुळें आगरकर-गोखले हे या सुमारास पुष्कळच एकरूप झालेले होते. 'सुधारक' पत्रांत आगरकरांनीं मराठी लेख लिहावे व गोखले यांनीं इंग्रजी लेख लिहावे असें ठरलें व ही व्यवस्था सुरू झाली.

एरवीं क्षुद्र असणाऱ्या कित्येक गोष्टींना त्या काळीं किती अवास्तव महत्त्व येत असे हें त्या वेळीं गाजलेल्या 'दादाजी-रखमाबाई' प्रकरणाकडे आज पाहिल्यावर चांगलेंच समजतें. लग्नाची बायको नवऱ्याजवळ रहावयाला तयार नसेल तर तिच्या बाबतींत न्यायालयानें काय करावें असा प्रश्न या प्रकरणीं उपस्थित झाला होता. हें प्रकरण हायकोर्टापर्यंत जाऊन, हायकोर्टानें रखमाबाईच्या म्हणण्याविरुद्ध निकाल दिल्यामुळें तर, या क्षुद्र प्रकरणाला

भलतेंच महत्त्व चढलें! रखमाबाई दुर्दैवाची शिक्षा पत्करून 'हुतात्मा' बनते कीं काय, असा प्रश्न उपस्थित झाला आणि मलबारी शेठजींसारख्या कित्येक सुधारणाग्रणींनीं या बाईचें देव्हारे माजविण्यास सुरुवात केल्यामुळें तर, ती क्षणभर हुतात्मा झाल्यासारखीच दिसली! अशा प्रकरणांतून ज्या सार्वजनिक वादविवादाच्या ठिणग्या पडत, त्यांमुळें आगरकर, टिळक, तेलंग, रानडे अशा थोरथोर मंडळींना परस्परांवर हल्ले चढवावे लागत. सोसायटींतल्या अंतर्गत कारभारासंबंधींच्या मतभेदामुळें निर्माण झालेल्या वितुष्टांत या बाहेरच्या भांडणांमुळें भरच पडत असे.

१८८८-८९ च्या सुमारास या भांडणांना फारच उग्र स्वरूप आलें. परस्परांमधील स्नेहसंबंध दृढ व्हावे म्हणून सोसायटीमधील प्रमुख मंडळी दर आठवड्यास कोणा तरी एकाचे घरीं खेळीमेळीनें गप्पा मारण्यासाठीं जमत असत. अशा बैठकींतहि सभेंतल्या वादांची धुमश्चक्री सुरू झाली. प्रोफेसर-मंडळी कॉलेजांत रिकामपणीं एकत्र बसली तर तेथेंहि स्नेहभाव दिसेनासा झाला. प्रोफेसरमंडळीमधील भांडणांचा प्रतिध्वनि विद्यार्थ्यांच्या कानीं जाऊं लागला; आणि, त्यामुळें सगळ्यांनाच जीवन असह्य वाटूं लागलें. असें असलें तरी, मधूनच उत्पन्न होणाऱ्या कांहीं प्रसंगीं ही मंडळी प्रासंगिक एकोप्यानें वागत, असें दिसतें. १८८९ सालची तरी राष्ट्रीय सभा पुण्यास व्हावी असा पुणेकरांचा आग्रह होता. हा आग्रह एकमुखी असल्यामुळें, सर्वांच्या मतानें मुंबईस जाऊन पुणेकरांची वकिली करण्याचें काम टिळक-नामजोशी यांच्याकडे सोपविण्यात आलें. राष्ट्रीय सभा पुण्यास भरली नाहींच; तरी, मुंबई इलाखा प्रांतिक परिषद मात्र पुण्यास एकोप्यानें भरली. या परिषदेच्या धेवटीं परिषदेचे संयुक्त चिटणीस म्हणून टिळक, गोखले व नामजोशी यांची निवड करण्यांत आली.

संस्थेबाहेर उपस्थित होणाऱ्या अशा एखाद्या प्रसंगीं ही मंडळी जशी एकोप्यानें वागत, त्याप्रमाणेंच संस्थेंतलेंहि एखादें काम ही मंडळी टाळून, एकत्र बसून करीत, असें दिसतें.

"१८८८-८९ सालचा पंधरा महिन्यांचा रिपोर्ट लिहिण्याचें काम प्रो. टिळक-आगरकरांकडे आलें व या बंडेबहाद्दरांनीं अहोरात्र

**जागून, अवघ्या चोवीस तासांत रिपोर्ट लिहून काढला. सोसायटी-च्या व कौन्सिलच्या कामाची माहिती प्रि. आपटे देत होते व बोर्डाची माहिती मी देत होतो.* "**

असें लिहितांना प्रो. चिं. गं. भानू यांना मोठी धन्यता वाटली आहे! पण असे प्रसंग हळूहळू कमीकमी होत चालले होते; आणि, मतभेदाचेच प्रसंग वाढू लागलेले होते!

संस्थेची सांपत्तिक स्थिति सुधारत असल्यामुळें, आजीव सदस्यांना दरमहा चाळीस रुपयांचे जागीं पंचेचाळीस रुपये वेतन द्यावें अशी सूचना आगरकर यांनीं १८८७ च्या फेब्रुवारी महिन्यांत पुढें आणिली. तेव्हांपासून, आजीव सदस्यांचें वेतन, संस्थेबाहेर त्यांनीं करावयाचें काम, इत्यादि मुद्दयांची फारच घासाघीस सुरू झालेली होती. संस्थेची आर्थिक स्थिति सुधारली म्हणून संस्थाचालकांनीं आपले पगार वाढवून घ्यावे, ही विचारसरणी संस्थेच्या मूल-भूत तत्त्वांशीं विसंगत आहे असें टिळकाचें या बाबतींतलें म्हणणें होतें. या बाबतींत आपण आपला आग्रह सोडला, तर ज्या तत्त्वांसाठीं आपण झगडलों व स्वार्थत्याग केला त्या तत्त्वांनाच तिलांजलि दिल्यासारखें होत आहे अशी टिळकांची ठाम समजूत असल्यामुळें, तेहि या बाबतींत माघार घेईनात आणि आगरकर-गोखलेप्रभृति मंडळीहि माघार घेईनात! कोणतेंहि कायम स्वरूपाचें काम मागें लावून घेऊन सोसायटीच्या आजीव सदस्यानें सोसायटीमधील आपल्या कामावरील भक्ति द्विधा होऊं देतां कामा नये, असा टिळकाचा आग्रह होता. तोहि त्यांच्या सहकाऱ्यांना मान्य नव्हता. या सुमारास कॉलेजची वाढ होऊन बी. ए. चे दोन्ही वर्ग कॉलेजांत सुरू करण्याचा प्रश्न उपस्थित झालेला होता. युरोपियन प्रोफेसर कॉलेजांत घेतला तर कॉलेज-चा लौकिक वाढेल अशी कित्येकांची समजूत असल्यामुळें, त्यांनीं या दिशेनें खटपट सुरू केली होती. हीहि गोष्ट टिळकांना तत्त्वतः नापसंत होती. अशा तात्त्विक गोष्टींचा वाद निघे तेव्हां टिळक कोणाचीहि पर्वा करीत नसत. माधवराव नामजोशी हे सोसायटींत टिळक पक्षाचे होते. सोसायटी सोडल्या-वर देखील टिळक-नामजोशी यांचा स्नेहसंबंध अबाधितच राहिला. पण

* आठवणी व आख्यायिका : खंड १ : भा. १ : पृ. १०.

'शारदासदन' व या संस्थेची हिंदूंना ख्रिस्ती करण्याच्या कामाकडे होत असलेली प्रवृत्ति हा या दोन प्रश्नांपैकीं एक प्रश्न होता. पंडिता रमाबाईंनीं १८८९ च्या मार्च महिन्यांत मुंबई येथें 'शारदासदन' संस्था स्थापन केली. बाईंचें पूर्ववृत्त मोठें हृदयंगम असल्यामुळें आणि बाईंच्या वागण्यांत बाणेदारपणाहि फारच असल्यामुळें, मुंबई-पुण्याची पुष्कळ थोरथोर मंडळी या संस्थेच्या सल्लागार मंडळांत काम करण्याला तयार झाली. अनंतशास्त्री डोंगरे नांवाच्या एका संस्कृत पंडिताची मुलगी अनाथ असहाय होऊन भटकत-भटकत कलकत्त्याला गेली, तिनें आपल्या संस्कृत भाषेतील प्रावीण्यामुळें तेथें लौकिक संपादन केला, पुढें पुण्या-मुंबईस येऊन तिनें तेथील सुशिक्षित व चिकित्सक मंडळींवर छाप पाडली—अशा तऱ्हेचा बाईंचा पूर्वेतिहास असल्यामुळें, बाईंनीं पुढें इंग्लंडांतील आपल्या वास्तव्यांत हिंदु धर्माचा त्याग करून ख्रिस्ती धर्म स्वीकारला, या अनिष्ट गोष्टीकडे कानाडोळा करण्याला सुधारक मंडळींपैकीं बरीचशी मंडळी प्रवृत्त झाली. शारदासदन स्थापन करणारी बाई धर्मांतर करून ख्रिस्ती झालेली असल्यामुळें, त्या संस्थेंत शिकणाऱ्या मुलींनाहि हळूहळू ख्रिस्ती धर्माची दीक्षा देण्यांत येईल ही भीति टिळकांना आरंभापासूनच वाटत होती. १८९० च्या जानेवारी महिन्यांत केसरीनें अमेरिकेंत प्रसिद्ध होणाऱ्या एका साप्ताहिकांतला शारदासदनाविषयींचा कांहीं मजकूर प्रसिद्ध केला. या सदनांतील शिक्षणांत ख्रिस्तीधर्म-शिक्षणाची भेसळ झालेली आहे या गोष्टीचा या प्रसिद्धीमुळें बोभाटा झाला. तेथपासून शारदासदनासंबंधींचा वाद रंगत चालला. या सुमारास शारदासदनाची एक शाखा पुण्यासहि सुरू झालेली होती. जून महिन्यांत टिळकांनीं शारदा-सदनाच्या अंतर्व्यवस्थेवर टीकेची झोड उठविण्यास आरंभ केला. संस्थेच्या सल्लागारांकडून समाजाची वंचना केली जात आहे असें टिळकांनीं बजाविलें. या वादांत आरंभीआरंभीं आगरकर हे सदनाच्या बाजूनें लिहीत असत. पण, पुढें त्यांनाहि आपलें धोरण बदलावें लागलें. हा वाद पुढें १८९३ पर्यंत चालला; आणि भांडारकर-रानडेप्रभृति मंडळींनीं अखेरीस सदनाशीं असलेला आपला संबंध कायमचा तोडला. आगरकर यांची एक भाची सदनांत होती. आगरकर रात्रीं टांगा घेऊन सदनांत गेले व आपल्या भाचीला मुकाट्यानें घेऊन आले, अशी माहिती कै. ल. रा. पांगारकर यांनीं लिहून ठेविली आहे. या मंडळींचा

संबंध तुटल्यावर रमाबाईच्या शारदासदनाचें काम उघडउघडच हिंदु समाजाला घातक अशा पद्धतीनें होऊं लागलें. लवकरच या संस्थेचें स्थित्यंतर झालें. केडगांव स्टेशनजवळ सध्यां जी संस्था चालू आहे तीच रमाबाईनीं काढलेली संस्था !

शारदासदनाचा वाद चालू झाला त्याबरोबरच संमतिवयाच्या बिलाचा वादहि जोरानें सुरू झाला. या वादांना जसजसा रंग चढूं लागला तसतसें वासुदेवराव केळकर व टिळक यांच्या मतांतलें व धोरणांतलें अंतर जास्त जास्त स्पष्ट होऊं लागलें. १८९१ च्या जूनपासून टिळकांनीं केसरींत लिहिण्याचा धडाका सुरू केल्यावर, केळकर यांना फक्त मराठ्यांतच लिहिण्याला अवसर मिळू लागला. केसरी व मराठा या पत्रांच्या धोरणातला फरक दाखवून प्रतिपक्षी टिळकांवर तुटून पडूं लागले. त्यामुळें अशी परिस्थिति उत्पन्न झाली कीं, केळकरानीं एक तर टिळकांचें धोरण मान्य करून लिहिलें पाहिजे अगर पत्रांशीं असलेला आपला संबंध सोडला तरी पाहिजे ! असा प्रसंग आल्यामुळें, गोखले, केळकर व टिळक या तीन व्यक्ति आणि आर्यभूषण छापखाना व केसरी मराठा पत्रें या संस्था यांच्या संबंधांचें स्पष्टीकरण करण्याची आवश्यकता निर्माण झाली. त्यामुळें छापखाना, पत्रें वगैरे सर्वांचें मिळून देणें किती आहे याचा आढावा घेण्यांत आला. कर्ज हिस्सेरशीनें वांटण्यांत आलें. छापखाना व त्याच्या वांटणीस आलेलें कर्ज एका पक्षानें उचलावें आणि वृत्तपत्रें व त्यांच्या वांटणीला आलेलें कर्ज दुसऱ्या पक्षानें उचलावें अशा वाटाघाटी सुरू झाल्या. टिळक यांतलें कांहींही पत्करावयास तयार होते; पण, टिळकांनीं छापखाना कर्जासकट पत्करला तरी ते तो व्यवस्थित चालवितील, आणि फिरून स्वतःचीं पत्रें काढून आपल्याला शह देतील हें गोखले व केळकर यांना चांगलें माहीत असल्यामुळें, त्या दोघांनीं छापखाना चालविण्याची जबाबदारी उचलिली. वृत्तपत्रें व त्यांच्या वांटणीला आलेलें सात हजार रुपये कर्ज टिळकांनीं उचलिलें. वृत्तपत्रांसाठीं स्वतःचा स्वतंत्र छापखाना काढण्यापूर्वीं टिळकांना या कर्जाची कांहीं तरी व्यवस्था करावी लागली असती. आर्थिक अडचणी वाढवीत न बसतां, केसरी-मराठा वृत्तपत्रें पूर्वीप्रमाणेंच आर्यभूषण छापखान्यांत छापिलीं जावीं हेंच टिळकांना श्रेयस्कर वाटलें. १८९१ च्या सप्टेंबर महिन्यांत टिळकांनीं हीं वृत्तपत्रें पूर्णपणें स्वतःच्या ताब्यांत घेतलीं.

या सुमारास खूप गाजलेल्या संमतिवयाच्या बिलाचा वाद काय होता हें नीट समजण्यासाठीं हें बिल कशा स्वरूपाचें होतें हें समजणें अवश्य आहे. हिंदुसमाजांत असलेली बालविवाहाची चाल कायद्यानें बंद व्हावी असा प्रयत्न मलबारीशेठसारख्या काहीं सुधारकांनी करून पाहिला; पण तो अयशस्वी झाल्यावर, अन्य मार्गानें आपला हेतु तडीस नेण्याची खटपट त्यांनीं सुरू केली. मुलीचें लग्न दहा अगर बारा वर्षांच्या आंत झालें तरी, लग्नाची सफलता कोणत्या वयापासून व्हावी हा प्रश्न महत्त्वाचा आहे असें ठरवून, त्यांनीं तो धुसळून काढण्याला सुरवात केली. बारा वर्षांखालील विवाहित मुलीच्या लग्नाची सफलता झाली तर तिच्या नवऱ्याला गुन्हेगार समजण्यात यावें, अशा आशयाची दुरुस्ती कायद्यांत व्हावी असा मतप्रचार मलबारीशेठजींनीं सुरू केला. हा मतप्रचार इंग्लंडमधून चालला असला तरी, हिंदुस्थानांतल्या लोकांना १८९० च्या मध्याच्या सुमारासच या विषयाची कुणकुण लागली होती. १८९० च्या ऑक्टोबर महिन्यांत अशा दुरुस्तीला विरोध करणाऱ्या मंडळींनीं तुळशीबागेंत एक प्रचंड जाहीर सभा भरविली होती.

अशा सामाजिक प्रश्नांचे बाबतींत टिळकांचें धोरण स्वतंत्र होतें. जुनें चालू आहे तें सर्व जसेंच्या तसें चालू रहावें असें म्हणणाऱ्या शास्त्रीमंडळींशीं अगर श्रीमंत बाळासाहेब नातूंसारख्या प्रतिष्ठित मंडळींशीं त्यांचें जमत नसे, त्याप्रमाणेंच, समाजांतील सर्वसामान्य माणसाच्या भावना व आकलनशक्ति यांचा विचार न करतां मनःपूत सुधारणा करूं पहाणाऱ्या नवशिक्षित मंडळींशींहि त्यांचें जमत नसे. सामाजिक व्यवस्थेंत व रीतीभातींत देशकालपरिस्थितीप्रमाणें बदल झाले पाहिजेत हें टिळकांना मान्य होतें. त्या वेळच्या परिस्थितींत अत्यंत अवश्य अशा सुधारणा कोणत्या याविषयींचें स्वतःचें मतहि त्यांनी निःसंदिग्धपणें पुढें मांडिलें होतें. टिळकांनीं सुचविलेल्या आठ सुधारणांपैकीं कित्येक सुधारणा अद्यापहि अमलांत आलेल्या नाहींत हें कबूल केलें म्हणजे, टिळकहि पुरोगामी सुधारकच होते असा निर्णय द्यावा लागेल. टिळकांनीं सुचविलेल्या आठ प्रकारच्या सुधारणा पुढील प्रकारच्या होत्या :—

( १ ) मुलीचें लग्न सोळा वर्षांचे आंत करूं नये.
( २ ) मुलाचें लग्न वीस वर्षांचे आंत करूं नये.
( ३ ) पुरुषानें लग्न चाळीस वर्षांपुढें होऊ नये.

(४) चाळीस वर्षांनंतर लग्न करूं पहाणाऱ्या पुरुषानें विधवेशीं लग्न करावें.
(५) दारू पिणें बंद असावें.
(६) हुंडा घेण्याची चाल अजीबात बंद करावी.
(७) प्राप्तीचा दहावा भाग सार्वजनिक कामाकडे (या सुधारणा अमलांत आणणाऱ्या मंडळाच्या कामाकडे) द्यावा.
(८) विधवेचें वपन करूं नये.

सुधारक मंडळी एकदम कायद्याचा आश्रय घेऊन सर्व समाजावर सुधारणांची सक्ती करूं पहात होती; टिळकांना हें मान्य नव्हतें. सुधारणांची आवश्यकता त्यांना पटली आहे अशा प्रत्येक ज्ञातींतल्या दोदोनशें मंडळींनीं सुधारणांची मागणी करावी आणि आपल्या हातून या सुधारणांचा अंमल झाला नाहीं तर कायद्यानें सांगितलेली शिक्षा भोगण्याची तयारी दाखवावी, असें टिळकांचें म्हणणें होतें. सुधारणाच्या बाबतींत उत्सुक असणारी मंडळी स्वतःच्या कृतीनें त्या सुधारणांचें महत्त्व पटवून देऊं लागली म्हणजे समाजाच्या अवशिष्ट भागालाहि त्या सुधारणांचें महत्त्व आपोआप पटूं लागतें आणि अशा क्रमानें व मार्गानें होणारी सुधारणाच टिकाऊ व हितकारक ठरते, असें टिळकांचें मत होतें. सुधारक मंडळी स्वतःला बांधून घेण्याला तयार न होतां समाजाच्या मागें शिक्षेचा ससेमिरा लावूं पहात होती; म्हणून आपलें सारें बळ एकवटून त्यांना विरोध करणें टिळकांना अवश्य वाटलें. [१]

१८९१ च्या जानेवारी महिन्याच्या आरंभीं जुन्या कायद्याची दुरुस्ती करणारें बिल कलकत्ता येथील वरिष्ठ विधिमंडळांत मांडण्यांत आलें. यापूर्वी या सुधारणेला विरोध दर्शविण्यासाठीं कांहीं सभा झाल्या होत्या हें खरें; पण, यानंतर या प्रश्नासंबंधींचा वाद जोरजोरानें सुरू झाला व त्यामुळें मुंबई-पुण्यास झालेल्या सभा खूपच गाजल्या. टिळकांसारखी मंडळी बिलाला विरोध करूं लागली आणि तेलंग, प्रि. वामनराव आपटे, डॉ. भांडारकर, रानडे वगैरे मंडळी बिलाचें समर्थन करूं लागली. आपटे-तेलंग ही मंडळी टिळकांच्या बरोबरीची असल्यामुळें वादांत त्यांच्यावर तुटून पडतांना टिळकांना विशेष पंचाईत वाटत नसे. *पण, रानडे व भांडारकर यांच्याशीं वाग्युद्ध खेळतांना त्यांची मोठी कुचंबणा होई.* विशेषतः डॉ. भांडारकर यांच्यासारखा पंडित शास्त्राधार दाखवून बिलाचें समर्थन

करूं लागल्यामुळें, टिळकांचें काम फार अवघड झालें. भांडारकर हे आपल्या वडिलांचे स्नेही व आपले स्वतःचे गुरु हा विचार मनांत घेऊन, त्यांच्यावर हल्ला चढविणाऱ्या टिळकांना संकोच वाटे; पण, युद्धास समोर उभे राहिल्यानंतर, अर्जुनानें भीष्म-द्रोणांवरहि हल्ला चढविणें धर्म्यच ठरलें हें टिळकांना माहीत असल्यामुळें, त्यांनी आपल्या हल्ल्यांत कोणत्याहि प्रकारचा उणेपणा राहूं दिला नाहीं. भांडारकरांशीं वाद करावयाचा आहे हें पाहून त्यांनी अहोरात्र पंधरा-वीस दिवस वाचन चालविलें आणि धर्मशास्त्राचे सगळे ग्रंथ चाळून, त्यांनी एखाद्या पंडिताला शोभेल अशा पद्धतीनें डॉक्टरमहाशयांशीं वाद केला.

संमतिवयाच्या बिलावरील वादविवादांत टिळकांनीं बहुजनसमाजाच्या मताचा पुरस्कार चालविल्यामुळें, हें मत व्यक्त करण्यासाठीं पुण्याबाहेर भरलेल्या कांहीं सभांना त्यांना उपस्थित रहावें लागे. ८-२-९१ रोजीं मुंबईत माधवबागेमध्ये झालेल्या विराट् सभेला टिळक हजर होते. यानंतर थोड्याच दिवसांनीं सोलापूर येथें तेथील प्रमुख नागरिक श्री. अप्पासाहेब वारद यांच्या अध्यक्षतेखालीं जी सभा झाली तिलाहि टिळक व नामजोशी हजर होते. खुद्द पुण्यांत या बिलाला विरोध दर्शविण्यासाठीं दि. १५-२-९१ रोजीं शनिवारवाड्यापुढील पटांगणांत सभा झाली. बिलाला लोकांचा विरोध कां आहे हें ज्या अर्जांत स्पष्ट केलें होतें तो अर्ज या सभेत वाचून दाखविण्याचें काम टिळकांनीं केलें. या सभेनें सदर अर्जावर जागच्याजागीं २,५०० लोकांच्या स्वाक्षऱ्या झाल्या. या सभेत प्रो. जिनसीवाले यांचेंहि विद्वत्तापूर्ण व्याख्यान झालें.

बिलाला अनुकूल असलेल्या मंडळींनीं पुण्यांत एक सभा भरविली आणि अनेक कारणांमुळें ही सभा पुढें कांहीं दिवस लांबत राहिली. पेरुगेट-जवळील क्रीडाभुवनांत ही सभा घेण्याचें ठरवून, सभेच्या पुरस्कर्त्यांनीं फक्त निवडक मंडळी समारंभस्थानीं येतील अशी व्यवस्था केली होती. बिलाला प्रतिकूल असणाऱ्या मंडळींना समारंभस्थानीं प्रवेश मिळूं नये असा बंदोबस्त करण्यांत आला होता; तरी निरनिराळीं निमित्तें सांगून बिलाचे विरोधकही सभेत घुसले होते. सभाचालक जो ठराव मांडणार आहेत त्याला दुरुस्ती सुचवावयाची आहे असें निमित्त सांगून, टिळक-नामजोशी समारंभस्थानीं गेले होते. खुद्द क्रीडाभुवनांत दोनतीनशें मंडळी आणि बाहेर दोनतीन हजार लोकांची

गर्दी अशा थाटांत सभेला सुरवात झाली. अध्यक्षांनीं अर्जाचें वाचन कसें तरी उरकलें; पण बाहेरच्या गोंधळामुळें सभेचें काम चालविणें त्यांना अशक्य झालें. सभास्थानाचे दरवाजे उघडतांच बाहेरची गर्दी आंत घुसली आणि खूप दंगल होऊन चारीकसारीक मारामारीहि झाली. 'टिळकांनीं विनंति केली तर बाहेरचा जमाव शांत होईल' अशी साळसूदपणाची सूचना करून सभा-चालकांपैकीं एकानें टिळकांना खोड्यांत टाकण्याचा प्रयत्न केला; पण, माधव-राव नामजोशी यांनीं टिळकांना ऐनवेळीं इशारा दिल्यामुळें, हा प्रयत्न सफल झाला नाहीं.

टिळकांमुळेंच दंगा झाला असें टिळकविरोधी वर्तमानपत्रें लिहूं लागलीं. त्यामुळें वर्तमानपत्रांतून या सभेविषयींचा वाद चांगलाच गाजत राहिला. सभेच्या दुसऱ्या दिवशीं मुंबईच्या टाइम्समध्यें पुण्याची एक तार प्रसिद्ध झाली तिचाहि आशय वरीलप्रमाणेंच होता. ही तार डॉ. भांडारकरांनीं केली असा समज त्या वेळीं पसरला होता. त्यामुळें केसरीनें भांडारकरांवर बरीच टीका केली. सभास्थानीं दंगल झाली तिचें निमित्त साधून, पोलिसांनीं पांच इसमांवर फिर्याद केली. या आरोपींच्या बचावासाठीं मुंबईहून महादेव चिमणाजी आपटे यांना मुद्दाम बोलाविण्यांत आलें. आपटे यांनीं भांडारकरांसारख्या साक्षीदारांची उलट तपासणी करतांना बिलाला अनुकूल असणाऱ्या पक्षाची दाक्य ती शोभा करून घेतली! अशा रीतीनें या बिलाला विरुद्ध असणारें लोकमत आपला प्रभाव गाजवीत असूनहि, सरकारच्या हट्टामुळें दि. १९-३-१८९१ रोजीं या बिलाला अखेरीस कायद्याचें स्वरूप आलें. यानंतरहि पुण्यांत या बिलाबाबत एक प्रचंड सभा झाली. पार्लमेंटपर्यंत पोंचून या बिलाबद्दलचें खरें लोकमत काय आहे हें जाहीर करावें अशी सूचना या सभेंत मांडण्यांत आली; पण, बिलाला कायद्याचें स्वरूप प्राप्त झाल्यामुळें, तत्संबंधीं चळवळीचा जोर हळूहळू स्वाभाविकपणेंच ओसरत चालला.

अशा वादांच्या दंगलींत गुंतून गेलेले टिळक इतर महत्त्वाचीं कामेंहि अंगावर घेत असत आणि जबाबदारीनें पार पाडीत असत. क्रॉफर्डप्रकरणांत ज्या मामलेदारांना अन्याय झाला होता त्यांची दाद लावावी म्हणून त्यांनीं १८९० च्या मध्यापर्यंत पार्लमेंटच्या कांहीं सभासदांशीं पत्रव्यवहार चालविला होता. १८९० मध्यें ड्यूक ऑफ कॅनॉट आपली हिंदुस्थानांतली लष्करी

नोकरी संपवून स्वदेशीं परत जाण्याच्या तयारीला लागले होते. या निमित्तानें पुणेकरांचें एक शिष्टमंडळ ड्यूकसाहेबांकडे धाडावें व त्यांच्या स्मरणार्थ पुण्यांत एक लष्करी शिक्षणाची शाळा सुरु करावी असा विचार निघून, त्या दिशेनें खटपट सुरु झाली. या शिष्टमंडळात महाराष्ट्रांतील अनेक सरदार व संस्थानिक समाविष्ट करण्यांत आले होते. शिष्टमंडळाची चिटणिशी टिळक व नामजोशी यांच्याकडे होती. या निमित्तानें पुण्यांत जे वादविवाद झाले व लष्करी शाळा काढण्याच्या कल्पनेवर श्री. गंगाराम भाऊ म्हस्के प्रभृतींनीं जे आक्षेप घेतले त्यांना टिळकांनीं केसरींतल्या एका लेखांत उत्तर दिलें आहे. जाणत्या हिंदी लोकांचा हिंदी लष्करांत प्रवेश होणें अवश्य आहे, ज्या घराण्यांना कांहीं राजकारणी परंपरा आहे अशा घराण्यांतील माणसें हिंदी लष्करांत जाणें हें देशाच्या भवितव्याच्या दृष्टीनें हितावह आहे आणि या दृष्टीनें लष्करी शाळेची कल्पना पुरस्कारार्ह आहे असें टिळकांनीं या लेखांत प्रतिपादिलें आहे. १८९० व ९१ या दोन्ही वर्षीं मुंबई इलाख्याची प्रांतिक परिषद पुण्यांत झाली. पहिल्या परिषदेंत टिळकांनीं अबकारी खात्याच्या कारभारावर भाषण केलें. दुसऱ्या परिषदेच्या वेळीं संमतिवयाच्या बिलाचा वाद ताजा असल्यामुळें टिळकांना त्या विषयावरच भाषण करावें लागलें. यापुढील परिषदेच्या कामासाठीं चिटणिसाची निवड झाली, त्यांत टिळकांना स्थान मिळालें.

सुधारकपक्ष व टिळकपक्ष असे दोन परस्परविरोधी पक्ष पुण्यात नांदूं लागल्यावर थोड्याच दिवसांनीं एक गमतीदार गोष्ट घडली. तिच्यामुळें टिळक व सुधारकपक्षांतील कित्येक अग्रणी हे समदुःखी बनले. ही गोष्ट घडवून आणणाऱ्या हिकमती सूत्रचालकाचें नांव गोपाळराव जोशी! पुण्यांत पंचहौद मिशन म्हणून जी ख्रिस्त्यांची संस्था आहे तिच्या प्रमुखाची व गोपाळरावांची चांगली ओळख होती. गोपाळरावांच्या सूचनेवरून या प्रमुखानीं १८९१ च्या ऑक्टोबर महिन्यांत पुण्यातील कित्येक प्रतिष्ठित नागरिकांना व्याख्यानाचें निमंत्रण दिलें. यांत कांहीं डाव असेल अशी व्याख्यानाला जाणाऱ्या थोरामोठ्यांना शंकादि आली नाहीं. मिशनमधील व्याख्यानानंतर मिशनच्या प्रमुखानीं उपस्थित मंडळींना चहा घेण्याचा आग्रह केला. तरीहि यांत कांहीं डाव आहे असें कोणाला वाटलें नाहीं. कित्येकांनीं चहा घेतला, कित्येकांनीं घेतल्यासारखा केला! चहाच्याबरोबर पुरविण्यांत आलेलीं बिस्किटें

प्रायः कोणीच खाली नाहींत! मंडळी घरोघर निघून गेली. आपण घेतलेला हा चहा आपल्याला महाग पडणार, हें कोणाच्याच ध्यानांत आलें नाहीं

या सर्व कारवाईचा सूत्रचालक गोपाळराव जोशी यानें 'पुणें वैभव' पत्राच्या कचेरींत जाऊन मिशनमध्यें आलेल्या सर्व लोकांचीं नांवें प्रसिद्ध करून टाकलीं. त्याबरोबर मात्र पुण्यात एकच हलकल्लोळ माजला. भिक्षुकमंडळी व शास्त्री-मंडळी तर जळफळूं लागलीच; पण, श्रीमत बाळासाहेब नातूंसारखे जुन्या मताचे अभिमानी खूपच खवळून गेले. हें सर्व प्रकरण शंकराचार्यांच्या पुढें ठेवावयाचें; आणि रानडे, टिळक अशा सर्व मंडळींना सक्तीर प्रायश्चित्त द्यावयाचें या कल्पनेनेंच बाळासाहेबांना अवसान आलें! हें प्रकरण पेट घेऊं लागलें इतक्यांत डिसेंबर महिना आला. रानडे-टिळक वगैरे पुष्कळशी मंडळी त्या वर्षीच्या नागपूरच्या कॉंग्रेसला गेली. या वर्षी नागपूर येथेंच जी सामाजिक परिषद् झाली त्या परिषदेंत विषयनियामक समितीच्या प्रातिनिधिक स्वरूपाविषयीं कांहीं वाद उपस्थित होऊन, रानडे व टिळक यांची चांगलीच चकमक झडली! दादासाहेब खापर्डे हे या परिषदेचे अध्यक्ष होते. त्यांनींहि टिळकांना दटावावें येथवर या चकमकीची मजल गेली होती!

पंचहौद मिशनमध्यें ज्यांनीं चहा घेतला त्यांनीं समाधानकारक प्रायश्चित्त तरी घ्यावें, नाहींतर समाजबहिष्कृत तरी व्हावें असा वाद बाळासाहेब नातू प्रभृतींनीं चालविल्यामुळें, अखेरीस शंकराचार्योंनीं या प्रकरणाचा निकाल करण्यासाठीं दोघा शास्त्र्यांचें एक कमिशन नेमलें. १८९२ च्या जानेवारी महिन्याच्या शेवटीं पुण्यास ह्या कमिशनचें काम सुरू झालें. श्रींनीं निर्माण केलेलें हें कोर्ट म्हणजे एक मोठी मजाच होती. कमिशनचा अधिकार मुळींच न मानणारे कित्येक प्रतिवादी किंवा आरोपी होते; आणि आपल्या अधिकाराची कदर या लोकांना वाटेल अशी उपाययोजना करण्याचें कोणतेंच साधन या कोर्टाजवळ नव्हतें! वादींनीं खटला पद्धतशीर रीतीनें लढविण्याचें ठरविल्यामुळें, या कोर्टानें कांहीं साक्षीदारांना बोलाविण्याचें ठरविलें; पण, साक्षीदारांनीं बोलावणें मानलें नाहीं तर काय, या प्रश्नाला या कोर्टाजवळ कांहींच उत्तर नव्हतें! असल्या या कोर्टाची शोभा पुण्यासारख्या ठिकाणीं सुशिक्षित मंडळींनीं किती व कशी केली असेल हें सांगितलेंच पाहिजे असें नाहीं. प्रायश्चित्ताचे बाबतींत शेवटपर्यंत विशेष आग्रह धरणारे बाळासाहेब

नातूंसारखे वादी पांचच निघाले आणि त्यांना पुरून उरणारे प्रतिवादी टिळक एकच भेटले! वादीपक्षाकडून पुढें येणाऱ्या प्रत्येक शास्त्राधाराला टिळकांचें शास्त्रशुद्ध उत्तर तयार होतें! टिळकप्रभृतींनीं मिशनमध्यें चहा घेतला ही गोष्ट अमान्य नव्हतीच; पण, हा चहा घेण्यांत जात मोडणे हा हेतु होता हा नातुपक्षाचा आग्रह कोणालाच पटण्यासारखा नव्हता. अखेरीस, शंकराचार्यांनीं घाडलेल्या शास्त्र्यांनाहि हा आग्रह मान्य झाला नाहीं. चहा या पदार्थाचा उल्लेख शास्त्रांत नसल्यामुळें चहापानाला प्रायश्चित्तच नाहीं असा कोटिक्रम नातूपक्ष करूं लागला; तेव्हां टिळकांनीं हजरजबाबीपणानें उत्तर दिलें. बटाटे या पदार्थाचाहि उल्लेख शास्त्रात नाहीं; तेव्हां बटाटे खाणारे अपराधी ठरतील आणि या अपराधाला प्रायश्चित्त सांगितलें नसल्यामुळे, त्यांना जातिबाह्य मानावें लागेल, असा कोटिक्रम टिळकांनीं लढविला.

१८९२ च्या मे महिन्याच्या सुमारास कमिशननें शेवटीं या चहा-प्रकरणाचा निकाल सांगितला. मिशनमध्यें हजर असून ज्यांनीं चहा घेतल्याचें सिद्ध झालें होतें असे थोडे गृहस्थ उरले होते; त्यांपैकीं टिळकांनीं चहा घेतल्या-नंतर काशीक्षेत्री जाऊन प्रायश्चित्त घेतल्याचा दाखला पुढें आल्यामुळें, त्यांनीं फिरून प्रायश्चित्त घेण्याचें कारण नाहीं, असा कमिशननें निकाल दिला. रानडे-प्रभृति कांहीं मंडळींनीं सर्वप्रायश्चित्त घ्यावें, असें कमिशननें फर्माविलें. अशा प्रकारें या नसत्या भानगडीचा निकाल झाला तरी, बाळासाहेब नातूप्रभृति मंडळींच्या आग्रहीपणामुळे हें प्रकरण येथें मिटलें नाहीं. १८९२ च्या डिसेंबर महिन्यांत टिळकांना या कामासाठीं कुरुंदवाड येथें जावें लागलें व पुढ शंकराचार्यांच्या पुढें आपलें म्हणणें मांडावें लागलें. इतकें झाल्यानंतरहि, बाळासाहेबांच्या मनांतली या विषयाची अढी गेली नाहीं. १९०० सालापर्यंत तरी त्यांच्या मनांत ही अढी कायम होती!

या चहाच्या भानगडीमुळें जे वाद माजले ते आज—म्हणजे जवळजवळ पन्नास वर्षांनंतर—अत्यंत क्षुद्र व हास्यास्पद वाटतात; पण, त्या काळीं या वादांचें महत्त्व किती मानलें जात असेल याची कल्पना प्रचलित आख्यायिकांवरून व दंतकथांवरून चांगलीच करतां येते. गुरुकुलांत शिक्षण घेत असलेल्या टिळकांच्या मुलींच्या मैत्रिणी खेळायला टिळकांच्या घरीं आल्या तर, या चहा-प्रकरणामुळें, त्या तेथें पाणी पीत नसत! भिकाजीपंत हर्डीकरांच्या-

सारखा टिळकांचा एकनिष्ठ भक्त टिळकांच्या घरीं लग्नकार्य निघालें तर अहोरात्र तेथें राबणारा; पण, या प्रकरणात टिळकांनीं प्रायश्चित्त घेतलें नाहीं याविषयींचें असमाधान त्यांच्या पोटांत कायमच राहिलें. लग्नकार्यात सारें काम करायला टिळकांच्या घरीं सिद्ध असणारे भिकाजीपंत जेवायला मात्र स्वतःच्या घरीं जात असत. या सुमारास टिळकांच्या घरीं कोणी भिक्षुकहि येत नसे. हातांत पोथी घेऊन स्वतः श्रावणी चालविण्याचा प्रसंग या काळात टिळकांच्यावर आला होता; आणि, या काळांतच टिळकांच्या घरीं मुलीचें लग्न व मुलाची मुंज अशीं कार्यें निघालीं तेव्हां टिळकांना आचारी देखील मिळवितांना पंचाईत पडली! त्यांच्यावर लोभ करणाऱ्या एका संस्थानिकानें बाहेरगांवाहून स्वतःच्या तैनातींतले आचारी धाडून दिले तेव्हां टिळकांची ही अडचण निमावली!

या चहा-प्रकरणांतूनच एक मोठें मनोरंजक उपप्रकरण निघालें. टिळकांवर टीका करण्याच्या भरांत आगरकरांनीं असें लिहून टाकलें कीं, टिळकांनीं स्टेशनवर मुसलमानाच्या हातचा भात खाल्ला! टिळकांनीं या विधानाचा इन्कार केल्यावरहि आगरकर तें पुनरुक्त करूं लागले; तेव्हां टिळकांनीं आगरकरांवर फिर्याद करण्याची सर्व तयारी केली. फिर्याद दाखल करण्यासाठीं टिळक घराबाहेर निघणार तोंच रानड्यांची स्वारी मध्यस्थीसाठीं आली. आगरकरांनीं दिलगिरी व्यक्त करावी व हें सर्व प्रकरण मिटावें असें ठरलें; पण, आगरकरांनीं दिलगिरी व्यक्त केली ती मोठ्या पेचांतच केली. 'बोलणें फोल झालें' आणि 'डोलणें वाया गेलें' हे जुळे शब्दप्रयोग रूढ होऊन मराठी भाषा संपन्न झाली ती या दोन प्रतिस्पर्ध्यांच्या शब्दद्वंद्वामुळें होय!

१८९२च्या ऑगस्ट महिन्यांत फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपल वामनराव आपटे हे मरण पावले. टिळकांचा फर्ग्युसन कॉलेजशीं संबंध सुटला होता तरी त्या संस्थेतील कार्यकर्त्यांची योग्यता ते ओळखून होते. आपटे यांच्या मृत्यूनंतर टिळक व आगरकर या दोघांनींहि अनुक्रमें केसरी व सुधारक पत्रांत मृत्युलेख लिहिले. टिळकांनीं लिहिलेला मृत्युलेख सुधारकांतील मृत्युलेखापेक्षां सरस वठला होता. या दोन लेखांच्या गुणदोषांची चर्चा एका गृहस्थानें टिळकांजवळ केली. आगरकरांच्या लेखनशैलीचे गुण मान्य केल्यावर टिळक म्हणाले : हुकमी चांगला लेख लिहिण्याचें काम आगरकरांना साधत नाहीं.

१८९२ च्या नोव्हेंबर महिन्यांत मुंबई इलाख्याची प्रांतिक परिषद पिरून पुण्यासच झाली. या परिषदेचे अध्यक्ष सर फेरोजशहा मेथा होते. १८९२ च्या सुधारणांचा कायदा यापूर्वीच चर्चेसाठीं पुढें आलेला होता. या कायद्यामुळें निर्माण होणाऱ्या कौन्सिलाचें स्वरूप कोणत्या प्रकारचें असावें याविषयींच्या ठरावावर टिळकांनीं या परिषदेंत भाषण केलें. परिषदेच्या पुढील वर्षाच्या कामासाठीं चिटणिसांची नेमणूक झाली; तेव्हां वाच्छा, सेटलवाड या मुंबई-करांबरोबर टिळकांनाहि चिटणीस म्हणून नेमण्यांत आलें.

टिळकांचा या अवधींतला गृहस्थाश्रम कशा प्रकारचा असेल याविषयींची कांहीं कल्पना यापूर्वी प्रसंगवशात् उल्लेखिलेल्या कित्येक गोष्टींवरून करून देण्यांत आलेलीच आहे. मुलामुलींच्या सर्वांगीण शिक्षणाकडे टिळकांचें बारीक लक्ष असे. स्वतःचें वर्तन निर्मळ ठेवणाऱ्या कुटुंबप्रमुखाचा कुटुंबांतील सर्व माणसांवर जो एक प्रकारचा बिनबोलका वचक असतो तो टिळकांच्या कुटुंबांत आढळून येत असे. टिळकांचें कुटुंब जुन्या वळणाचें व धार्मिक प्रवृत्तीचें होतें. मधुकरीसाठीं रोज घरीं येणाऱ्या अनेक विद्यार्थ्यांना ही साध्वी स्वतःच्या हातानें भरपूर मधुकरी घालीत असे व मधुकरी हे अतीथि आहेत अशा भावनेनें ती त्यांना नमस्कार करीत असे. या नित्यस्वरूपाच्या आतिथ्याशिवाय, टिळकांच्या घरीं नैमित्तिक स्वरूपाचें आतिथ्यहि मोठ्या प्रमाणावर चालू असे. १८९३ च्या मे महिन्यांत स्वामी विवेकानंद हे शिकागो येथें होणाऱ्या सर्वधर्म-परिषदेला उपस्थित राहण्यासाठीं हिंदुस्थानांतून निघाले. त्यापूर्वी कांहीं महिने ते गाजावाजा न करितां हिंदुस्थानभर संचार करीत होते. या संचाराच्या ओघांत स्वामीजी पुण्यास आले होते व दहा दिवसपर्यंत टिळकांच्याच निवासस्थानीं त्यांचें वास्तव्य होतें.

टिळकांच्या अलौकिक मित्रप्रेमाचीं उदाहरणें त्यांच्या आयुष्यांत अनेक घडलीं. त्यांच्या सार्वजनिक जीवनाच्या सुरवातीच्या टप्प्यांतच त्यांतलें एक उदाहरण घडलें. टिळकांचे स्नेही श्री. वासुदेव सदाशिव बापट हे आपल्या अंगच्या कर्तृत्वानें नि वरिष्ठांच्या कृपेमुळें बडोदें राज्यांत जमीनमोजणी खात्यांत खूप वरच्या दर्जाला जाऊन पोंचले होते. गुळमुळींत नि गुळगुळींत कारभार चालण्यांतच ज्यांचे स्वार्थ सांठले होते अशा अनेक लोकांना बापटांचा करडा कारभार असह्य वाटूं लागला. बापटांच्या विरुद्ध कारस्थानें करून

त्यांना गोत्यांत आणण्यासाठीं पुष्कळ असंतुष्ट मंडळी टपून बसली होती. त्या वेळीं बडोदें राज्यांत महत्पदावर असलेले इलियटसाहेब यांना बडोदा नरेश श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्या उद्योगीपणाचें व स्वातंत्र्यप्रियतेचें मोठें कौतुक वाटे. पण, महाराजांचे हे गुणच इतर कित्येक साहेबांच्या डोळ्यांत सलत. इलियटसाहेब व महाराज हे जसे मनानें प्रायः एक त्याप्रमाणेंच, मर्यादित स्वरूपांत कां होईना, बापट, इलियटसाहेब व महाराज हेहि मनानें एक होते. महाराज व इलियटसाहेब यांच्यावर रुष्ट झालेले, पण त्यांना अपाय करूं न शकणारे, लोक व खुद्द बापटांवर रुष्ट असलेले लोक अशांची एक मोठी जूट निर्माण झाली. बापटांना गोत्यांत आणण्याचे या लोकांचे उद्योग १८९२ व १८९३ या दोन सालांतहि चालू होते; पण, त्या वेळीं त्यांना फारसें यश आलें नाहीं.

महाराज व इलियटसाहेब असे दोघेहि परदेशीं गेले आहेत हें पाहून बापटांच्या शत्रूंनीं उचल केली. बापटांनीं बडोद्यात रहाणें श्रेयस्कर नाहीं असें दिसूं लागलें. उघडपणें त्यांनीं बडोद्याबाहेर पडण्याची सोय राहिली नव्हती. या सुमारास टिळकांनीं आपले स्नेही श्री. वासुदेवराव जोशी यांना बडोद्यास पाठविलें. जोशी यांचा बडोद्याचा मुक्काम संपून ते पुण्यास परत चालले तेव्हां बापट त्यांना निरोप देण्यासाठीं स्टेशनवर गेले. याहि वेळीं बापटांच्या पाळतीवर सरकारी दूत होतेच! गाडी निघणार इतक्यांत जोशी यांनीं बापटांना गाडींत ओढलें. बापटांचें तिकीट त्यांनीं अगोदरच काढून ठेविलें होतें. बापट चालले असें पाहून त्यांच्यामागें असणाऱ्या गुप्तचरांची धांवपळ सुरू झाली; पण, इतक्यांत गाडी वेगांत आली व बापट निघून गेले! पुढें कांहीं महिने बापटांना अज्ञातवासांत काढावे लागले. १८९४ च्या जानेवारी महिन्याच्या अखेरीस बापटांना बडतर्फ करण्यांत आल्याविषयींचा हुकूम निघाला.

या वर्षाच्या ऑगस्ट महिन्यांत बापटांची चौकशी करण्यासाठीं बडोदें दरबारकडून कमिशन नेमण्यांत आलें. यानंतर बापट स्वतः कमिशनपुढें हजर झाले. बापटांच्या चौकशीच्या वेळची परिस्थिति बापटांना सर्वस्वी प्रतिकूल होती. खुद्द सरकार त्यांच्याविरुद्ध व संस्थानचे दिवाण त्यांच्या वाइटावर! दैव प्रतिकूल झालें म्हणजे मित्रहि शत्रु बनतात हें खरें; पण, प्रतिकूल दैव हें अदृश्य असल्यामुळें, कित्येक मित्र तरी मित्रच राहण्याचा संभव असतो.

सरकार प्रतिकूल झाले– विशेषतः संस्थानी सरकारचा रोष झाला– म्हणजे मग अगदी उपकृत नि ऋणानुबंधी इसम सुद्धां त्यांच्याशी उभा रहात नाही! पारशांनी ज्यांच्यावर उपकार केले होते असे लोक बडोद्यांत व बडोद्याबाहेर थोडके नव्हते! पण, पारशांच्या या प्रतिकूल काळीं, स्वतःवरच अर्थ येऊन आले आहे असे समजून, एकटे टिळकच त्यांच्या उपयोगी पडले!

१८९४ सालच्या उत्तरार्धांतले जवळजवळ ५-६ महिने टिळक या कामांत गुंतून पडले होते. बडोदे दरबारकडून सर पेरोजशहा मेथा, मॅन्सन आणि वगैरे बडे बॅरिस्टर गुंतविण्यांत आले होते. पारशी यांच्यातर्फे आरंभी महादेव चिमणाजी आपटे यांनी काम केले. पण कमिशनचें काम चालू असतांनाच दि. २२-१०-९४ रोजी आपटे मरण पावल्यामुळे, दाजीसाहेब खरे नि टिळक या जोडीलाच हें काम तडीस पोंचवावें लागलें. या वेळी काम करणाऱ्या टिळकांना प्रत्यक्ष पाहणाऱ्या एका गृहस्थाने त्यांच्या कामाच्या पद्धतीचें वर्णन पुढीलप्रमाणे* केले आहे:

पुष्कळांचें पक्षनिरपेक्ष काम करतांना पाहिलें, त्याच्यामध्ये आळस किंवा इतर कांहींतरी कमी झाली म्हणजे त्याची हालचाल स्वाभाविक-रीत्या कमी होत जाते. पण, लोकमान्यांची स्थिति तशी दिसली नाही. हे काम करण्यास बसले म्हणजे बाजूबाजूला किती मंडळी असली तरी, त्या सर्वांशी बोलून किंवा त्यांस उत्तर देण्याचें चालू ठेवून ते आपलें स्वतःचें लिहिण्याचें काम अथवा मनन करण्याचें काम बिनचूक चालवीत असत... पारशांचा खटला चालत असतांना श्रीयुत लोकमान्यांस झोप अशी जवळजवळ माहीतच नव्हती. सतत २४ तास काम करणें म्हणजे त्यांचा हातखंडा होता. इतर वकीलांची मदत करणारी मंडळी थकल्यानें, भूक लागल्यानें, झोप आल्यानें उठून जात असत; परंतु, लोकमान्यांचें काम चालूच रहात असे.

कमिशनपुढे पारशांची चौकशी झाली. या सर्व प्रकरणाचा पारशांना खूप त्रास झाला. टिळक पारशांचे मित्र म्हणून त्यांनाहि या कामीं पुष्कळ दगदग पडली. पण, १८९५ च्या आरंभीच कमिशनचा अहवाल निघून पार

* आठवणी व आख्यायिका : भा. २ : पृ. १११.

आल्यावर त्यांनीं स्वतःच या प्रकरणांत लक्ष घातल्यामुळें, बापटांची होऊं पाहणारी हानि पुष्कळ अंशीं टळली. बापट यांना फिरून पूर्वीचें स्थान मिळालें नाहीं; पण, महाराजांनीं त्यांना निर्दोषी ठरवून मासिक १२५ रुपये निवृत्तवेतन ठरवून दिलें. बापटांविषयींचा महाराजांच्या मनांतला ओलावा बापटांच्या पुढील पिढीलाहि उपकारक ठरूं शकला. सयाजीराव महाराजांच्या मनांतला टिळकांविषयींचा आदर बापटप्रकरणामुळें पुष्कळच वाढला, असें दिसतें. कारण, पुढें १८९९ सालीं महाराजांनीं टिळकांना मुद्दाम भेटीला बोलाविलें होतें व टिळकांना आर्थिक मदत करण्याचें एक निमित्त म्हणून त्यांनीं त्यांना कोणत्याशा एका ग्रंथाचें भाषांतर करावयास सांगितलें होतें. ज्याचें महत्त्व पुढें कित्येक-शतकेंपर्यंत अबाधित राहील असें स्वतंत्र लेखनकार्य करण्याबद्दलचा आत्मविश्वास टिळकांच्या मनांत नांदत असल्यामुळें, त्यांनीं महाराजांची ही सूचना सादर अमान्य केली, हा भाग वेगळा.

बापटांना त्रास देणाऱ्या अनेक व्यक्तींपैकीं मेकानकीसाहेब हे एक प्रमुख होते. बापटप्रकरण निकालांत निघाल्यानंतर वर्षसव्वावर्षांच्या अवधींतच हे साहेब जुनागडचे दिवाण पं. श्यामजी कृष्णवर्मा यांना भोंवले. बापटप्रकरणांत टिळकांनीं केलेल्या कामगिरीचें महत्त्व पं. श्यामजी कृष्णवर्मा यांना त्या वेळींच पटलें असलें पाहिजे. स्वतःवर प्रसंग आल्याबरोबर श्यामजींनीं १८९६ सालीं टिळकांचा सल्ला घेतला. या गोष्टीवरून हें निष्पन्न होऊं शकतें कीं, बापट-प्रकरणांतील टिळकांच्या कर्तृत्वाचा लौकिक सगळीकडे पसरला होता. फेरोजशहा मेथा यांचे प्रतिस्पर्धी म्हणून टिळकांनीं या प्रकरणांत वकिली काम केल्यामुळें, मेथांसारख्या गृहस्थांना टिळकांची कायदेपंडित म्हणून योग्यता किती मोठी आहे, हें देखील या निमित्तानें चांगलें पटलें.

डेक्कन एज्युकेशन सोसायटीला रामराम ठोकल्यानंतरच्या तीन-चार वर्षां-च्या अवधींत टिळक स्वतःच्या चरितार्थाच्या साधनांची जुळवाजुळव करीत असलेले दिसतात, आपल्या वृत्तपत्राचा जम बसविण्यांत गुंतलेले दिसतात, सामाजिक वादविषयांत रंगून गेलेले आढळतात, हें सर्व खरें; पण, याच काळांत त्यांची बुद्धि एका विषयाच्या संशोधनांत गर्क झालेली होती. इतर डोंगरपर्वतांप्रमाणें हिमालयाचे पायहि जमिनींत रुतलेले असले आणि त्यांच्या-प्रमाणेंच हिमालयाच्या दऱ्याखोऱ्यांत वादळी वारे घोंघावत असले तरी,

हिमालयाची कांहीं उत्तुंग शिखरें सूर्यमंडळाच्या मिठींत पडत असतात! आणि याच स्थितीमुळें हिमालय हा नगाधिराज ठरतो! इतर लोकाग्रणींच्या मानानें टिळक लोकोत्तर ठरतात याचें कारणहि एवढेंच आहे. सांसारिक प्रश्न व सामाजिक वादविवाद याचा योग्य परामर्श घेणारी त्यांची बुद्धि त्याच वेळीं इतरांना अगम्य अशा विषयांशीं झुंजत असे. मास बारा असून यज्ञांची संख्या मात्र मासांपेक्षां अधिक कां असावी, 'मासानां मार्गशीर्षोऽहम्' या वचनाचें मूळ कोणत्या भौतिक परिस्थितीपर्यंत नेऊन भिडवितां येईल—इत्यादि प्रश्न टिळकांच्या मनांत वर्षेच्या वर्षे घोळत होते. ऋग्वेदाविषयीं युरोपियन पंडितांनीं लिहिलेले ग्रंथ वाचीत असतांना टिळकांना असें वाटूं लागलें होतें कीं, केवळ भाषाविषयक पुराव्याच्या आधारें हे पंडित ऋग्वेदाचा रचनाकाल ठरवूं पहातात हें बरोबर नाहीं. ऋग्वेदांत आढळणाऱ्या ज्योतिषशास्त्रविषयक उल्लेखांची संगति लावून तद्द्वारा ऋग्वेदाच्या रचनेचा काळ ठरविणें जास्त अचूक ठरेल असें मनानें ठरवून, टिळकांनीं त्या दिशेनें संशोधन सुरू केलें. या दिशेनें विचार केला तर ऋग्वेदरचनाकाल हा ख्रिस्तपूर्व सहा हजार वर्षें इतका तरी प्राचीन ठरतो, असें टिळकांना वाटूं लागलें होतें.

आपले हे स्वतंत्र व अभिनव विचार टिळकांनीं शेवटीं १८९३ मध्यें ग्रंथरूपानें समापुढें मांडले हें खरें असलें तरी, त्यापूर्वी दोनतीन वर्षें त्यांचें मन या विचारांत गढून गेलें होतें. १८९१ च्या उन्हाळ्यांत त्यांनीं या विषयावर डेक्कन कॉलेजांत सेल्बी यांच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यान दिलें होतें. लिस्बन येथें, १८९२ सालीं भरलेल्या प्राच्यविद्यापरिषदेपुढें आपले विचार मांडावयाचे असें ठरवून, ते विचार प्रबंधांत ग्रथित करून, टिळकांनीं प्रबंध पाठवून दिला. या प्रबंधाचें लेखन चालू असतांना टिळकांनीं कसे अहोरात्र श्रम केले हें पुढील अवतरणावरून* सिद्ध होत आहे :

ओरायन पुस्तकाचें विस्तृत लेखन अनेक कारणांमुळें लांबणीवर पडलें होतें... हस्तलिखित प्रत पाठवावयाची वेळ जवळ आली तेव्हां, लॉ क्लासचें काम त्यांचे मदतनीस कै. वाकनीस वकील यांच्यावर सोंपवून, विंचूरकरांचे वाड्यांत तिसऱ्या मजल्यावर

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. १३२.

बळवंतरावजी एक महिनाभर सदरहू ग्रंथलेखनाचें काम...तोंडानें मजकूर सांगून करून घेत होते. हें काम रात्रंदिवस सारखें सुरू असून, त्या दिवसांत त्यांस झोंप दोन तासांहून जास्त मिळतच नसे. ग्रंथ तर मुदतींत तयार होऊन जावयाचा तसा गेला; पण, जागरणाचा परिणाम होऊन पुढें महिना दीडमहिनापर्यंत त्यांचें तोंड उष्णतेनें इतकें आलें कीं, एकदोन आठवडे व्याख्यान देण्यास त्यांस अत्यंत त्रास पडे.

ओबडधोबड बांधणी नि सदोष छपाई या न्यूनांमुळें १८९३ सालीं मुद्रित झालेला The Orion हा छोटेखानी ग्रंथ कित्येक पाश्चात्य पंडितांना प्रथम-प्रथम उपेक्षणीय वाटला. भराभर प्रसिद्ध होणाऱ्या सटरफटर पुस्तकांतलेंच हेंहि एक पुस्तक आहे, दुपारीं पडल्यापडल्या चाळण्याच्याच तें योग्यतेचें आहे, असा त्याचा ग्रह झाला. पण, एकदा पुस्तकांतल्या विषयाच्या प्रतिपादनात त्यांच्या बुद्धीनें प्रवेश केल्याबरोबर त्याचा हा ग्रह पार पालटून गेला. वैदिक वाङ्मय व तत्संबंधींचें इतर पौर्वात्य वाङ्मय यांच्या विस्तृत प्रदेशात टिळकांची बुद्धि लीलेनें विहार करीत असल्याचें पाहून या पंडितांची मति गुंगून जाऊ लागली. कांहीं एक अभिनव विचार मांडतांमांडतां हा ग्रंथकार आपल्या बुद्धीवर झडप घालीत आहे, असें या पंडितांना पटूं लागलें व आपले विचार गदगदा हलविले जात आहेत असा भास त्यांना होऊं लागला. १८९३ सालीं जगात निर्माण झालेल्या ग्रंथसंभारांत The Orion हा ग्रंथ अपूर्व आहे अशी कबुली त्यांच्या तोंडून बाहेर पडली आणि जगाच्या इतिहासाची काल-गणना करूं पाहणाऱ्या विद्वानांना या ग्रंथातल्या विचारसरणीचा मागोवा घेतल्याशिवाय यापुढें गत्यंतर नाहीं, असें प्रशस्तिपत्र त्यांनीं निःसंकोचपणानें देऊन टाकलें.

मध्य व आकर्षक स्वरूप येऊं लागलें. १८९४ सालचा पुणें येथील गणेशोत्सव चांगलाच मरदार झाला. पुण्याच्या या गणेशोत्सवाचें अनुकरण पुढें हळूहळू महाराष्ट्रांत अन्य ठिकाणीं होऊं लागलें.

१८९४ सालच्या गणेशोत्सव पुण्यांत सुरू झाल्यावर उत्सवाचे पहिले कांहीं दिवस निर्विघ्नपणें पार पडले. पण, समारंभाच्या शेवटीशेवटीं मुसलमानांच्या दंगेखोर प्रवृत्तीमुळें या समारंभाला गालबोट लागलें. रात्रीं दहाअकरा वाजण्याचे सुमारास श्रीमंत सरदार तात्यासाहेब नातू यांचा मेळा दारूवाला पुलाजवळील मशिदीवरून जात असतांना, मशिदींत जमलेल्या मुसलमानांनीं मेळ्यावर हल्ला चढवून मेळ्यातली पेटी फोडली व तात्यासाहेब नातूंना काठ्यांनीं झोडलें. या दंग्याची बातमी गांवांत पसरली व दारूवाला पुलाच्या आसपास लोकांची खूप गर्दी जमली. हा प्रकार झाला त्या वेळीं टिळक विंचूरकरांच्या वाड्यांत आलेले मेळे पहात बसले होते. ते व नामजोशी तत्काळ गाडींतून दारूवाला पुलाकडे निघाले. टिळकांची गाडी आली असें पहातांच लोकांनीं जयजयकार सुरू केला. खालीं उतरून सर्व परिस्थिति पहावी आणि मारामारींत जखमी झालेल्या लोकांचा परामर्ष घ्यावा अशा विचारानें टिळक खालीं उतरूं पहात होते; पण, धोरणी नामजोशांनीं त्यांना थांबवून धरलें. टिळक या ठिकाणीं रमले तर अधिकारी त्यांना कसल्या तरी भानगडींत गोंवतील हें हेरून, नामजोशांनीं टिळकांना गाडींतच थांबवून धरलें व गाडी तडक पुढें काढून, टिळकांना बरोबर घेऊन, ते त्या रात्रीं गुपचूप एका ठिकाणीं जाऊन बसले.

या दंग्यांत सामील असल्याच्या आरोपावरून पुण्याच्या पोलिसांनीं अनेक हिंदूंवरच खटले भरले. पण हे खटले ज्यांच्यापुढें चालले तो जेकबसाहेब निःस्पृह व निःपक्षपाती असल्यामुळें, सर्व हिंदु आरोपी निर्दोषी ठरले. प्रभासपट्टणपासून सुरू झालेल्या मुसलमानांच्या गुंडगिरीवर टीका करतांना आणि या परिस्थितीवर उपाययोजना सुचवितांना टिळकांनीं जे विचार मांडले आणि ज्या चळवळी केल्या त्यांचें महत्त्व आजहि कमी झालेलें नाहीं. हिंदुसंघटनाची चळवळ व त्या चळवळीमागील विचारप्रणाली अभिनव आहे असें त्या चळवळीचे पुरस्कर्ते व टीकाकार या दोघानाहि कित्येक प्रसंगीं वाटतें. पण १८९३–९४ सालीं या विषयाचा परामर्ष घेत असतांना टिळकांनीं ज्या तत्त्वांचा पुरस्कार केला त्याच

तत्त्वांचा विकास होतहोत आजची चळवळ चाललेली आहे, असें टिळकांच्या लेखांचें अध्ययन करणाऱ्या कोणाहि माणसाला कबूल करावें लागेल. 'हिंदुत्व', 'हिंदुराष्ट्र' हे शब्द अभिनव आहेत असाहि दावा कित्येकांकडून सांगण्यांत येतो. टिळकांच्या या सुमारच्या लेखांतून हे शब्ददेखील कित्येक वेळां वापरलेले आढळतात, ही गोष्ट या लोकांना विदित नसावी.

या दंग्यांची चर्चा सुरू झाल्यावर व त्यांवर उपाययोजना काय करावी या प्रश्नांचा ऊहापोह सुरू झाल्यावर, कित्येक मंडळींनीं जे आक्षेप घेतले ते पाहिले म्हणजे, आज तसलेच आक्षेप घेणारे लोक हे चाळीस-पंचेचाळीस वर्षांपूर्वीच्या कांहीं लोकांचे औरस वारस आहेत, असें वाटूं लागतें. हिंदूंनीं स्वतःच्या दृष्टीनें कोणती उपाययोजना करावी हें ठरविण्यासाठीं सभा बोलावयाची झाली तरी ती सभासुद्धां केवळ हिंदूंची असतां कामा नये असें म्हणणारे लोक त्या काळींहि होते. अशा सर्व लोकांना टिळक निर्भयपणानें असें सांगत कीं, स्वतःच्या संरक्षणाचा उपाय हिंदूंचा हिंदूंनींच ठरविला पाहिजे. हिंदु शक्तिसंपन्न व स्वसंरक्षणक्षम झाल्यानेंच असे दंगे थांबतील असें सांगण्यासहि टिळक कचरत नसत. 'तह व स्नेह हा तुल्यबल समाजांमध्येंच होतो व नांदतो' हें टिळकांचें या विषयासंबंधींचें सूत्र सर्वांनीं सदैव लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

मुसलमानांच्या दंग्यांमुळें निर्माण झालेल्या परिस्थितीचा विचार चालला असतांनाच टिळकांचें मन समकालीन महत्त्वाच्या इतर विषयांत व उद्योगांत गुंतलेलें होतें. आय्. सी. एस्. ची परीक्षा केवळ इंग्लंडांत होऊं नये, इंग्लंड व हिंदुस्थान या दोन्ही देशांत ही परीक्षा एकदम घेण्यांत यावी हा विषय या सुमारास महत्त्व पावला होता. १८९४ सालीं टिळकांनीं या विषयावर एक इंग्रजी निबंध लिहिला व त्यांनीं आपलें या विषयावरील म्हणणें पार्लमेंटच्या कित्येक सभासदांना कळविलें. याच वर्षीं टिळकांनीं मुंबई विद्यापीठाच्या सीनेट-मध्येंहि स्वतःचा प्रवेश करून घेतला. या निवडणुकीसाठीं त्यांना मोठीशी पायपिटी अगर खटपट करावी लागली, असें दिसत नाहीं. टिळकांची विद्वत्ता या वेळीं सर्वमान्य झालेली असल्यामुळें व त्यांची लोकप्रियता प्रत्यहीं वाढतच असल्यामुळें, नुसता पत्रव्यवहार करून त्यांना या निवडणुकींत यश मिळूं शकलें.

१८९२ च्या कायद्यानें अस्तित्वांत आलेल्या कायदेमंडळांना अधिकार मर्यादित होते आणि त्यांत निवडून येणाऱ्या लोकप्रतिनिधींची संख्याहि

अगदीं बेताची होती. १८९३ सालीं या कायद्यान्वयें निवडणुकी होऊन पहिलें कायदेमंडळ अस्तित्वांत आलें; त्या वेळीं, खानदेश, नाशिक, सोलापूर, सातारा, नगर व पुणें या जिल्ह्यातर्फे निवडून गेलेला प्रतिनिधीच कायदेमंडळांत नव्हता. या उणिवेविरुद्ध त्या वेळीं महाराष्ट्रांत खूपच गवगवा झाला. शेवटीं १८९५ च्या मार्च महिन्यांत मुंबई सरकारनें या सहा जिल्ह्यांतर्फेचा एक लोकप्रतिनिधि कायदेमंडळांत घेण्याचें ठरविलें. या नव्या प्रतिनिधीची निवड ह्या सहा जिल्ह्यांच्या लोकल बोर्ड सभासदांनीं करावयाची होती. १८९५ च्या मे महिन्यांत होणाऱ्या निवडणुकीला उभे रहावयाचें ठरवून, टिळक मार्च महिन्यापासूनच खटपटीला लागले. मध्यभाग रेव्हिन्यू कमिशनरचे खास मदतनीस श्री. बाबासाहेब पेंडसे हे टिळकांचे परमस्नेही असल्यामुळें, त्यांची या निवडणुकींत टिळकांना फार मदत झाली. या निवडणुकीचे मतदार फक्त ६५ होते. पण, मतदारांची संख्या मर्यादित असली म्हणजे, प्रत्येक उमेदवाराला मतदार आपल्या बाजूला वळवून घेण्याचा भगीरथ खटाटोप अगदीं शेवटपर्यंत करता येतो; आणि त्यामुळें, कर्तबगार उमेदवाराच्या दृष्टीनें असला मतदारसंघच प्रसंगीं जास्त फसव्या ठरतो. या निवडणुकींत धुळ्याचे श्री. गरुड हे टिळकांचे एक प्रतिस्पर्धी होते. गरुडघराण्याचें सरकारदरबारांत वजन चांगलें होतें; आणि खानदेशांत मतदारांची संख्या मोठी असल्यामुळें, गरुड व टिळक यांच्यापैकीं कोण यशस्वी होतो हें अनिश्चित होतें. १८-५-९५ रोजीं या निवडणुकीचा निकाल लागला आणि ३५ मतें मिळून टिळक हे या निवडणुकींत यशस्वी झाले. टिळक निवडून आले तरी, गव्हर्नरनें त्यांची निवडणूक मान्य करूं नये अशी सूचना त्या वेळीं कित्येक इंग्रजी वृत्तपत्रांनीं केली होती; पण, तिचा उपयोग झाला नाहीं. १८९७ सालीं याच जागेची फिरून निवडणूक झाली आणि त्याहि वेळीं टिळक या जागीं फिरून निवडून आले. त्या वेळचा योगायोग असा कीं, गणेशखिंडींतून परत जातांना ज्या रात्रीं रँड-आयर्स्टचे खून झाले त्याच्या दुसऱ्याच दिवशीं निवडणुकीला गव्हर्नरनें मान्यता दिल्याचें पत्र टिळकांच्या हातीं पडलें! यानंतर थोड्याच दिवसांनीं टिळकांवर राजद्रोहाचा खटला भरण्यांत आला. आपल्याला शिक्षा होणार हें दिसूं लागतांच टिळकांनीं आपल्या नामदारीचें स्थानपत्र देऊन टाकलें.

या वेळचें मुंबई इलाख्याचें कायदेमंडळ आजच्या कायदेमंडळाहून किती तरी वेगळें होतें. निवडून जाणाऱ्या नामदार समासदांची मुदत फक्त दोन वर्षांची असे; आणि, एखाद्या वर्षी कायदेमंडळाचें काम फार चाललें तरी तें आठदहा दिवसांपेक्षां जास्त दिवस चालत नसे. प्रांताच्या अंदाजपत्रकावर नामदार सभासदांना बोलतां येत असे; पण, कायदेमंडळांतील बहुमतानें अंदाजपत्रकांत कांहीं बदल करण्याचें ठरविलें तरी, तो बदल घडवून आण-ण्याला मुळींच वाव नव्हता. पुष्कळसे सभासद सरकारनियुक्त असल्यामुळें, कायदेमंडळांत वादहि बेताचाच होत असे. यामुळें, टिळक नामदार झाले तरी, त्यांच्या नामदारीनें त्यांच्या कामाचा वेळ फारसा व्यापिला नाहीं. निवडून जाणाऱ्या सभासदानें कायदेमंडळातील कामापेक्षां कायदेमंडळा-बाहेर-- म्हणजे जनतेंत-- काम करण्यालाच अधिक महत्त्व दिलें पाहिजे हें मत टिळक शेवटपर्यंत प्रतिपादीत असत. त्यांनीं स्वतः नामदार म्हणून जें काम केलें तें या तत्त्वाप्रमाणेंच चाललें होतें.

मुंबई विद्यापीठाचें सीनेट, मुंबईचें कायदेमंडळ इत्यादि प्रातिनिधिक संस्थांत टिळक शिरले ते वैयक्तिक मोठेपणासाठीं शिरले नाहींत. प्रातिनिधिक व लोकमतनिदर्शक संस्थांतून आपल्या विचाराचीं माणसें घुसवावयाचीं आणि शक्यतर त्या संस्था हस्तगतहि करावयाच्या या धोरणानें टिळक या सुमारास वागूं लागले होते. १८९५ पूर्वी त्यांचे स्नेही श्री. माधवराव नामजोशी हे पुण्याच्या नगरपालिकेंत अनेक वेळां निवडून गेले होते. १८९५ च्या मे महिन्यांत पुणें नगरपालिकेची निवडणूक झाली. या वेळीं नामजोशी पराभव पावले; पण, टिळक व त्यांच्या मताचीं आणखी पांचचार माणसें या वर्षी नगरपालिकेंत घुसलीं! त्या वेळीं पुणें नगरपालिकेच्या निवडणुकीसाठीं शहरांतील सुशिक्षित मतदारांचा एक स्वतंत्र मतदार-संघ असे. टिळक या मतदारसंघातर्फे निवडणुकीला उभे राहिले; आणि, त्यांनीं मतसंख्येच्या दृष्टीनें पहिला क्रमांक पटकाविला! पुणें नगरपालिकेंत निवडून आल्यावर पुढें एक-दोन महिन्यांतच टिळकांनीं सार्वजनिक सभा ही संस्थाहि हस्तगत केली. १८९५ च्या जुलै महिन्यांत सार्वजनिक सभेच्या अधिकारी मंडळाची निवड झाली. प्रो. गोखले यांच्यासारखीं कांहीं भिन्न मताचीं माणसें टिळकांनीं कारभारी मंडळांत राहूं दिलीं; पण, सभेंत निश्चित बहुमत आपलें राहील,

अशी व्यवस्था त्यांनी करून टाकली! यामुळे, प्रो. गोखले यांना लवकरच या संस्थेतील कारभारी मंडळांतल्या आपल्या जागेचे त्यागपत्र द्यावें लागलें. यांतूनच पुढें 'डेकन सभा' या स्वतंत्र संस्थेचा जन्म झाला. मुंबई कायदेमंडळाचे सभासद व सार्वजनिक सभेचे आधारस्तंभ म्हणून टिळकांनीं ज्या महत्त्वाच्या विषयांचा अभ्यास केला त्यांत 'प्रांतिक उत्पन्नाची व्यवस्था' हा एक विषय होता. आंकडेशास्त्राचा सूक्ष्म अभ्यास करून टिळकांनीं या विषयावर लिहिलेला एक निबंध त्या वेळच्या सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकांत प्रसिद्ध झालेला आहे.

प्रातिनिधिक संस्था हस्तगत करून आपल्या कार्याचा व्याप वाढवीत चाललेल्या टिळकांना १८९५ च्या जून महिन्यांत एक जबरदस्त धक्का बसला. या महिन्यांत फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपल गोपाळराव आगरकर हे मरण पावले. टिळकांनीं स्थापन केलेल्या डेकन एज्युकेशन सोसायटींतला हा पांचवा मृत्यु होता! या दृष्टीनें तर टिळकांच्या मनाला आगरकरांच्या मृत्यूमुळे धक्का बसलाच; पण, आपला एक स्नेही आणि श्रेष्ठ दर्जाचा एक देशभक्त इतक्या लवकर इहलोक सोडून गेला या जाणिवेनेहि टिळकांना या प्रसंगीं फार दुःख झालें. टिळक व आगरकर यांच्यामधील मतभेद व भांडणें या गोष्टी चव्हाट्यावर आलेल्या होत्या; पण, या भांडणांनंतरहि या दोघांच्या मनांत परस्परांविषयींचें प्रेम व आदर या भावना टिकून होत्या, ही गोष्ट भोंवतालच्या लोकांना तितकीशी माहीत नव्हती. आगरकरांच्या मृत्यूच्या प्रसंगानें सर्वांनाच या गोष्टीचें ज्ञान झालें. मृत्युशय्येवर पडलेल्या आगरकरांची व टिळकांची प्रत्यक्ष भेट होऊं शकली नाहीं हें खरें असलें तरी, टिळकांची भेट व्हावी यासाठीं आगरकर शेवटीं तळमळत होते, यांत संशय नाहीं. आगरकरांच्या मृत्यूनंतर टिळकांनीं 'केसरी'साठीं जो लेख लिहिला तो सांगत असतांना टिळकांच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा चाललेल्या होत्या; आणि, एरवीं जो लेख सांगण्याला तासाभराचा वेळ पुरला असता तो लेख सांगून संपविण्याला टिळकांना या प्रसंगीं पुरे चार तास लागले! आगरकरांचें स्मरण झाल्यावर पुढील आयुष्यांतहि टिळक किती गहिंवरून येत असत हें त्यांच्या सहवासाचा लाभ ज्यांना झाला अशा अनेक लोकांनीं पाहिलेलें आहे. टिळक व आगरकर हीं दोन्हीहि माणसें खऱ्या अर्थानें मोठीं होतीं. 'गुणी गुणं वेत्ति' हा न्याय त्यांना लागू होता; आणि म्हणूनच, बाह्यतः त्यांचे कितीहि मतभेद झाले तरी,

त्यांच्या वृत्तींत परस्परांविषयींची द्वेषबुद्धि वसत असणें शक्यच नव्हतें. प्रत्यक्ष भेटींत प्रेमाचें प्रदर्शन आणि पाठ फिरली कीं निंदानालस्तीची झोड हा सध्यांच्या सार्वजनिक जीवनांत रूढ झालेला शिरस्ता टिळक-आगरकरांच्या दणकट पिढींत निर्माण झालेला नव्हता. प्रामाणिक मतभेदांमुळें या विभूति कडकडून भांडत; पण, परस्परांना उपयोगी पडण्याचा अगर परस्परांच्या कार्याचें महत्त्व ओळखण्याचा प्रसंग आला तर त्या प्रसंगीं हीं थोर माणसें कधींहि कमी पडत नसत.

१८९५ च्या शेवटीं होणाऱ्या इंडियन नॅशनल कॉंग्रेसचें अधिवेशन पुण्यांत व्हावयाचें हें त्यापूर्वी मद्रासला झालेल्या कॉंग्रेसच्या वेळींच ठरलें होतें. हें अधिवेशन यशस्वी करण्यासाठीं ज्या मंडळींची योजना करण्यांत आलेली होती त्यांत सहचिटणीस म्हणून टिळकांचीहि योजना करण्यांत आली होती. अधिवेशनासाठीं अवश्य असणारें द्रव्य व इतर साधनसामुग्री यांची जमवा-जमव सुरू झाली त्याबरोबर पुण्यांत एक वितंडवाद सुरू झाला. यापूर्वी झालेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनांच्या प्रसंगीं सामाजिक परिषदेचीं अधिवेशनेंहि भरविण्यांत आलेलीं होतीं; आणि, रूढी अशी पडून गेली होती कीं, कॉंग्रेसच्या कामाला व्यत्यय न येईल अशा धोरणानें, कॉंग्रेसच्या मंडपांतच सामाजिक परिषदेचें अधिवेशनहि उरकून घ्यावयाचें. पुण्यात यापूर्वी कित्येक वर्षे सुधारक व सनातनी असा जो वाद झडत राहिला होता, त्यामुळें कॉंग्रेसच्या मंडपांत परिषद भरावी कीं काय हा प्रश्न डोकें वर काढूं लागला. १८९५ च्या पूर्वार्धांत दबूनदबून चाललेला हा वाद कॉंग्रेस जसजशी जवळ येत चालली तसतसा तीव्र व उग्र होऊं लागला.

या वादांत टिळकांची भूमिका बरेच दिवसपर्यंत मध्यम होती. सुधारक असो कीं सनातनी असो, सुशिक्षित असो वा अशिक्षित असो, व्यापारी असो कीं नोकर असो, प्रत्येकानें कॉंग्रेसच्या अधिवेशनाकडे ममत्वबुद्धीनें पहावें, पुण्याच्या प्रतिष्ठेला शोभेल अशा रीतीनें हें अधिवेशन साजरें करण्यासाठीं प्रत्येकानें शक्य तें साहाय्य करावें आणि वादग्रस्त प्रश्नांचा निर्णय करावयाचा तो रीतसर बहुमतानें करण्यांत यावा, अशी टिळकांची भूमिका होती. कॉंग्रेसच्या मंडपांत सामाजिक परिषद भरणार असेल तर आम्ही तिला कपर्दिकहि देणार नाहीं असें म्हणणारे लोक टिळकांना जसे दुराग्रही वाटत,

त्याप्रमाणेंच, मंडपांत सामाजिक परिषद निश्चित भरेल असें अभिवचन आगाऊ मागणारे प्रतिष्ठितहि टिळकांना दुराग्रहीच वाटत! अशा दुराग्रही मंडळींच्या मेळाव्यांत विवेकी माणसाची जी फरफट होते तीच टिळकांची या धायर्तीत शेवटीं झाली!

हा वाद १८९५ च्या उन्हाळ्यापासूनच सुरू झाला असला, तरी तो या सुमारास पुष्कळच दमून होता. या वर्षीच्या सप्टेंबर महिन्यापासून तो अधिकाधिक तीव्र होऊं लागला. हा वाद सुरु होण्यापूर्वीच टिळकांनीं एका अभिनव उद्योगाला आरंभ केला होता व हा वाद अगदीं उत् जात होता त्या वेळींहि त्यांचें या दुसऱ्या उद्योगाकडील लक्ष कमी झालें नव्हतें. छत्रपति श्रीशिवाजीमहाराजांच्या रायगडावरील समाधीची स्थिति काय आहे या-विषयींची माहिती यापूर्वीच्या वर्ष दोन वर्षांत इंग्रजी व मराठी वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाली होती. या प्रसिद्धीमुळे जी सार्वजनिक चर्चा सुरू झाली तिचा सुपरिणाम होत आहे, हें टिळक पहात होते. राष्ट्रीय जागृति होऊं लागली कीं, ऐतिहासिक अभिमानाच्या विषयांकडे अधिकाधिक लोकांचें लक्ष लागूं लागतें या गोष्टीचा अनुभव टिळकांना या वेळीं आला. रायगडची चर्चा होतांहोतां विद्वानांचें लक्ष प्रतापगडाकडेहि वळलें आणि 'शिवाजीमहाराजांनीं अफझल-खानाला मारलें हें नीतिदृष्ट्या समर्थनीय ठरतें कीं नाहीं,' या प्रश्नाची चर्चा सुरू झाली. रायगडावरील छत्रपतींच्या समाधीचा जीर्णोद्धार व शिवाजी-महाराजांचा धार्मिक उत्सव या कल्पना या चर्चेंतून हळूहळू पुढे आल्या

रायगडावरील समाधीच्या जीर्णोद्धारार्थ निधि गोळा करण्यासाठीं महाराष्ट्रां-तील प्रमुख मंडळींची योजना करण्याच्या हेतूनें, १८९५ च्या मे महिन्याच्या शेवटीं पुणें येथील हिराबागेंत एक टोलेजंग सभा बोलावण्यांत आली. या सभेला अनेक सरदार व कित्येक संस्थानिक उपस्थित होते. श्रीसमर्थ रामदासस्वामी यांच्या परंपरेंतले चाफळकर स्वामी हे या सभेचे अध्यक्ष होते समाधीच्या जीर्णोद्धारासाठीं निधि गोळा करण्याचा प्रस्ताव या सभेंत संमत झाला. या निधीला कोल्हापूरच्या छत्रपतींकडून मदत मिळाली तर पहावी असें ठरून, टिळक मंडळींचें एक शिष्टमंडळ कोल्हापुरास जावें असेंहि ठरविण्यांत आलें. पुण्यांत ही चळवळ सुरू झाल्याबरोबर टाइम्सप्रभृति इंग्रजी पत्रांच्या पोटांत कळवळा सुरू झाली. मुंबई सरकार उदारपणानें समाधीच्या व्यवस्थेसाठीं

प्रतिवर्षी पांच रुपये देत असतांना, या उपद्व्यापी मंडळींनी ही चळवळ कां सुरू करावी असा प्रश्न विचारण्याला या पत्रांनी प्रारंभ केला पण, या कोल्हेकुईचा सुरू झालेल्या चळवळीवर कांहींहि परिणाम झाला नाहीं. या वर्षी ऑगस्ट महिन्याच्या शेवटींशेवटीं शिष्टमंडळ कोल्हापूरच्या छत्रपतींना जाऊन भेटलें. या शिष्टमंडळाचे चिटणीस म्हणून टिळक कोल्हापुरास गेले होते. गडावरील समाधीच्या जीर्णोद्धारासाठीं सुरू करण्यांत आलेल्या निधीची रक्कम या वर्षीच्या ऑक्टोबर महिन्याच्या अखेरीस ११ हजार रुपये जमली होती.

टिळक या व अशा उद्योगांत गुंतले असले तरी पुण्यांत होणाऱ्या काँग्रेस-अधिवेशनाच्या कामाकडेहि त्यांचें लक्ष होतें. या कामासाठीं निधि गोळा करण्याचा उद्योग ते आस्थेनें करीत होते. असें असूनहि, सप्टेंबर महिन्याच्या शेवटींशेवटीं पुण्याच्या कांहीं सुधारक मंडळींनीं वृत्तपत्रांतून अशी तक्रार मांडण्याला सुरवात केली कीं, काँग्रेसच्या कामाची प्रगति पुरेशी झालेली नाहीं व टिळकांचें या कामाकडे पुरेसें लक्ष नाहीं ! टिळकांनीं या टीकेला उत्तर दिलें; पण या टीकेचा बाहेर कांहीं अनिष्ट परिणाम झालाच ! पुण्यांत काँग्रेस यशस्वी होण्यासारखी नसली तर आम्ही ती साताऱ्यास भरवितों अशी सूचना सातारकर मंडळींकडून करण्यांत आली. त्यामुळें पुण्यांत वास्तविक काय प्रकार चालले आहेत हें साताऱ्याच्या मंडळींना समजून सांगण्यासाठीं टिळक स्वतः साताऱ्याला गेले. या सुमारासच, टिळकांना काँग्रेसच्या सेक्रेटरीच्या जागेवरून काढून सर्व सत्ता आपल्याकडे घेण्याची खटपट सुधारक पक्षांतल्या कांहीं मंडळींनीं सुरू केली होती.

ऑक्टोबर महिन्याच्या २२ व्या तारखेस रे-मार्केटच्या मैदानांत श्रीमंत बाबामहाराज यांच्या अध्यक्षतेखालीं एक मोठी सभा भरविण्यांत आली. पुणें येथें भरणाऱ्या काँग्रेसच्या व्यवस्थेसाठीं जें कार्यकारीमंडळ नियुक्त झालें होतें त्यांतलें बहुमत टिळकांना विरोधी होतें. या बहुमतवाल्या पक्षाकडून टिळकांना खो देण्याचा प्रयत्न करण्यांत येत आहे ही बातमी बाहेर फुटल्यामुळें, या मंडळींना पायबंद घालण्याच्या उद्देशानेंच ही सभा भरविण्यांत आली होती. अधिवेशनाची व्यवस्था पुण्यांतील बहुजन समाजाच्या मतानें ठरली व चालली पाहिजे हा मुद्दा प्रस्थापित करण्याचा या सभेच्या सूत्रचालकांचा हेतु होता. ही सभा चालू असतांनाच, सुधारक पक्षाकडून कांहीं पत्रकें वांटण्यांत येत होतीं.

पुण्यांतील वाचाघाचीची बातमी मुंबईस जाऊन पोंचल्यामुळे, सर फेरोजशहा मेथा यांनीं दि. २६-१०-९५ रोजीं पुण्या-मुंबईच्या कांहीं निवडक मंडळींची सभा स्वस्थानीं भरविली. कॉंग्रेसच्या अधिवेशनाचें काम सर्वांच्या दिलजमाईनें व्हावें असें ठरून, या चर्चेनंतर या कामासाठीं सात सेक्रेटरी नियुक्त करण्यांत आले. या सातजणांत मुंबईचे तिघेजण होते व पुण्याच्या दोन पक्षांपैकीं प्रत्येकाचे दोन होते.

ही व्यवस्था ठरून पुण्याची मंडळी मुंबईहून परत आली; पण मनांतील संशयाचा निरास झालेला नसल्यामुळें, या व्यवस्थेप्रमाणें प्रत्यक्ष काम होणें शक्य नाहीं, असा अनुभव येऊं लागला. या सुमारास कॉंग्रेसच्या कामासाठीं निरनिराळीं पोट-मंडळें नेमण्यांत आलीं व भिन्नभिन्न खात्यांची व्यवस्थाहि लावण्यात आली. पण मुंबईस जी व्यवस्था ठरली तिच्यामुळें कॉंग्रेस अधि-वेशनाला पुण्यांतील सर्व जनतेचा पाठिंबा मिळण्याची शक्यता कमी झाली आहे, असें टिळकांना वाटूं लागले. सुधारकपक्ष व सुधारणाविरोधीपक्ष यांच्या कैचींत सांपडून आपली उगीचच कुचंबणा होत आहे असें वाटून, टिळकांनीं शेवटीं ऑक्टोबर महिन्याच्या अखेरीस चिटणिसीचा राजीनामा देऊन टाकला.

टिळक जोंपर्यंत कॉंग्रेसच्या अधिवेशनाचे चिटणीस म्हणून काम करीत होते तोंपर्यंत कोणतेंहि एकांतिक मत न मांडण्याचा निर्बंध ते व्यवस्थित रीतीनें पाळीत होते. पण या जबाबदारींतून सुटका झाल्याबरोबर त्यांनीं सामाजिक परिषद् कॉंग्रेसच्या मंडपात भरविली जाऊं नये या मताचा पुरस्कार करण्यास प्रारंभ केला. दि १०-११-१८९५ रोजीं पुण्याच्या रे-मार्केटच्या मैदानांत डॉ. गर्दे यांच्या अध्यक्षतेखालीं जी प्रचंड सभा झाली ती टिळकांनीं सुरू केलेल्या या मतप्रचारामुळेंच विशेष नांवारूपाला आली. या सभेंत भाषण करीत अस-तांना, श्रीधर विठ्ठल दाते या घटिमणानें सुधारकांना अशी धमकी दिली कीं, कॉंग्रेसच्या मंडपांत सामाजिक परिषद् भरविण्याचा आग्रह कायम राहिला तर कॉंग्रेसचा मंडपच जाळून टाकण्यांत येईल! श्रीधर विठ्ठल दाते ही चीज काय आहे हे पुणेकरांप्रमाणेंच मुंबईकरांनाहि चांगलें माहीत होतें. आमदीपणाला वाव देऊन विषाची परीक्षा पहाणें श्रेयस्कर नाहीं असा समंजसपणाचा विचार शेवटीं न्यायमूर्ति रानडे यांना सुचला; आणि, दि. २८-११-१८९५ रोजीं पुण्यास

तार करून त्यांनीं असें जाहीर केलें कीं, सामाजिक परिषद कॉंग्रेसच्या मंडपांत भरणार नाहीं, ती पुण्यांत दुसऱ्या ठिकाणीं भरविण्याचें ठरलें आहे.

अशा रीतीनें हा आगंतुक वाद मिटला. कॉंग्रेस अधिवेशनाच्या जबाबदारींतून टिळक मुक्त झाले होते तरी, कॉंग्रेसनिमित्त पुण्यास येणाऱ्या परप्रांतीय पुढाऱ्यांविषयींचें आपलें कर्तव्य आपण केलेंच पाहिजे, ही जाणीव त्यांच्या ठिकाणीं जागृत होती. म्हणून, कॉंग्रेसचे नियोजित अध्यक्ष बाबू सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांच्या स्वागतासाठीं त्यांनीं श्री. धोंडोपंत विद्वांस यांना दौंड स्टेशनवर धाडून दिलें; आणि, सुरेंद्रबाबू पुण्यास येऊन पोंचण्यापूर्वींच, हडपसर स्टेशनवर टिळक व त्यांच्या प्रभावळींतली मंडळी यांनीं त्यांचें मोठ्या थाटानें स्वागतहि केलें. पुण्यांत आलेल्या या परप्रांतीय मंडळींचा उपयोग आपल्या कामासाठीं करून घेण्यालाहि टिळकांनीं कमी केलें नाहीं. त्यांनीं दि. २९-१२-१८९५ रोजीं रे मार्केटच्या पटांगणांत शिवाजीस्मारकाबद्दलची जंगी जाहीर सभा भरविली. या सभेंत सुरेंद्रनाथ बॅनर्जी व पंडित मालवीयजी यांचीं भाषणें झालीं.

कॉंग्रेसचें अधिवेशन पार पडून गेल्यावर, शिवाजी-स्मारकाच्या कल्पनेमुळें निर्माण झालेल्या उत्साहाला एक अभिनव स्वरूप देण्याची कल्पना टिळकांच्या मनांत आली. शिवाजीच्या जन्मदिवशीं रायगडावर खूप मोठा उत्सव करावा असें स्वतःच्या मनाशीं ठरवून, हा उत्सव पार पाडण्याची जबाबदारी अंगावर घेण्याला महाड वगैरे ठिकाणची मंडळी कितीशी तयार आहेत याचा अंदाज टिळक घेऊं लागले. इकडे त्यांच्या या खटपटी चालू आहेत तोंच त्यांच्यावर एक मोठा दुःखाचा प्रसंग कोसळला! १८९६ च्या जानेवारी महिन्यांतच, टिळकांच्या अनेक उद्योगांतले सहकारी व त्यांचे जिव्हाळ्याचे स्नेही माधवराव नामजोशी हे आजारी पडले आणि या आजारांतून ते बरे होत नाहींत असें निश्चित दिसूं लागलें. नामजोशी यांनीं सार्वजनिक कार्य मोठ्या उत्साहानें चालविलें होतें; पण, त्यांच्या कौटुंबिक जबाबदारीकडे त्यांचें प्रायः दुर्लक्षच झालें होतें. मरणाच्या दारीं पडलेल्या नामजोश्यांच्या मनांत हा विचार घोळूं लागला; आणि त्यांचा प्राण घोंटाळूं लागला! निःशक्त झालेल्या नामजोश्यांच्या डोळ्यांतून अखेरीस अश्रु वाहूं लागले. तेव्हां टिळकांनीं त्यांना धीर दिला व मनांत काय आहे असें विचारलें. नामजोश्यांना बोलण्याची ताकदच

उरलेली नव्हती. त्यांनीं खुणांनीं आपली मनोव्यथा व्यक्त केली. त्याबरोबर, आपल्या छातीला हात लावून, 'त्याची काळजी मजकडे लागली' असें टिळकांनीं सुचविलें. माधवराव नामजोशी यांना दिलेलें हें वचन टिळकांनीं किती कसोशीनें पार पाडलें हें श्री. गणपतराव नामजोशी यांनीं लिहिलेल्या आठवणींमुळें प्रसिद्ध झालेलें आहे. श्री. व्य. ग. जावडेकर यांनीं लिहून ठेविलेल्या पुढील मजकुरावरूनहि टिळकांची वचननिष्ठा सिद्ध होत आहे. श्री. जावडेकर लिहितात*:

तुरुंगाची किंवा काळ्यापाण्याची शिक्षा झाली तरी टिळकांनीं धोंडूबाबांना असें बजावयाचें कीं, टिळक तुरुंगांत गेले किंवा काळयापाण्यावर गेले असें घरच्या माणसांनीं वाटेल तर समजावें। पण, माधवराव नामजोशांच्या माणसांना मात्र टिळक गायकवाड-वाड्यांत आहेत असें समजलें पाहिजे व ही गोष्ट विसरली न पाहिजे.

१८९६ च्या उन्हाळ्यांत रायगडावर शिवाजी-उत्सव मोठ्या थाटानें करण्याचें ठरलें; पण, सर्व तयारी झाल्यावर ऐनवेळीं सरकारी परवानगी मिळते कीं नाहीं, असा प्रश्न पुढें आला. तेव्हां टिळक पुण्याहून महाबळेश्वरास गेले व स्वतः गव्हर्नरला भेटून त्यांनीं या उत्सवासाठीं परवानगी मिळविली. महाबळेश्वरावरून ते तसेच महाडास गेले व रायगडच्या पायथ्याशीं विश्रांतीसाठीं न थांबतां, रातोरात डोंगर चढून गडावर गेले. रायगडावरील या पहिल्या उत्सवाच्या प्रसंगानें त्या भागांतील सगळा मराठमोळा रायगडावर गोळा झाला होता. सगळ्यांचा योग्यतेनुसार पाहुणचार घेण्याला टिळक विसरले नाहींत. रायगडावरून परत येत असतांना, टिळकांचा नातें वगैरे गांवांत सत्कार झाला. महाडच्या मंडळींनीं तर सत्कार व पानसुपाऱ्या यांची गर्दीच करून सोडली; आणि शेवटीं, बिरवाडीच्या मंडळींनीं मध्यरात्रीनंतर टिळकांना स्वतःच्या गांवीं नेऊन, त्यांना तेथें चहाची मेजवानी दिली।

---

* आठवणी व आख्यायिका : खंड २ : पृष्ठ २७०

# पर्व पांचवें : : : दुष्काळ व प्लेग

परोपकारी वृत्तीच्या मनुष्यानें देशाच्या सांप्रतच्या विपन्नावस्थेचा विचार करावयास सुरवात केली तर त्याच्या प्रकृतिमानाप्रमाणें तो तीन मार्गांपैकीं एका मार्गाचा स्वीकार करतो. दया, करुणा, श्रद्धा इत्यादि गुण ज्याचे ठिकाणीं निसर्गतः विशेषत्वानें वास करितात व प्रापंचिक सुखाविषयीं जो स्वभावतः उदासीन असतो तो साधुत्वाच्या मार्गास लागतो व देशावरील संकटपरिहारार्थ परमेश्वरी कृपेची याचना करतो. ज्यांच्या स्वभावांत मूळचीच तामसी वृत्ति अधिक व क्रोधादिकांचा आविर्भाव विशेष असे लोक अराजक मार्गानें व अत्याचारी कृतीनें आपला कार्यभाग साधण्याचे उद्योगास लागतात; परंतु, ज्यांच्या ठिकाणीं सर्वच वृत्ति कांहीं प्रमाणबद्ध अतएव व्यवहारसन्मुख स्थितींत असतात अशीं माणसें सद्यःप्राप्त साधनांनींच प्रस्तुत संकट निवारण्याचा प्रयत्न करतात.

—टिळक

भोंवतालच्या समाजाला संघटित करण्याचें व सार्वजनिक संस्थांमार्फत सामाजिक दुःखांचा परिहार करण्याचें काम करीतकरीत टिळक लोकमान्यता पावत होते त्या सुमारासच, हिंदुस्थानावर संकटाच्या एका जोडगोळीनें अचानक हल्ला केला. या जोडसंकटामुळें लोकांची विपन्नावस्था परमावधीला जाऊन पोंचली. ही सामाजिक विपत्ति ज्यांना असह्य झाली त्यांतल्या कांहीं धाडसी मंडळींनीं क्रोधाविष्ट होऊन या देशांतल्या परक्या सत्तेच्या प्रतिनिधींपैकीं कांहींजणांचे प्राण घेतले. टिळकांच्या ठिकाणच्या सर्व मानसिक शक्ति व्यवहारसन्मुख स्थितींत असल्यामुळें, विधायक स्वरूपाचीं व नीतीच्या स्वरूपाचीं अशीं उभयविध साधनें उपयोगांत आणून, त्यांनीं समाजाला दुःखमुक्त

करण्याचा प्रयत्न केला. पण ही साधने वापरण्याच्या टिळकांची कार्यपद्धति सातत्य, प्रभावीपणा नि व्यापकपणा या बाबतींत इतकी समर्थ होती की, एकान्तिक मार्गांचा अवलंब करणारे लोक व टिळक यांच्यांत प्रायः कांहीच फरक नाहीं, असें सरकारला वाटूं लागलें. मध्यम मार्गानें जाणारे टिळकच सरकारला विशेष तापदायक वाटूं लागले व त्यामुळें राजद्रोहाबद्दल तुरुंगवास भोगण्याचा प्रसंग टिळकांवर लवकरच आला.

१८९६ चा उत्तरार्ध नि १८९७ चा पूर्वार्ध मिळून सुमारें वर्ष सव्वावर्षा-च्या काळात दुष्काळ व प्लेग या दुहेरी आपत्तींचें उग्र स्वरूप या देशाला भेडसावीत होतें. यांपैकीं पहिली आपत्ति देशांतल्या लोकांना परिचित असली तरी, या वेळचें तिचें स्वरूप विशेष भेसूर होतें. दुसरी आपत्ति अपरिचित व प्राणघातक; तिच्या स्वरूपाचें ज्ञान लोकांना नव्हतें तसें सरकारी अधिकाऱ्यांनाहि नव्हतें. अर्थातच, या आपत्तींच्या परिहाराविषयींची उपाय-योजनाहि अज्ञातच होती. अशा दैवी आपत्तींच्या प्रसंगीं सरकारी अधिकारी माणुसकी टिकवून व सहानुभूति मिळवून वागले, तर लोकांचें अर्धेअधिक दुःख कमी होऊं शकतें! पण, असे प्रसंग उद्भवले की, कित्येक सरकारी अधिकाऱ्यांच्या वृत्तींत दर्पोद्धतेचा व सर्वसमर्थतेचा सैतान संचार करूं लागतो आणि या सैतानी कृत्यांमुळेंच लोकक्षोभ वाढीस लागतो!

१८९६ सालच्या पावसाळा सुरू झाल्यावर, पहिल्यापहिल्या महिन्यांत थोडा पाऊस पडला नि अतिवृष्टीमुळें सगळीकडे पिकांची नासाडी झाली. मघा-पंचकाचा पाऊस वेळेवर नि पुरेसा पडेल या आशेनें लोक आकाशाकडे दृष्टि लावून बसले होते; पण, हस्तनक्षत्र संपत आलें तरी, आभाळीचें पाणी पृथ्वी-कडे वळण्याचें चिन्ह दिसेना! त्यामुळें लोकांचीं तोंडें सुकून जाऊं लागलीं. देशाच्या कांही भागांत धान्याची भयंकर टंचाई झाल्याच्या बातम्या येऊं लागल्या तरी, मुंबई प्रांताचें सरकार कांहीच हालचाल करीना. दुष्काळाच्या संकटप्रसंगीं लोकांची उपासमार तरी टाळ व्हावी म्हणून उदार धोरणांत चालणारा 'फॅमीन कोड' नांवाचा कायदा मुंबई सरकारच्या दप्तरीं होता. पण, त्याचा उपयोग करण्याची सरकारची इच्छा आहे असें दिसेना. धान्य व वैरण यांची टंचाई असह्य होऊं लागली. शेतींचीं ढोरें कसायांच्या कत्तलींत पडूं लागलीं नि अनाथ हिंदु बालकें मिशनऱ्यांच्या जाळ्यांत अडकूं लागलीं!

टिळक या वेळीं मुंबई विधिमंडळाचे नामदार समासद होते; पण विधिमंडळाचे अधिकार किती मर्यादित आहेत हें ते चांगलें जाणून होते. फॅमीन कोडनें लोकांना दिलेले अधिकार लोकांच्या पदरांत पडावयाचे तर लोकांना चळवळ करावयाला शिकविलें पाहिजे, या चळवळीचा पुढाकार आपण घेतला तर लोकांचें म्हणणें सरकारच्या गळीं उतरविण्याला 'नामदार' हा आपला दर्जा कांहींसा उपयोगी पडेल इत्यादि गोष्टींची जाणीव टिळकांना होती. म्हणून, हातीं असलेल्या सार्वजनिक सभेमार्फत त्यांनीं चळवळीची सुरवात केली. फॅमीन कोडनें लोकांना अधिकार तरी काय दिले आहेत याची जाणीव समाजांत वाढावी म्हणून त्यांनीं या विषयावर एक मराठी पुस्तक तयार करविलें व त्याच्या प्रती खालपर्यंत पोंचविण्याची त्यांनीं व्यवस्था केली. आपण करीत असलेल्या चळवळींत गैर कांहीं नाहीं असें सरकारी अधिकाऱ्यांना वाटावें व सरकारी यंत्रांतूनच या पुस्तकाच्या प्रती वाटल्या जात आहेत हें पाहून अर्धभोळ्या लोकांनाहि विश्वास वाटावा म्हणून टिळकांनीं या पुस्तकाच्या प्रती जिल्ह्याजिल्ह्यांच्या कलेक्टरांकडेहि पाठविल्या! पण, यामुळें कांहीं कलेक्टरांच्या नाकाला मिरच्या झोंबल्यासारखें झालें!

जिल्ह्याजिल्ह्यांतून प्रचारक पाठवून दुष्काळी परिस्थितीची प्रत्यक्ष पाहणी करण्याला टिळकांनीं प्रारंभ केला. वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं खालच्या अधिकाऱ्यांकडे धाडलेले गुप्त हुकूम हस्तगत करण्याची टिळकांची हातोटी याहि प्रसंगीं सरकारला जाणवूं लागली. टिळकांच्या चळवळीचें पर्यवसान म्हणून लोक सरकारी देणें नाकारूं लागतील अशी भीति अधिकाऱ्यांना वाटूं लागली. सार्वजनिक सभेमार्फत सरकारकडे अर्ज जात, त्यांचीं उत्तरें लिहितांना सरकारी अधिकारी आपल्या मनांतला जळफळाट व्यक्त करूं लागले. कांहीं तरी प्रसंग साधून टिळकांच्या चळवळीवर झडप घालण्याची संधि अधिकारी शोधूं लागले. चळवळ तर जोरांत चालावी; पण कायद्याच्या दृष्टीनें सरकारला कोठें बोटहि शिरकवितां येऊं नये अशी दक्षता टिळक घेऊं लागले.

दुष्काळी परिस्थितींत लोकांचे हाल होऊं नयेत, कायदेशीर अधिकार वापरून लोकांनीं आपली व्यवस्था लावून घ्यावी, यासाठीं टिळक सार्वजनिक सभेमार्फत व केसरीमार्फत चळवळ करीत होतेच; पण, अशा सार्वजनिक संकटाच्या प्रसंगीं स्वतः लोकांनीं आपली सार्वजनिक हितबुद्धि जागृत ठेविली

पाहिजे यासाठींहि त्यांची खटपट चालूच असे. नफेबाजीच्या नादीं लागून धान्य महाग करणें हें सर्वांनाच बाधक होणार आहे ही गोष्ट व्यापाऱ्यांच्या मनावर ठसविण्यासाठीं टिळक स्वतः दुकानांतून हिंडत असत. कितीहि उपदेश केला तरी, व्यापारी वर्गाची नफेबाजीची प्रवृत्ति नष्ट होणार नाहीं हें ओळखून, टिळक या व्यापाऱ्यांच्या मनातल्या धार्मिक भावनेचा उपयोग करून घेण्याचा प्रयत्न करीत. श्रीमंतांनी दिलेल्या पैशांतून गरिबांसाठीं स्वस्त धान्याचीं दुकानें काढण्यात यावीं हा टिळकांचा उपदेश चालूच असे. नगर, सोलापूर वगैरे जिल्ह्यातल्या विणकर वर्गाचा धंदा दुष्काळी परिस्थितीमुळे बसूं नये या हेतूनें टिळकांनीं खूप खटपट केली. सोलापुरास जाऊन, तेथील स्थानिक पुढाऱ्यांशीं चर्चा करून आणि अखेरतर्द्द सरकारी अधिकाऱ्यांचें मन वळवून टिळकांनीं विणकर वर्गासाठीं जी खटपट केली तिचा सोलापूर, बार्शी वगैरे ठिकाणच्या विणकरांना बराच उपयोग झाला.

दुष्काळाच्या आपत्तींतून आपल्या देशबांधवांना सोडविण्याची खटपट टिळकांनीं सुरू केली त्या सुमारासच प्लेगची पाहुणी आपत्तीहि लोकांना सतावूं लागली. १८९६ च्या ऑक्टोबरच्या आरंभीं ही सांथ प्रथम मुंबईस सुरू झाली व थोडक्याच दिवसात ती पुण्यापर्यंत येऊन पोंचली. सांथीचें अपरिचित स्वरूप, आजारी पडलेला माणूस वांचण्याची असंभाव्यता आणि मृत्युसंख्येंत झपाट्यानें होत चाललेली वाढ या सर्व प्रकारांमुळें गांगरून गेलेले लोक मुंबई सोडून बाहेर पळूं लागले; व त्यामुळे ही सांथ बाहेरहि पसरूं लागली. इंग्लंडमध्यें १७ व्या शतकाच्या शेवटीं उद्भवलेल्या या सांथीमुळें केवढा अनर्थ ओढवला होता ही आठवण इंग्रज मुत्सद्द्यांना होती. प्रस्तुत प्रसंगीं मुंबईसारख्या नाक्याच्या व्यापारी केंद्रांत ही सांथ पसरली तर तिचा फैलाव ब्रिटिश साम्राज्यभर होऊन इंग्लंडच्या व्यापारी भरभराटीला पायबंद बसेल, ही भीति इंग्लंडमधील लोकांना वाटूं लागली. युरोपमधील तज्ज्ञ मुंबईच्या या सांथीचा विचार गंभीरपणें करूं लागले. ही सांथ हटविण्याचे नवे नवे उपाय सुचविण्यांत येऊं लागले व या उपायाची अंमलबजावणी सरकार सक्तीनें करील, असा संभव दिसूं लागला.

मुंबईस प्लेगची सांथ सुरू होऊन पळापळ सुरू झाली त्या वेळीं विद्यापीठाच्या सर्व परीक्षा व्हावयाच्या होत्या ति त्या सुरू होण्याची वेळ अगदीं जवळ

आली होती. परीक्षांचें स्थलांतर करण्यांत यावें अशी चळवळ विद्यार्थ्यांनीं सुरू केली; पण, विद्यापीठाचे अधिकारी विद्यार्थ्यांचें म्हणणें मानण्याला तयार होईनात. या वेळीं टिळक विद्यापीठाच्या सीनेटचे सदस्य असल्यामुळें, कित्येक विद्यार्थी त्यांना भेटले. टिळकांनीं विद्यार्थ्यांना हवा असलेला अर्ज तयार केला व परीक्षांच्या स्थलांतराचा विषय सीनेटपुढें चर्चेसाठीं आणण्याविषयींचें आश्वासनहि दिलें. पण, विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें हा मार्ग विशेष फलदायक होण्यासारखा नाहीं हें टिळकांना माहीत असल्यामुळें, विद्यापीठाच्या सिंडिकेटचे सभासद न्या. मू. रानडे यांच्या मार्फतहि खटपट करा, असें त्यांनीं विद्यार्थ्यांना सांगितलें.* प्रोफेसर गोपाळराव गोखले यांच्या मार्फत सिंडिकेटच्या कांहीं इंग्रज सभासदांना भेटण्याचा विचार विद्यार्थ्यांच्या मनांत घोळत होता; पण, विद्यार्थ्यांना एक शंका आली. या वेळीं सार्वजनिक सभेला प्रतिस्पर्धी म्हणून डेक्कन सभा ही संस्था पुण्यांत निघाल्यामुळें, टिळकांनीं रानडे-गोखले प्रभृति मंडळींवर टीकेची झोड उठविली होती. गोखल्यांकडे आपण गेलों तर टिळक रागावतील अशी शंका या तरुणांना आली. पण, गोखल्यांचा उपयोग होत असेल तर तो अवश्य करून घ्या असा सल्ला टिळकांनीं दिला. टिळकांनीं धाडलेला ठराव सीनेटपुढें येणार अशी वार्ता प्रसृत झाल्यामुळें, विद्यार्थिवर्गांत खूप खळबळ उडाली होती. अखेरीस परीक्षेचा मंडपच अनपेक्षित रीतीनें जळून गेल्यामुळें, परीक्षा पुढें ढकलण्याशिवाय अधिकाऱ्यांना गत्यंतरच उरलें नाहीं! पुण्याच्या विद्यार्थ्यांपैकीं कोणी तरी मंडप जाळला असला पाहिजे व या विद्यार्थ्यांना टिळकांचें प्रोत्साहन मिळालें असलें पाहिजे असा तर्क मुंबई विद्यापीठांतल्या कांहीं शहाण्यांनीं त्या वेळीं लढविला होता. पुढें रँड-आयर्स्टचा वध झाल्यावर, दामोदरपंत चापेकर यांनीं जो कबुलीजबाब दिला त्यावरून हें उघड झालें कीं, चापेकरांनीं मंडप जाळला होता; टिळकांचा त्या प्रकाराशीं संबंध नव्हता!

सार्वजनिक सभेतर्फे ठिकठिकाणीं प्रचारक पाठवून टिळकांनीं दुष्काळग्रस्त लोकांना जागृत व संघटित करण्याची जी चळवळ सुरू केली होती ती सरकारी अधिकाऱ्यांच्या डोळ्यावर येऊं लागलीच होती. या चळवळीविरुद्ध सरकार कांहीं तरी शस्त्र उपसणार असें १८९६ च्या डिसेंबर महिन्यांत दिसूं लागलें.

---

* आठवणी व आख्यायिका : खं. १ : भा. १ ; पृ. ५२-५३

दि. १३।१२।१६ रोजीं ठाणें जिल्ह्यातील उमरगांव पेट्यांत ससलगाढ या गांवीं गरीबगुरीब रयतेची एक मोठी सभा झाली. या सभेच्या वेळीं महालकरी, फौजदार, असिस्टंट कलेक्टर दुधोले वगैरे अधिकारी पोलिस पार्टीसह उपस्थित होते. म्हणून टिळकांनीं दि. १५।१२ च्या केसरींत या सभेचें 'पोलिसांच्या पेटारेल्या बंदुकींच्या टप्प्यांत भरलेली सभा' असें वर्णन केलें. या सभेत सार्वजनिक सभेचे प्रचारक प्रा. अ. शि. साठे यांनीं 'पिकें बुडालीं असलीं तर सरकारसारा देऊं नका' असें लोकांना निर्भय बजावून सांगितलें. सभेच्या वेळीं दुधोलेसाहेब गोंधळलेल्यासारखे वागले; पण, साहेबांच्या एकंदर वृत्तीवरून हें स्पष्ट दिसलें कीं, सभेच्या प्रचारकांवर सरकार लवकरच हात टाकणार!

या वर्षीचें काँग्रेसचें अधिवेशन कलकत्ता येथें भरावयाचें असल्यानें वरील प्रसंगानंतर थोड्याच दिवसांनी टिळक तिकडे गेले. मध्यंतरी प्रा. साठे, प्रा. शि. म. परांजपे, दत्तोपंत आपटे वगैरे मंडळी प्रचारकार्यासाठीं कुलाबा जिल्ह्यांत फिरली. त्यांचा मुक्काम पेण येथें असतांना, त्यांच्यावर खटला भरल्याचें झालें ही बातमी तारेनें टिळकांना कलकत्त्यास कळविण्यांत आली. त्याबरोबर ते तसेच पुण्यास परत निघाले. कलकत्त्याहूनचा प्रवास अहोरात्र करीत, टिळक भल्या पुण्यास येऊन पोंचले तों मंडळी त्यांची वाट पहात बसली होती! खटला कसा चालवावयाचा इत्यादि विचार ठरवून टिळक पेण येथें जाण्यासाठीं निघाले.

पेण येथें टिळकांचें आगमन झालें त्या वेळीं काय काय प्रकार झाले याचें वर्णन हे. भ. रामभाऊ मंडलीक यांनी पुढील प्रमाणें* केलें आहे :

खटल्याच्या पहिल्या दिवशीं कूकसाहेबाच्या कचेरीला हजारों लोकांचा जेव्हां गराडा पडला व 'टिळक महाराज की जय'च्या आरोळ्यांनीं जेव्हां दशदिशा दुमदुमून गेल्या तेव्हांचें दृश्य माझ्या डोळ्यांसमोर अजून उभें आहे. ... लोकांना गप्प करण्याचा प्रयत्न पोलिस पुष्कळ करीत होते, पण, त्यांत त्यांना यश येईना तेव्हां अखेर कूकसाहेबांनीं 'आपण तरी लोकांना दोन शब्द सांगून गप्प करण्याचा प्रयत्न कराल काय?' अशी टिळकांना विनंति

* आठवणी व आख्यायिका : खंड २ - पृ. ४०७-८.

**केली....( टिळक ) तंबूबाहेर आले....ते बोलण्याकरितां बाहेर येतांच त्यांच्या नांवाचा जयजयकार प्रथम झालाच; पण, हात वर करून ते बोलूं लागतांच एकदम जिकडे तिकडे इतकी शांतता झाली कीं, त्यांचा प्रत्येक शब्द सर्वांना स्पष्ट ऐकूं येत होता.**

प्रा. परांजपे व साठे यांच्यावरील खटल्या तावडतोब निकालांत निघून दोघेहि निर्दोषी ठरले; आपटे यांना मात्र जबर शिक्षा ठोठावण्यांत आली. अशिक्षित शेतकरीवर्गांतहि टिळक इतके लोकप्रिय आहेत हें पाहून असि. कलेक्टर ब्रुकसाहेब यांना फार नवल वाटलें. त्यांनी टिळकांना मुद्दाम भेटीला बोलाविलें व जनतेची त्यांच्यावरअलोट भक्ति आहे याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें. लोकांची भक्ति आपल्यावर किती आहे हें टिळक उत्तम प्रकारें ओळखीत असत; पण, निःशस्त्र व असहाय लोकांच्या भक्तीचें योग्य मूल्यमापनहि ते करीत असत, हें या खटल्याच्या प्रसंगींच घडलेल्या एका प्रकारावरून सिद्ध होत आहे. या खटल्याचें काम चालू असतांना, एका क्षणीं टिळकांची मुद्रा किंचित् चिंतित दिसूं लागली. ज्यांच्यावर खटला भरण्यांत आला होता त्या प्रचारकांपैकीं एकाच्या हें लक्षांत आलें व तो टिळकांना म्हणाला: बळवंतराव, तुम्ही कांहीं घाबरूं नका. कोर्टाच्या बाहेर दोन हजार सोडगे माझ्या रक्षणाकरितां उभे आहेत. यावर टिळक कांहींच बोलले नाहींत; पण, पुण्यास परत आल्यावर दे. न. भाऊसाहेब लवाटे यांना या प्रसंगाची माहिती सांगतांना टिळक म्हणाले*: **त्या गृहस्थांनीं जेव्हां हे उद्‌गार काढले तेव्हां मला हंसूं आलें व मीं मनांत म्हटलें कीं, प्रसंग पडला तर यांतला एक तरी मनुष्य याला उपयोगी पडेल काय?** पेणचें काम आटोपून टिळक या वेळीं अलीबाग, किहीम, आवास वगैरे गांवीं गेले व तेथून ठाणे जिल्ह्याकडे वळले.

ही फिरती संपवून टिळक पुण्यास परत येतात तोंच त्यांना सरकारच्या प्लेगविषयक धोरणाकडे वळावें लागलें. सप्टेंबर-ऑक्टोबरपासून सुरू झालेला प्लेग अद्याप आटोक्यांत येत नाहीं असें पाहून, तो आटोक्यांत यावा यासाठी कडक उपाययोजना करण्याचें सरकारी धोरण या सुमारास ठरून राहिलें

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. १७४.

होतें. मुंबईस ही सांथ उद्‌भवल्याबरोबर, दि. ६-१०-९६ च्या केसरींत टिळकांनीं लिहिलेला लेख ऐतिहासिक माहितीनें खचून भरलेला आहे. वाग्भटांत वर्णिलेल्या अग्निरोहिणी नांवाच्या रोगाशीं प्रस्तुत रोगाचें साम्य आहे, सुश्रुतादि ग्रंथांत हा रोग प्रायः असाध्य असल्याचें सांगितलें आहे इत्यादि माहिती या लेखात दिलेली असून, इ. स. १६११ पासून १८३६ पर्यंतच्या काळांत हिंदुस्थानच्या कोणत्या भागांत या सायीचा फेरा येऊन गेला, याविषयींचें ऐतिहासिक विवेचनहि या लेखांत करण्यांत आलेलें आहे. या लेखांत सरकारी धोरणावर फारशी टीका मात्र केलेली नाहीं.

१६-२-९७ पासून ६-४-९७ पर्यंतच्या केसरींत टिळकांनीं जे प्लेगविषयक लेख लिहिले त्यांत सरकारी धोरणावर टीका तर आहेच; पण, या सांथीच्या आणीबाणीच्या प्रसंगीं घाबरटपणानें वागणाऱ्या लोकांची या लेखांतून कान-उघाडणीहि केलेली आहे. हिंदुस्थान सरकारनें दि. ४-२-९७ रोजीं वरिष्ठ कायदेमंडळांत एक कायदा घाईघाईनें पास करून घेतला. प्रांतोप्रांतींच्या गव्हर्नरांना व जिल्ह्याजिल्ह्यांच्या कलेक्टरांना प्लेग प्रतिबंधक उपाययोजना करण्यासाठीं विशेष अधिकार देण्यांत आले. साताऱ्यास असिस्टंट कलेक्टर म्हणून काम करतांना ज्याच्या विक्षिप्तपणाचा नि कडकपणाचा खूप बभा झाला होता ते रँडसाहेब पुण्यांतल्या प्लेगचें उच्चाटन करण्याच्या निमित्तानें पुण्याच्या बोकांडीस बसत असल्यामुळें, सरकारी नियमांची अंमलबजावणी होतांहोतां पुण्याच्या लोकांचे किती व कसे हाल होतील याचा अदाज टिळकांनीं स्वतःच्या मनाशीं बांधला. मनांत असलेलें सगळें स्पष्टपणें बोलणेंहि शक्य नाहीं, स्पष्टपणें न बोलतांहि चालण्यासारखें नाहीं अशा बिकट परिस्थितींत सांपडून टिळकांनीं या सुमारास अनेक लेख लिहिले. त्यांत उमटलेला टिळकांच्या मनांतला संताप नि रँडशाहींत पुण्यांतल्या लोकांची झालेली दैन्यावस्था यांची कल्पना मनांत उभी राहिली म्हणजे टिळकांच्या लेखणीच्या संयमाचें कौतुक वाटूं लागतें!

मार्चच्या पहिल्या आठवड्यांत पुण्यांतली रोजची मृत्युसंख्या ६०-६५ पर्यंत गेली नि भयभीत झालेले लोक गांव सोडून पळून जाऊं लागले. ही प्रकार पाहून टिळकांना जो उद्वेग वाटला तो पुढील वाक्यांत* व्यक्त झाला आहे:

* केसरी : दि. ९।३।९७.

**परवांजे हजारों लोक मिळेल त्या गाडींत-बसून गांव सोडून गेले ते अगदीं मूर्खपणानें गेले असें म्हणणें भाग येतें...परवांपर्यंत गांवाबाहेर जितके लोक गेले इतके होळकराच्या दंग्याच्या वेळींहि गेले नसतील, असें आम्हांस वाटतें. मग ह्या वाढत चाललेल्या हतवीर्यतेचा प्रभाव म्हणा अगर अज्ञानाचा किंवा गैरसमजाचा म्हणा.**

प्लेगचे रोगी घरांत लपवून ठेवण्यांत येतात व त्यामुळें प्लेग रेंगाळतो, प्लेगदूषित घरांचें शुद्धीकरण न केल्यामुळें प्लेग रेंगाळतो, अशीं नानाप्रकारचीं निमित्तें सांगून सरकारनें पुण्यांतल्या हिंदूंच्या घरांत गोरे सोजीर घुसविण्याला सुरवात केल्यामुळें, पुण्यांत त्या वेळीं कोणते अनन्वित प्रकार सुरू झाले होते याची कल्पना होण्याला पुढील वाक्यें पुरें आहेत : (१) पुष्कळ ठिकाणीं सोजीर लोक स्वैंपाकघरांत व देवघरांत शिरतात अगर ज्यांत मनुष्य किंवा प्रेत मावण्याचा संभव देखील नाहीं अशा लहान पेट्यादेखील कित्येक वेळां फोडतात. (२) रोगी हॉस्पिटलांत, इतर माणसें सेग्रिगेशन कँपमध्यें आणि घरची माल-मिळकत चोरापोरांच्या हातांत अशी व्यवस्था होऊन अनेक गरीब कुटुंबाचें सर्वस्वी नुकसान होईल. (३) हल्लीं गर्भार बायका, बाळंतिणी, म्हातारे-कोतारे वगैरे सर्वांस वैद्यांप्रमाणें पकडून उघडीबोडकीं जीं सेग्रिगेशन कँप-मध्यें पाठवितात तसें न करतां जर गर्भार किंवा बाळंतिणी बायका आणि म्हातारीकोतारीं यास शहरांत त्यांच्या घरांतच राहूं दिलें तर त्यापासून कांहीं मोठासा तोटा होईल, असें आम्हांस वाटत नाहीं.

शहाण्या इंग्रजी कामगारांना लोकांच्या व लोकनायकांच्या शहाणपणाची किंमत वाटत नाहीं, लोक सर्वाशीं गरीब झाले आहेत व त्यामुळें पुणें शहरात हा धुडगूस चालू आहे हें टिळकांना दिसत होतें. पण, स्वस्थ बसून लोकांची दैना पहाणें हें जसें त्यांच्या स्वभावाला मानवण्यासारखें नव्हतें त्याप्रमाणेंच लोकांना संकटात ठेवून स्वतः संकटापासून दूर सरणेंहि त्यांच्या स्वभावाला मानवण्यासारखें नव्हतें. गांव ओस पडला तरी मुलांमाणसांसह टिळक गांवांतच रहात होते. सरकारी अधिकारी बेपर्वाईनें वागत होते तरी, डॉक्टर लोकांच्या सभा भरवून व म्युनिसिपॅलिटीच्या अधिकाऱ्यांना हलवून, सरकारी अधि-कार्‍यांना 'जेकेमत कळविण्याची' व्यवस्था ते करीतच होते. हिंदु हॉस्पिटल काढण्याच्या कामीं पुढाकार घेऊन व तेथील काम चोख चाललें आहे कीं

नाही हें पाहण्यासाठीं रोज हेलपाटे मारून, आपद्ग्रस्ताची सोय करण्याचें विधायक कार्यहि टिळक करीत होते. या हॉस्पिटलमध्यें दाखल झालेल्या अनाथ मायाबापड्यांना हॉस्पिटलची फी देण्याची ऐपत नसली तर, स्वतःच्या पदरचे पैसे देऊन टिळक त्यांची अडचण भागवीत होते.

प्लेगला पायबंद घालू पाहणाऱ्या सरकारची स्थिति 'इकडे आड नि तिकडे विहीर' अशा प्रकारची झाली आहे हें मान्य करणारे टिळक सरकारी अधिकाऱ्यांनी उपाययोजना करतांना लोकांचें सहकार्य मिळवावें नि लोकांच्या भावनांचा मान राखावा, इतकेंच म्हणत होते. तिकडे दुर्लक्ष करून रँडसाहेब व त्याचे हस्तक पुण्यांत मन मानेल तसे वागत होते. प्लेगप्रतिबंधक उपायांची चर्चा ठिकठिकाणी चालू होती तिकडेहि टिळकांचें लक्ष होतेंच. दूषित हवेतून स्थलांतर करणें व निसर्गाच्या नियमानुसार दूषित हवा स्वच्छ होण्याची वाट पाहणें हेच तत्कालस्थितींतले उपाय होत असें आपलें मत असल्याचें टिळक उघडपणानें सांगत असत. आणि, शेवटी १८९७ सालच्या प्लेगच्या वेळीं तेंच खरें ठरलें. एप्रिल महिन्यांत उन्हाळा सुरू झाल्याबरोबर रोग झपाट्यानें हटू लागला व ओसाड झालेलें पुणें शहर फिरून आपले नित्याचे व्यवहार करूं लागलें.

## पर्व सहावें : : : राजद्रोहाचा पहिला खटला

**आपल्याला जर सदैव राजकारणांतच रहावयाचें आहे तर अशा संकटांना आपण नेहमीं तयार राहिलेंच पाहिजे.**

—टिळक

पुण्यांत चाललेला प्लेगचा धुमाकूळ व प्लेग शमविण्यासाठीं करावयाच्या उपाययोजनांचा धुमाकूळ यांमुळें वैतागून गेलेल्या पुणेंकरांना शेवटीं वसंत-ऋतूनें सुखाचे दिवस दाखविले. मध्यंतरीं पुणें शहरावर उदासपणाची घनदाट छाया पसरून राहिली असल्यामुळें, उन्हाळ्यांत नित्याचाच जीवनक्रम सुरू झाला व रहदर वाजवजून रोखे या साध्या गोष्टींनेंहि लोकांना मोठें समाधान वाटलें. मोगद्यांतील अंधार संपला आणि परिचयाचाच प्रकाश डोळ्यांना फिरून दिसला म्हणजे मनाला जसें समाधान वाटतें तसेंच समाधान पुणें-करांच्या मनाला वाटूं लागलें. प्लेगच्या अमदानींत टिळकांनीं सरकारी व्यवस्थे-वर टीकेची झोड सुरू ठेविली असल्यामुळें, लोकांना एकसारखी अशी भीति वाटत होती कीं, टिळकांवर खटला भरून सरकार त्यांना कोठडी केव्हां दाखवील याचा नियम नाहीं. या भीतींतून टिळक निभावले हेंहि समाधान पुणेंकरांना वाटत होतें.

या सुमारास व्हिक्टोरिया राणीच्या राज्यारोहणाला तब्बल ६० वर्षें पुरीं होत असल्यामुळें, राज्यारोहणाच्या हीरकमहोत्सवाबद्दलच्या थाटामाटी सुरू झालेल्या होत्या. प्लेगसारख्या संकटांतून प्रजा बाहेर पडली असल्यामुळें, तिनें या प्रसंगीं सुखासमाधानानें राजनिष्ठा व्यक्त करावी हेंच एकंदरींत श्रेयस्कर ठरेल असें मनाशीं ठरवून, टिळकांनीं या महोत्सवाबद्दल एक लेखमालाच लिहिण्याला सुरवात केली. इकडे ही लेखमाला चालू होती तोंच पुण्यांत शिवराज्याभिषेकोत्सव सुरू झाला. या उत्सवाचा फायदा घेऊन समाज संघटित करण्याचा व समाजांतील उत्साह वाढविण्याचा टिळकांनीं प्रयत्न चालविला. या उत्सवांतील एक कार्यक्रम खुद्द विंचूरकरांच्या वाड्यांतच झाला. प्रो. चिं. ग.

भानू याच्या मनांत नसतानाहि, टिळकांनी आग्रह केल्यामुळे त्यानी या ठिकाणी व्याख्यान दिलें. शिवाजी महाराजांनी अफझलखानाला मारलें तो वध आहे, खून नव्हे, हा प्रो. भानू यांच्या व्याख्यानाचा विषय होता.

या व्याख्यानानंतर प्रसिद्ध झालेल्या केसरीच्या अंकांत 'निशाणी भवानी तरवार' या सहीनें व 'शिवाजीचे उद्गार' या मथळ्यानें कोणा एका गृहस्थानें पाठविलेल्या कविता प्रसिद्ध झाल्या. प्लेगच्या दिवसांपासून टिळकांच्या लेखना-कडे बाकदृष्टीनें पाहणाऱ्या कोणा तरी माणसानें 'जस्टिस' हें टोपण नांव धारण करून, केसरींतल्या यच्चावत मजकुराचें भाषांतर मुंबईच्या टाइम्समधून प्रसिद्ध केलें. या सुमारासच श्री. दत्तो अप्पाजी तुळजापूरकर यांनीं सातारच्या 'महाराष्ट्र मित्र' पत्रांत 'पुण्याचे लोक' या मथळ्याखालीं एक कडक लेख लिहिला होता. 'ऑनेस्ट' हें टोपण नांव धारण करणाऱ्या कोणा उपद्व्यापी गृहस्थानें याहि लेखांतल्या काहीं उताऱ्यांचीं भाषांतरें 'टाइम्स'मध्यें प्रसिद्ध केलीं. अशा लेखांचीं भाषांतरें टाइम्समध्यें प्रसिद्ध झालीं कीं पुढें काय वाढून ठेविलेलें असतें हें लोकांना माहीत झालेलें होतें. श्री. तुळजापूरकर हे आपल्यावर खटला होणार अशा कल्पनेनें टिळकांना भेटले. त्या वेळीं तुळजापूरकर व टिळक यांमध्यें झालेल्या संवादांतलें एक वाक्य* नमुनेदार आहे. "पॅसिलि-टीज कोणत्याही न दिल्या तरी तुरुंगांत विचार करण्याचें तुमचें स्वातंत्र्य तर काहीं सरकार हिरावून घेऊं शकत नाहीं!"—असें टिळक म्हणाले.

केसरींत राजद्रोहात्मक लिखाण प्रसिद्ध होत आहे असें हें भाषांतच्चे सुत्रवीत असलें तरी, टिळकांचा उद्योग संयमानें चाललेला होता. हीरक-महोत्सवासंबंधीं कोणतें धोरण पतकरावयाचें याचा निश्चय त्यांच्या मनांत झालेला असल्यामुळें, महोत्सवाच्या दिवशीं गणेशखिंडीवर होणाऱ्या समारंभाला हजर राहण्याचें त्यानी योजिलें होतें. गव्हर्नरसाहेबांचे बंगल्यांत मंगळवार दि. २२ जून रोजीं रात्रीं मोठी मेजवानी झाली. गांवातील अनेक प्रतिष्ठित मंडळींना या प्रसंगीं बोलावण्यांत आलें होतें. बंगल्याच्या विस्तीर्ण आवारांत उत्कृष्ट रोषणाई केलेली होती. भोंवतालच्या टेकड्यांवरून लांकडांच्या व गवताच्या होळ्या पेटविण्यात आल्या होत्या. हें आनंदप्रदर्शन जरा अवळ

* आठवणी व आख्यायिका : ख. १ : भा. १ : पृष्ठ १६९.

मध्यरात्रीपर्यंत चाललें होतें. या प्रसंगीं गणेशखिंडीवर हजर असलेल्या मंडळींत रँडसाहेब, प्लेगच्या अमदानींत लोकांना सेग्रिगेट करणारे ले. लुईसाहेब वगैरे अधिकारी उपस्थित होते.

समारंभ संपून निमंत्रित मंडळी घरोघर परतूं लागली. पहिली गर्दी निघून गेल्यावर रँडसाहेब वगैरे कांहीं दोनरी मंडळी गणेशखिंडींतून बाहेर पडली. रँडसाहेब एका गाडींत बसले होते व त्यांच्या मागच्या गाडींत ले. आयर्स्ट व त्यांची बायको अशीं दोघें बसलीं होतीं. या गाड्या गणेशखिंडीवरील बंगल्याच्या मुख्य फाटकापासून सुमारें पांचशें यार्डांवर आल्या. गाड्या संथपणानें चालू होत्या. इतक्यांत बाजूच्या झाडींतून कोणी मनुष्य बाहेर आला. तो पुढच्या गाडीवर मागून चढला व त्यानें पाठीकडून रँडसाहेबावर पिस्तुल झाडलें. गोळी व छरे साहेबाच्या डाव्या खांद्यांत शिरून तो गाडींतच बेशुद्ध पडला. हा प्रकार घडत आहे तोंच मागच्या गाडींतहि बार झाल्याचा आवाज ऐकूं आला. या बारांतील गोळी आयर्स्ट यांच्या डोक्यांतून आरपार निघून गेली. त्याचें तत्काळ प्राणोत्क्रमण होऊन तो बायकोच्या अंगावर कोसळून पडला. या प्रकाराचा गवगवा झाल्यावर गणेशखिंड-रस्त्याची नाकेबंदी करण्यांत आली. रँडसाहेबांना रुग्णालयांत पोंचविण्यांत आलें; पण, ते फार दिवस जगणार नाहींत हें स्पष्ट दिसूं लागलें. दहाबारा दिवसांनीं ते इहलोक सोडून गेले. त्यांच्या स्मशानयात्रेला गेलेल्या हिंदी मंडळींत डॉ. भांडारकर होते. दफनभूमीच्या प्रवेशद्वारापाशीं भांडारकरांनाहि रोखण्यांत आलें!

टिळक गणेशखिंडीवरून रात्रीं परत आले त्या वेळीं त्यांना या प्रकाराची कुणकुणदेखील लागलेली नव्हती. ही वार्ता दुसऱ्या दिवशीं सकाळपर्यंत शहरांत फारशी पसरली नाहीं. उजाडल्यानंतर मात्र ज्याच्या त्याच्या तोंडीं हा एकच विषय ऐकूं येऊं लागला. उघडपणें चर्चा करण्याची चोरी असल्यामुळे, पुष्कळसे लोक जपून व मिळूनच आपले तर्ककुतर्क बोलून दाखवूं लागले. खून कोणा तरी ब्राह्मणानें केलें असावें असा सरकारी अधिकाऱ्यांचा वहीम होता. सामान्य माणसाला पिस्तुलें-काडतुसें मिळणें कठीण; आणि सामान्य माणसाची नेमबाजीहि बेताचीच; यामुळें पुष्कळ लोकांनीं असा तर्क केला कीं, हिंदी लष्करांतल्या असंतुष्ट शिपायांपैकीं कोणी तरी हें कृत्य केलें असावें. साहेबासाहेबांतहि पुष्कळ हेवेदावे असतात हें बिंग त्यांना माहीत होतें

त्यांतले कांहीं लोक कुजबुजत कीं, रँडसाहेबाच्या पाठ्यावर असलेल्या कोणा तरी साहेबानेंच सूड घेतला असावा! इकडे लोक तोंडांतल्या तोंडांत पुटपुटत आपल्या तर्कबुद्धीचें समाधान करीत होते; तर तिकडे पोलीस अधिकारी खुनाचा तपास करण्यासाठीं धडपडत होते! खून झाला त्या जागेजवळून सडकेखालच्या मोरींत त्यांना दोन तरवारी, एक घाटदी वगैरे जिनसा सांपडल्या. आयर्स्टच्या घायकोचा व मरणोन्मुख स्थितींत असलेल्या रँडसाहेबाचा जबाब घेण्यांत आला; पण त्यांत विशेष असें कांहीं निष्पन्न झालें नाहीं. रँडसाहेबाच्या गाडीत मागून चढलेला इसम ठेंगणा, जाडेलासा असावा व त्याचा पोषाख पांढरा असावा, इतकीच माहिती या जबाबांतून बाहेर आली. गुन्ह्याचा तपास लवकर लागावा म्हणून, चतुराईबद्दल प्रसिद्ध असलेल्या ब्रुइनसाहेबाला या कामावर मुद्दाम नेमण्यांत आलें आणि गुन्ह्याचा तपास लावून देणाऱ्या इसमाला वीस हजार रुपये बक्षीस मिळतील, असें सरकारनें जाहीर केलें.

गुन्ह्याच्या तपासाचें काम अशा प्रकारें चाललें आहे तोंच सरकारच्या बाजूच्या इंग्रजी वृत्तपत्रांनीं आपल्या अकलेचे तारे तोडण्यास प्रारंभ केला! या खुनामागें पुण्यांतील ब्राह्मणांनीं केलेला एखादा कट असला पाहिजे असें भासविण्याला त्यांनीं सुरुवात केली. घडलेल्या प्रकारांत जणुं पुण्याचे सर्व नागरिक सामील आहेत असें समजून, सरकारनें पुण्यावर जादा पोलीस बसविले. जादा पोलीसच्या वार्षिक खर्चासाठीं भलीमोठी रक्कम लागेल असें ठरवून सरकारनें पुणें नगरपालिकेजवळ पंचेचाळीस हजार रुपयांची तातडीची मागणी केली. लँब या नांवाचे गृहस्थ त्या वेळीं पुण्याचे कलेक्टर होते. दोघा साहेबांचा पुण्यांत खून होतो आणि पुण्यांतील लोक या कृत्याचे निषेधासाठीं स्वयस्फूर्तीनें सभा बोलावीत नाहींत, ही गोष्ट त्यांच्या मनाला फार बोचली. शेवटीं त्यांनींच पुण्यांतील प्रमुख लोकांची एक सभा बोलावली व त्या सभेंत त्यांनीं आपल्या मनांतली सारी मळमळ ओकून टाकली.

अशा रीतीनें भोंवतालचें वातावरण तापत चाललें होतें तरी, टिळक मराठ्यांनीं थांबले नाहींत. "सरकारचें डोकें ठिकाणावर आहे काय?" "राज्य करणें म्हणजे सूड उगविणें नव्हे" हीं टिळकांनीं या प्रसंगीं लिहिलेल्या त्वरेनें

लेखांचीं शीर्षकेंच अत्यंत धाडसी आहेत. पुण्यांत हा अकल्पित प्रकार घडल्याबरोबर इंग्लंडमध्येंहि त्याची चर्चा सुरू झाली. पुण्यांतील अनिष्ट प्रवृत्तींचें उच्चाटण व्हावें म्हणून सरकारनें कठोर उपायांचा अवलंब करावा अशा सूचना इंग्लंडमधील वृत्तपत्रें करूं लागलीं. क्रॉफर्डसाहेबासारखे शेपूट तुटलेले कोल्हे पुन्हा महत्त्व पावूं लागले व पुण्याच्या ब्राह्मणांचा उद्धार करण्याची आपली हौस ते भागवून घेऊं लागले. वेल्बी कमिशनपुढें साक्ष देण्यासाठीं प्रो. गोखले यापूर्वींच इंग्लंडांत गेले होते. भोंवतीं सुरू झालेला हा एकतर्फी प्रचार त्यांना सहन होईना. मँचेस्टर गार्डियन पत्राच्या बातमीदारानें घेतलेल्या मुलाखतीच्या वेळीं त्यांनीं आपले विचार स्पष्टपणें बोलून दाखविले. प्लेगच्या धामधुमींत पुण्यांत अनन्वित जुलूम झाला म्हणूनच हे खून झाले असावे असें तर त्यांनीं सांगितलेंच! सोजिरलोक व प्लेगचे अधिकारी बायकांना रस्त्यावर आणून तपासीत, एक दोन बायकांवर जुलूम होऊन एकीनें जीवहि दिला, असेंहि गोखले बोलून गेले. ही मुलाखत प्रसिद्ध झाल्याबरोबर इंग्लंडांत एकच गोंधळ माजला आणि लंडन आणि हिंदुस्थान यांच्या दरम्यान जोराची तारातारी सुरू झाली. शेवटीं भारतमंत्र्यांनीं असें जाहीर केलें कीं, गोखले यांनीं केलेले सर्व आरोप खोटे आहेत.

दि. २७ जुलै रोजीं टिळक पुण्याहून मुंबईस गेले. आपल्यावर खटला भरण्याचा विचार सरकार करीत आहे हें त्यांना कळलें असल्यामुळें, त्या बाबतींतली बातमी काढण्याच्या हेतूनें तर ते मुंबईस गेलेच होते. शिवाय, गोखल्यांच्या विरुद्ध भाजविण्यांत आलेलें काहूर गोखल्यांना फारसें बाधक ठरूं नये यासाठीं कांहीं खटपट करावी हाहि त्यांचा हेतु होता. टिळक मुंबईस पोंचले आणि त्याच दिवशीं त्यांच्यावर खटला भरण्याची सरकारी सिद्धता पूर्ण झाली. रात्रीं १०-११ चे सुमारास टिळक दाजीसाहेब खरे यांच्या घरीं बोलत बसले होते तोंच, एक युरोपियन पोलीसअधिकारी वॉरंट घेऊन त्यांच्यापुढें उभा राहिला. टिळकांनीं तत्काळ आपला बिछाना बांधला. जामिनावर मोकळीक होते कीं काय हें खरे यांनीं पहावें असें सुचवून, टिळक बाहेर पडले! खरे यांनीं शक्य ती खटपट केली; पण, तिचा उपयोग झाला नाहीं. पोलीस कमिशनरच्या कचेरींत माडीवरील एका बंदिस्त खोलींत टिळकांना नेऊन ठेवण्यांत आलें. जामिनाची चौकशी करून निराश झालेले खरे पोलीस

कमिशनरच्या कचेरींत आले तों मध्यरात्रीचा सुमार झाला होता. स्वस्थ झोपी गेलेल्या टिळकांना हाका मारून व जागे करून खरे यांनी त्यांना सर्व हकीकत सांगितली व ते घरीं निघून गेले.

सरकारचा मुख्य राग टिळकांवर असला तरी, केसरीशीं संबंध असलेले गृहस्थ म्हणून केशवराव बाळ व हरी नारायण गोखले यांच्यावरहि वॉरंटें काढण्यास सरकार चुकलें नव्हतें. गोखले हे त्या वेळीं कोकणांत असल्यामुळे त्यांच्याविरुद्ध काढण्यांत आलेलें वॉरंट पुष्कळ दिवसपर्यंत लोंबकळतच राहिलें. बाळ यांचेवर दुसऱ्या दिवशीं वॉरंट बजाविण्यांत आलें. केसरीशीं संबंध असलेल्या लोकांवरच सरकारचा राग होता, असें नव्हे; सरकारची वक्रदृष्टि टिळकांशीं संबंध असलेल्या बड्या लोकांकडेहि वळली होती. दि. २८ जुलै रोजीं टिळकांचे स्नेही श्रीमंत बाळासाहेब व तात्यासाहेब नातू यांच्या घराला पोलिसांचा वेढा पडला. लोकांच्या स्मरणांतहि नसलेल्या एका जुनाट कायद्याच्या आधारें या उभयतांना कैद करण्यांत आलें. नातूंच्या बागेंत सांपडलेलीं कांहीं हत्यारें जप्त करण्यांत आलीं. या उभयतांना तत्काळ आगगाडींत बसविण्यांत आलें. श्रीमंत तात्यासाहेब नातू यांची ठाण्याच्या तुरुंगांत रवानगी झाली; आणि बाळासाहेबांना साबरमतीच्या तुरुंगांत पोंचविण्यांत आलें. श्रीमंत सरदार बाबामहाराज यांच्या घराभोंवतींहि गुप्त पोलिसांची चौकी बसविण्यांत आली.

त्याच दिवशीं मॅजिस्ट्रेट स्लेटर यांच्यापुढें टिळकांवरील खटल्याची प्राथमिक चौकशी सुरू झाली. टिळकांतर्फे करण्यांत आलेला जामीनअर्ज अमान्य झाला. दुसऱ्या दिवशीं या निकालाविरुद्ध हायकोर्टाकडे अर्ज करण्यांत आला. न्या. मू. पार्सन्स व रानडे यांच्यापुढें या अर्जाचें काम चाललें. येथेंहि या वेळीं हा अर्ज नामंजूरच झाला. २१ जुलै व २ ऑगस्ट या दोन दिवशीं मिळून मॅजिस्ट्रेट कोर्टांतील चौकशीचें काम संपलें आणि टिळक व बाळ या उभयतांवरील खटला सेशनकमिट करण्यांत आला. दि. ४ ऑगस्ट रोजीं, टिळकांना जामिनावर मोकळें करण्यांत यावें या आशयाचा अर्ज हायकोर्टाकडे पुनः करण्यांत आला. न्या. मू. बद्रुद्दिन तय्यबजी यांच्यापुढें या अर्जाचें काम चाललें व बॅ. दिनशा दावर यांनी टिळकांची बाजू न्यायमूर्तीं-पुढें मांडली. पंचवीस हजारांचे दोन जामीन घेऊन व पन्नास हजारांचा स्वतः

टिळकांचा जातमुचलका घेऊन त्यांना खुलें करण्यांत यावें असा न्यायमूर्तींनीं निकाल दिला. श्री. अण्णासाहेब नेने व शेठ द्वारकादास धरमसी हे गृहस्थ टिळकांना जामीन राहिले व दि. ४ ऑगस्ट रोजीं रात्रीं टिळक कच्च्या कैदेंतून मोकळे झाले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं टिळक पुण्यास परत आले. खटला सेशन कोर्टांत सुरू होण्याला चांगला महिन्याचा अवकाश होता. या अवधींत करावयाच्या खटपटींकडे टिळक वळत आहेत तोंच त्यांना एका विचित्र व अकल्पित परिस्थितीला तोंड द्यावें लागलें. दि. ६ ऑगस्ट रोजीं श्रीमंत सरदार बाबामहाराज महामारीनें आजारी पडले. ही बातमी कळतांच टिळकांना त्यांच्या शुश्रूषेकडे वळावें लागलें. दुखण्याला उतार पडण्याचें चिन्ह दिसेना; तेव्हां टिळकांना अहोरात्र बाबामहाराजांजवळ बसून सर्व योजना धैर्यानें व दूरदर्शीपणानें आखणें भाग पडलें. डॉ. मोदी, डॉ. विश्राम रामजी व डॉ. मेकॉनकी अशा तीन नामांकित डॉक्टरांचें औषध त्यांनीं बाबामहाराजांना सुरू केलें. आपण आतां जगत नाहीं हें महाराजांच्या लक्षांत आल्यावर त्यांनीं मृत्युपत्राचा प्रश्न काढला. महाराजांच्या कुटुंबाची व मालमत्तेची परिस्थिति काय आहे हें टिळकांना चांगलें माहीत असल्यामुळें, या मृत्युपत्राचे बाबतींत त्यांनीं अत्यंत दक्षता घेतली. ट्रस्टी व एक्झिक्युटर म्हणून टिळकांनीं चार चांगल्या माणसांचीं नांवें सुचविलीं; पण, या नांवांत टिळकांचें नांव असलें पाहिजे असा आग्रह महाराजांनीं धरला व मृत्युशय्येवरील मित्राच्या इच्छेला मान देणें हें मित्रकर्तव्यच होय हें जाणणाऱ्या टिळकांनीं अखेरीस या आग्रहाला मान्यता दिली! दि. ८ ऑगस्ट रोजीं बाबामहाराज मरण पावल्यामुळें, टिळकांचा यानंतरचाहि कांहीं काळ स्नेहऋण फेडण्यांतच गेला.

दीडदोन महिने होत आले तरी रँड-आयर्स्ट प्रकरणांतील गुन्हेगार सांपडत नाहीं हें पाहून सरकारी अधिकारी अस्वस्थ झाले होते. गुन्हेगार शोधून काढण्याचे त्यांचे अनुभवसिद्ध उपाय तर चालूच होते; पण, ब्रुइनसाहेब मोठा बांका असल्यामुळें, त्यानें एका नव्याच उपायाची योजना करण्याचें ठरविलें. टिळक पुण्यांत येऊन बसले आहेत हें पाहून, ब्रुइनसाहेब वारंवार त्यांच्याकडे जाऊं लागला. टिळकांपाशीं अघळपघळ गप्पा मारण्याचा उपक्रम त्यानें सुरू केला. या पाताळयंत्री माणसाला एकदम दूर ढकलणें

कोणत्याच दृष्टीनें श्रेयस्कर नाहीं असें टिळकांनीं मनानें ठरविलें, आणि, तेंहि त्याच्याशीं धोरणीपणानेंच वागू लागले. प्रत्येकजण दुसऱ्याच्या तोंडून कांहीं तरी गुप्त गोष्ट बाहेर निघेल अशा अपेक्षेनें सालसेरणी करून वागत होता; आणि ही चलवाचलवी चाललेली आहे हेंहि प्रत्येकजण ओळखून होता. अखेरीस ब्रुइनसाहेब कंटाळला! मात्र झालेल्या खुनाशीं टिळकांचा प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष संबंध नसला पाहिजे हें त्याच्या चाणाक्ष मनाला नक्की कळून चुकलें!

खटला सेशन कोर्टांत मांडावयाचा म्हणजे पैशाची व्यवस्था करणें प्राप्त आहे हें टिळकांना व त्यांच्या मित्रांना दिसू लागलें. टिळकांची वैयक्तिक आर्थिक परिस्थिति या वेळीं अगदींच सामान्य होती. केसरी संस्थेवरील कर्ज हळूहळू फिटत चाललें होतें हें खरें, पण, अद्याप संस्था निष्कर्जी झालेली नव्हती. लॉ क्लासमधून मिळणारा पैसा टिळकांना संसाराला सरासरी पुरा पडे अशा स्थितींत नामांकित बॅरिस्टर देऊन खटला लढवावयाचा तर पैशाची व्यवस्था स्वतंत्रपणें करणें प्राप्तच होतें. यामुळें 'डिफेन्स फंड' सुरू करण्यात आला. महाराष्ट्रांतील लोकांनी ज्याप्रमाणें या डिफेन्स फंडाला साहाय्य केलें त्याप्रमाणेंच टिळकांच्या बंगालमधील चाहत्यांनीहि या फंडाला साहाय्य केलें. अमृत बझार पत्रिकेचे संपादक बाबू मोतीलाल घोष हे तर टिळकांचे मित्रच होते. त्यांनीं या फंडाचा जोरानें पुरस्कार केला. या कामीं सुरेन्द्रनाथ बॅनर्जी यांनीहि पुढाकार घेतला. कलकत्त्याच्या प्यू व गार्थ या दोघा इंग्रज बॅरिस्टरांना टिळकांच्या वतीनें काम करण्यासाठीं 'धाडावयाचें' अशी योजना या बंगाली मंडळींनीं केली.

खटल्याच्या कामासाठीं सुरू करण्यात आलेला 'डिफेन्स फंड' पुढेंपुढें जोरानें जमू लागला. अखेरपर्यंत या फंडाची रक्कम ५१ हजार रुपये जमली. असें असलें तरी, प्रत्यक्ष सुरवातीस हा निधि कितीसा जमेल याविषयीं टिळकांना शंकाच वाटत होती. निदान, मुंबईस खटला सुरू झाल्यावर पैशाची नड भासू नये अशी व्यवस्था करून निघणें त्यांना अवश्य वाटलें. दोनतीन हजार रुपये तरी जवळ असणें अवश्य होतें आणि एवढी रक्कम एक-हातीं उसनीहि मिळण्याची या वेळीं सोय नव्हती. म्हणून शेवटीं वेगवेगळ्या लोकांकडून लहानलहान रकमांनीं पैसे उसने काढण्यात आले. या खटल्यांत आपल्याला बऱ्याच मुदतीची शिक्षा होईल असें पुण्याहून निघतांना तरी

टिळकांना वाटत होतें. म्हणून मृत्युपत्र करून ठेवण्याचा विचार त्यांच्या मनांत आला. ते व श्री. घोंडोपंत विद्वांस मृत्युपत्राचा मसुदा करावयास बसले. मृत्युपत्रांत सगळी कर्जाचीच व्यवस्था करावयाची आहे हा विचार मनांत येऊन, या उभयतांच्याहि डोळ्यांत अश्रु उभे राहिले!

टिळकांचा खटला हायकोर्टात सुरू झाला त्या सुमारास रँड-आयर्स्ट प्रकरणांतील गुन्हेगारांचा निश्चित तपास लावण्याच्या कामीं अधिकाऱ्यांना यश आलें होतें. बनावट कागद केल्याच्या आरोपावरून तुरुंगांत असलेल्या गणेशपंत द्रवीड नांवाच्या इसमानें–अनन्वित छळ झाल्यामुळें असो किंवा सरकारनें जाहीर केलेल्या बक्षिसाच्या लालचीनें असो– दामोदरपंत व बाळकृष्णपंत या चाफेकर बंधूंचीं नांवें गुन्हेगार म्हणून अधिकाऱ्यांना सांगितलीं. द्रवीड व चाफेकर बंधु हे नुसते शेजारीच नव्हते तर ते एका अड्डयांत व बैठकींत बसणारे होते. अधिकाऱ्यांना ही माहिती मिळताच त्यांनीं दामोदर हरी चाफेकर यांना अटक केली. बाळकृष्णपंत चाफेकर मात्र सरकारच्या हातीं लागले नाहीत. ते फरारी झाले व पुढें कित्येक दिवसपर्यंत त्यांचा पत्ताच नव्हता. खुनाच्या बाबतींतले गुन्हेगार सांपडल्यामुळें, टिळकांवरील सरकारचा संशय व राग एका परीनें कमी झाला असेल हें शक्य आहे. पण, बाळकृष्णपंत चाफेकर फरारी झाले यांत टिळकांचें कांहीं कारस्थान असावें, हा संशय सरकारच्या मनात घोळत राहिला नसेल, असें मात्र सांगवत नाहीं.

दि. ८ सप्टेंबर रोजीं खटला सुरू होणार हें जाहीर झालेलें असल्यामुळें आणि मुंबईच्या लोकांना खटल्याची माहिती कळण्याची जिज्ञासा विशेष असल्यामुळें, खटला चालू असेपर्यंत केसरीची स्वतंत्र दैनिक आवृत्ति मुंबईत काढण्याचें ठरविण्यांत आलें. टिळकांचे सहकारी केळकर व खाडिलकर आणि मुंबईचे एक टिळक-भक्त मुकुंद बाळकृष्ण गुर्जर या तिघांकडे या आवृत्तीचें काम सोंपविण्यांत आलें. खटल्याचा निकाल काय होणार हें ज्यूरीच्या स्वरूपावरच मुख्यतः अवलंबून असलें तरी, न्यायाधीश कोण मिळतो या मुद्दयालाहि महत्त्व होतेंच. न्यायमूर्ति स्ट्राची हे न्यायासनावर आरूढ झाले आणि ज्यूरींतल्या नऊ सद्गृहस्थांत पांच इंग्रज, एक ज्यू, एक पारशी व दोन दक्षिणी अशा गृहस्थांची निवड झाली तेव्हांच खटल्याचा निर्णय काय होणार हें टिळकांनीं मनाशीं ओळखलें! ८ सप्टेंबरला सुरू झालेला हा खटला दि. १४

रोजीं सपला. खटल्याचें काम पहाणाऱ्या लोकांना एका गोष्टीची मोठी मौज वाटे. 'भवानी तरवार' या मराठी टोपणनांवानें लिहिलेली मराठी कविता आक्षेपार्ह ठरून हा राजद्रोहाचा खटला भरण्यांत आलेला असल्यामुळें, न्यायमूर्ति व ज्यूरींतील सद्‌गृहस्थ यांना मराठी भाषा अवगत असणें अवश्य होतें. पण या ठिकाणीं गमत झाली ती अशी कीं, ज्यूरींतले बहुतेक सद्‌गृहस्थ, न्यायमूर्ति आणि दोन्ही पक्षाचे कायदेपंडित यांना मराठी भाषेचें ज्ञान काडीमात्र नव्हतें. खटल्याला सुरवात झाली तेव्हां केशवराव भाऊ यांच्याप्रमाणेच टिळकदेखील आरोपीच्या पिंजऱ्यांत होते. पण, त्यांच्यातर्फे काम पहाणारे बॅ. ब्यु यांना शब्दार्थांची अडचण पदोपदीं भासू लागल्यामुळें, पहिल्याच दिवशीं टिळकांना पिंजऱ्याबाहेर पडण्याची सवड मिळाली. बॅ. ब्यू यांच्यामागें खुर्चीवर बसून टिळक त्यांना मराठी शब्दांच्या अर्थाबाबत प्रॉम्प्टिंग करीत होते. शेवटीं एक प्रसंग तर असा आला कीं, स्वतः न्यायमूर्तींनाच टिळकांना जवळ बोलवावें लागलें व कित्येक शब्दांच्या अर्थाचें ज्ञान करून घ्यावें लागलें ! हा खटला चालू असतांना शब्दांच्या अर्थाची व व्याकरणाच्या प्रयोगांची फार घासाघीस सुरू झाल्यामुळें, डॉ. भांडारकर यांना सरकार साक्षीदार म्हणून बोलावणार आहे अशीहि अफवा उठली होती. पण ती शेवटीं खोटी ठरली.

टिळकांना अटक होणार या कल्पनेनें टिळकांचे कलकत्त्याचे स्नेही बाबू मोतीलाल घोष यांचें मन अस्वस्थ झालें होतें. त्यांनीं महाराष्ट्रांतल्या राजकीय पक्षभेदांबाबतचें एक पत्र न्या. मू. रानडे यांना पाठविलें होतें आणि हे पक्षभेद मिटविण्याच्या कामीं न्यायमूर्तींनीं पुढाकार घ्यावा असें सुचविलें होतें.* पुढें बाबूमहाशयांनीं टिळकांना एक पत्र धाडलें. गोखले यांनीं पुण्याच्या प्लेगव्यवस्थेबाबत विलायतेंत विधानें केलीं; पण, पुढें तीं विधानें निराधार आहेत हें ल्क्षांत आल्यावर त्यांनीं जाहीर दिलगिरीहि व्यक्त केली. टिळकांनींहि सरकारची माफी मागणें जास्त श्रेयस्कर आहे असें मोतीबाबूंनीं आपल्या पत्रांत सुचविलें होतें. या पत्राला टिळकांनीं जें उत्तर धाडिलें त्यांतील कित्येक वाक्यें अत्यंत मोलवान् आहेत. माझा समाजांतील दर्जा केवळ शीलावरच अवलंबून असल्यामुळें, अशा खटल्यांनीं भेदरून जाणें

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. २६६.

**मला क्षमीपणाचें आहे आणि मी भेदरून गेलों तर पुढें महाराष्ट्रांत रहाणें आणि अंदमानांत रहाणें सारखेंच ठरणार आहे,** असें लिहिल्यावर टिळक सामान्य सिद्धांत म्हणून पुढे म्हणतात: **आपल्याला जर सदैव राजकारणांतच रहावयाचें आहे तर अशा संकटांना आपण नेहमीं तयार राहिलेंच पाहिजे.**

खटल्याचा निकाल लागण्याच्या आदल्या दिवशीं टिळकांच्या परिवारांतले पुष्कळसे लोक पुण्याहून मुंबईस गेले होते. या मंडळींशीं बोलतांबोलतां टिळकांच्या एक गोष्ट ध्यानांत आली. येणारी सर्व मंडळी आली; पण, भिकाजीपंत हर्डीकर तेवढे आले नाहींत हें लक्षांत येतांच, ते कां येऊं शकले नसतील हें टिळकांनीं मनानें ठरविलें. स्वार्थनिरपेक्ष बुद्धीनें लोकसेवा करणाऱ्या भिकाजीपंतांची स्थिति, श्रीकृष्णसखा सुदामदेव यांच्यासारखी होती. भाड्यापुरते पैसेहि जवळ नसल्यामुळें, मनांत असूनहि भिकाजीपंत येऊं शकले नाहींत असें टिळकांनीं मनाशीं ठरविलें. त्यांनीं जवळच्या एका माणसाला हांक मारली, पुण्यास तार करण्याची सूचना दिली आणि केसरी-कार्यालयाच्या खर्चानें भिकाजीपंतांनीं मुंबईस यावें असें सुचविलें.

दि. १४ रोजीं न्या. मू. स्ट्राची यांनीं घरून लिहून आणलेला खटल्याचा समारोप ज्यूरीला वाचून दाखविला. प्रीतीचा अभाव म्हणजेच द्वेष अगर द्रोह हें कुप्रसिद्ध वाक्य या समारोपाच्या लेखी भाषणांत स्ट्राचीसाहेबांनीं लिहिलें होतें. ज्यूरीला खटला समजून सांगण्याचा विधि अशा रीतीनें उरकल्यावर ज्यूरींतले सद्गृहस्थ आपला निर्णय ठरविण्यासाठीं बाजूला जाऊन बसले. सुमारें पाऊण तासानें ते आपल्या निर्णयासकट बाहेर आले. केशवराव बाळ यांना ज्यूरीनें एकमतानें निर्दोषी ठरविलें. टिळकांच्या बाबतींत मात्र ज्यूरींचें एकमत झालें नाहीं. सहा सद्गृहस्थांच्या मतें टिळक दोषी ठरले व तिघांनीं त्यांना निर्दोषी ठरविलें. हा निकाल मान्य करून स्ट्राचीसाहेबांनीं टिळकांना १८ महिने सक्तमजुरीची शिक्षा सांगितली.

खटल्याचा निकाल या दिवशीं लागणार ही गोष्ट मुंबईतील लोकांना कळलेली असल्यामुळें आणि निकाल काय लागणार याचीहि अटकळ लोकांनीं घरोघर बांधलेली असल्यामुळें, संध्याकाळीं ४-५ वाजण्याचे सुमारास हायकोर्टाच्या

इमारतीजवळ लोकांचा फार मोठा जमाव जमला होता. टिळकांना तुरुंगाकडे घेऊन जातील तेव्हातरी आपल्याला त्यांचे दर्शन घडेल अशी या लोकांची समजूत होती. कोर्टातून कैद्यांना तुरुंगांत नेण्याची गाडी हायकोर्टाच्या पुढल्या मुख्य दरवाजाजवळ तयार ठेवण्यांत आलेली असल्यामुळें, लोकांची आशा पल्लवित होती.* हा लोकसमूह जवळजवळ दिवेलागणीच्या वेळेपर्यंत टिळकांच्या दर्शनासाठी बाहेर ताटकळत उभा होता. हायकोर्ट बंद झालें, वरून सर्व लोक खालीं आले, तेव्हां या बिचाऱ्या लोकांना असें कळलें कीं, हायकोर्टाच्या मागच्या बाजूला गल्लीमध्यें निघणारा एक मार्ग आहे आणि त्या मार्गानें टिळकांची रवानगी डोंगरी तुरुंगाकडे केव्हांच करण्यांत आलेली आहे !

टिळकांना शिक्षा झाल्यामुळे केसरी-मराठा पत्राच्या प्रकाशनाची व्यवस्था पुढें काय करावयाची हा प्रश्न उपस्थित झाला. आर्यभूषण छापखान्याचे व्यवस्थापक श्री. गोखले यांनी टिळकांना अटक झाल्यापासूनच पत्रांच्या प्रकाशनाची जबाबदारी अंगाबाहेर टाकण्याला सुरवात केली होती. टिळकांना शिक्षा झाल्याबरोबर त्यांनी ही जबाबदारी साफ झुगारून दिली. टिळक सुटून येईपर्यंत पत्रें बंदच ठेवा, असा पोक्तपणाचा सल्ला त्यांनी श्री. विद्वांस यांना दिला. पत्रें छापून देण्याची जबाबदारी पत्करणारा दुसरा कोणी छापखानेवाला भेटतो की काय, हें पाहण्याच्या उद्योगास श्री. विद्वांस लागले, कारण, पत्राच्या प्रकाशनाला अडचण फार ती तेवढीच होती ! संपादकीय काम जबाबदारीनें पुढें चालविण्याला केळकर-खाडिलकर ही जोडी सिद्धच होती. शेवटीं श्रीविठ्ठल छापखान्याचे मालक श्री. भिडे यांनीं ही जबाबदारी स्वीकारली. आर्यभूषण छापखान्यानें छापीच जबाबदारी अंगाबाहेर टाकल्यामुळें, पत्रांच्या व्यवस्थेची कचेरीहि नव्यानें थाटण्याचा प्रसंग विद्वांस यांच्यावर आला. टिळकांच्या राहत्या घराचे पडवींत दोन देवदारी खोके मांडून, विद्वांस यांनीं 'केसरी-मराठा' ऑफिस थाटलें. दि. १४ रोजी टिळकांची तुरुंगांत रवानगी झाल्यामुळें, त्यानंतरचे तरी पत्राचे अंक खंडित होतील अशी शुभेच्छा पुष्कळजण करीत होते ! पण, दि. २० रोजीं—म्हणजे एक दिवस उशिरा—'मराठा' प्रसिद्ध झाला आणि 'केसरी' तर दि. २१ रोजीं नेहमीप्रमाणें प्रसिद्ध झाला !

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. १६७.

हा चमत्कार घडल्यामुळें ज्यांच्या शुभेच्छा विफल झाल्या त्यांच्यापैकीं कोणी तरी, विस्मित होऊन, मुंबईच्या 'टाइम्स'ला तार केली. टिळकांचीं दोन्ही पत्रें पुन्हा सुरू झालीं; केळकर नांवाच्या एका एल्एल्. बी. गृहस्थानें पत्रांचें 'डिक्लेरेशन' केलें आहे, असा या तारेचा इत्यर्थ होता.

टिळकांना झालेली शिक्षा अन्याय्य आहे हें उघड दिसत असल्यामुळें या निकालाविरुद्ध प्रिव्ही कौन्सिलकडे अपील करण्याचा निश्चय टिळकांच्या मित्रमंडळींनीं केला. हें अपील करण्यापूर्वी, अपिलाला मुंबई हायकोर्टाची परवानगी मागणें अवश्य होतें. परवानगी मागण्याबाबतचा अर्ज १७-९-१८९७ रोजीं हायकोर्टांत दाखल झाला आणि २४-९ रोजीं मुंबई हायकोर्टच्या तीन न्यायाधिशांनीं अर्जाचा निकाल केला. हा निकाल अर्थातच टिळकांना प्रतिकूल होता. या अर्जाची वासलात अशा प्रकारें लागली तरी, प्रिव्ही कौन्सिलकडे स्पेशल अपील गुदरण्याचा मार्ग मोकळा होता. या मार्गानें जाऊन कांहीं फलनिष्पत्ति झाली तर पहावी यासाठीं दाजीसाहेब खरे हे दि. २-१०-१८९७ च्या टपालाच्या बोटीनें विलायतेस रवाना झाले. दि. १६-१० रोजीं सॉलिसिटर कांगा हे खरे यांना मदत करण्यासाठीं विलायतेस रवाना झाले. दि. १९-११-९७ रोजीं हें स्पेशल अपील चाललें. सरकारदरबारीं बरेंच वजन असलेले मि. ॲस्क्विथ हे टिळकांच्या बाजूचे बॅरिस्टर म्हणून देण्यांत आलेले असल्यामुळें, या अपिलाचा कांहीं उपयोग होईल अशी कित्येकांना आशा वाटत होती; पण, येथेंहि मुंबई हायकोर्टाचा निर्णयच वज्रलेप ठरला.

टिळकांनीं यापूर्वींच आपल्या नामदारीचा राजिनामा दिलेला असल्यामुळें आणि पुणें म्युनिसिपॅलिटीच्या सभासदत्वाचेंहि त्यागपत्र देऊन टिळक मोकळे झालेले असल्यामुळें, सरकारला त्या बाबतींत कांहींच करतां आलें नाहीं; पण, टिळकांनीं मुंबई विद्यापीठाच्या सीनेटच्या सदस्यत्वाचें त्यागपत्र धाडलें नव्हतें. या सदस्यत्वाकडे आपली काकदृष्टि वळवून सरकारनें तें रद्द करून टाकलें! तुरुंगांत टिळकांचे मनस्वी हाल होऊं लागले. त्यांना नुसती कोरडी भाकर खावी लागे. कांद्याचा जन्मतःच कंटाळा असल्यामुळें, तुरुंगांत मिळणारें कालवण त्यांना मुळींच चालत नसे. दूधतूप मिळण्याची तर शक्यताच नव्हती. दिवसेंदिवस अशी उपासमार होऊं लागल्यामुळें, टिळकांचें वजन भराभर घटूं लागलें. त्यांचें मूळचें १३५ पौंड वजन १०५ पौंडांवर आलें. तुरुंगांतील

खोल्यांची व कपड्याची अस्वच्छताहि टिळकांच्या प्रकृतीला अपाय करूं लागली. दोन्या वळण्यासाठीं काथ्या साफ करण्याचें काम टिळकांना देण्यांत आलें होतें.

टिळकांच्या प्रकृतीविषयींची वार्ता भिन्नभिन्न मार्गांनीं बाहेर पसरूं लागली व त्यामुळें लोक चिंतातुर होऊं लागले. सरकारकडे अर्जविनवण्या करून कांहीं उपयोग होईल अशी आशा कोणालाच वाटेना; पण, टिळकांच्या खटल्याच्या वेळीं त्यांना मनोभावें मदत करणारे मुंबईचे वकील श्री. सेटलूर यांनीं एका वेगळ्याच दिशेनें प्रयत्न करून पहाण्याचें ठरविलें. कैद्यांचें जीवन सुसह्य व्हावें– विशेषतः अल्पवयी कैद्यांच्या शिक्षणाची व आरोग्याची व्यवस्था योग्य प्रकारें करण्यांत यावी– यासाठीं चळवळ करणारी हॉवर्ड असोसिएशन नावाची एक संस्था इंग्लंडात होती. सेटलूर यांनीं १८९७ च्या नोव्हेंबर महिन्यापासूनच या संस्थेच्या प्रमुखांकडे टिळकांच्या प्रकृतीविषयीं माहिती धाडण्याला सुरवात केली. या संस्थेच्या सेक्रेटरींनीं याविषयींची माहिती भारतमंत्र्याकडे पाठविली. यामुळें, बाहतः नाहीं तरी अंतस्थ रीतीनें, सरकारी अधिकाऱ्यांनीं टिळकांच्या प्रकृतीकडे लक्ष द्यावें असा नेट धरून लागू लागला.

या वर्षींची इंडियन नॅशनल कॉंग्रेस उमरावती येथें भरली. नातूबंधूंना सरकारनें चौकशीशिवाय तुरुंगात डांबून ठेविलें असल्यामुळें, त्यांच्याविषयींचा स्वतंत्र ठराव करण्याची तयारी कॉंग्रेसच्या सूत्रचालकांनीं दाखविली. पण, स्वतंत्र ठरावानें टिळकांचा गौरव करण्याचें धैर्य त्यांना होईना. असें असलें तरी, या कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. शंकरन् नायर यांनीं आपल्या भाषणांत टिळकांचा उल्लेख केलाच. टिळकांना हिंदी लोकांची ज्यूरी मिळाली नाहीं या मुद्द्यावर त्यांनीं भर दिला व टिळकांना राजकीय कैदी म्हणून वागवायला पाहिजे होतें असेंहि त्यांनीं सुचविलें. नातूबंधूंच्या ठरावावर बोलतांना सुरेंद्रनाथ बॅनर्जींनीं टिळकांचा चांगला ठसठशीत उल्लेख केला. हा उल्लेख झाल्याबरोबर असलेले लोक उभे राहिले. टिळकांच्या नावाच्या त्यांनीं कित्येक मिनिटेंपर्यंत जयघोष केला व टाळ्यांचा प्रचंड गजर झाल्यामुळें, सुरेंद्रबाबूंचा पहाडी भाषाहि कांहीं वेळ लोपून गेला.

पहिले कांहीं दिवस डोंगरीच्या तुरुंगात गेल्यावर, टिळकांना भायखळ्याच्या तुरुंगांत नेण्यांत आलें. ठाण्याच्या तुरुंगांत स्थानबद्ध करून ठेवलेले नातूबंधूपैकी बाळासाहेब नातू यांनाहि या सुमारास भायखळ्यास धाडण्यांत आलें होतें. नातू हे स्थानबद्ध

असल्यामुळें त्यांच्यावर तुरुंगांतील अन्न खाण्याची सक्ती नव्हती. स्वतःचें अन्न बाहेरून मागविण्याचें स्वातंत्र्य त्यांना उपभोगितां येत होतें. टिळकांच्या प्रकृतीची बातमी तुरुंगांतल्या बिनतारी तारायंत्रानें तात्यासाहेबांना कळली. स्वतःसाठीं येणाऱ्या पदार्थांतले कांहीं पदार्थ तात्यासाहेब हस्तेंपरहस्तें टिळकांकडे धाडूं लागले. या व्यवस्थेमुळें टिळकांची खालावलेली प्रकृति मोठीशी सुधारली असेल, असें नाहीं; पण, मित्रप्रेम आणि लोकांच्या मनांतील भक्ति यांचा अनुभव तुरुंगांतल्या कडेकोट बंदोबस्तांतहि आल्यामुळें, टिळकांच्या मनाला थोडीफार हुषारी वाटली असेल, हें मात्र शक्य आहे. टिळकांच्या प्रकृतीचा बोभाटा बराच झाल्यामुळें, सरकारी अधिकाऱ्यांनाहि त्यांच्या बाबतींत कांहीं करावें असें वाटूं लागलें. १८९८ च्या फेब्रुवारी महिन्यांत तर टिळक मुक्त होणार अशी बातमी पुण्यांत लोकांच्या तोंडीं झाली होती. या वेळीं टिळक सुटले नाहींत; पण, मुंबईस प्लेग झाल्याचें निमित्त काढून, सरकारनें टिळकांना येरवड्याच्या तुरुंगांत रवाना केलें. पुण्याच्या हवेचा टिळकांच्या प्रकृतीवर इष्ट परिणाम होईल अशा हेतूनें सरकारनें ही तुरुंग-बदली केली असावी.

येरवड्याचे तुरुंगांत टिळकांना पूर्वीपेक्षां पुष्कळच बरी वागणूक मिळूं लागली. मुंबईस असतांनाच, शेवटीशेवटीं त्यांना कांहीं दूध व तूप मिळूं लागलें होतें तें येथेंहि चालू राहिलें. त्यांना देण्यांत आलेल्या कामाचें स्वरूपहि बदललें. गालिच्यांसाठीं लोंकर व सूत रंगविण्याचें काम त्यांना देण्यांत आलें. हेंहि काम अभ्यासूपणानें करावें म्हणून टिळकांनीं यासंबंधींचीं कांहीं पुस्तकें मागविलीं आणि रंग देण्याच्या निरनिराळ्या रीती त्यांनीं कागदावर लिहून काढल्या. टिळक येरवडा तुरुंगांत आल्यावर थोड्याच दिवसांनीं, त्यांची व दामोदरपंत चापेकर यांची भेट झाली. या पूर्वी फेब्रुवारी महिन्यांतच, दामोदरपंतांच्या खटल्याचा निकाल झाला होता व त्यांना फांशीची शिक्षा सांगण्यांत आली होती. टिळकाकडून अर्ज लिहून घेण्याची इच्छा दामोदरपंतांनीं व्यक्त केल्यामुळें, सरकारला ती मान्य करावी लागली. टिळक व चापेकर हे जवळजवळ तीन तासपर्यंत एकत्र होते. पण, या भेटीच्या वेळीं एक अधिकारी जवळ बसलेला होता व त्याच्यासमोरच त्यांचें सर्व बोलणें झालें. या अर्जाचा उपयोग झाला नाहींच व शेवटीं दि. १८-४-१८९८ रोजीं चापेकरांना येरवडा तुरुंगांत फांसावर चढविण्यांत आलें.

यापूर्वी कांहीं दिवस त्यांनी टिळकांची पुन्हां भेट घेतली होती. या भेटींत चापेकरांनीं टिळकांना दोन गोष्टींविषयीं विनंति केली. तुमच्याजवळचें गीतेचें पुस्तक मला द्या व अखेरपर्यंत तें मजजवळ राहूं द्या ही चापेकरांची पहिली विनंति होती. माझ्या प्रेताला मलत्या लोकांनीं शिवून अग्नि देऊं नये अशी माझी इच्छा आहे व ती तुम्हीं पुरवावी, अशी गळ चापेकरांनीं टिळकांना घातली. चापेकरांच्या या दोन्ही मागण्या टिळकांनीं मान्य केल्या. चापेकर फांशी गेले त्या वेळीं स्वतः टिळक येरवड्याच्या कारागृहांतच होते; तरीहि चापेकरांचें और्ध्वदेहिक त्यांच्या इच्छेप्रमाणें व्हावें, अशी व्यवस्था करण्याला ते चुकले नाहीत.

येरवडा कारागृहांतील इतर कैदी टिळकांशीं वागतांना अत्यंत अदबीनें वागत आणि या कामीं तुरुंगाच्या अधिकाऱ्यांनीं त्यांना दूषण दिलें, तरी ते तिकडे दुर्लक्ष करीत. सरकारी नोकरींत असलेले तुरुंगांतील कनिष्ठ शिपाईदेखील टिळकांच्या-बद्दल कमालीचा आदर मनांत बाळगीत असत. स्वतःच्या नोकरीला धोका बसेल ही जाणीव असूनहि, असे लोक टिळकांच्या उपयोगी पडण्यासाठीं झटत असत. लोहगड किल्ल्याच्या पायथ्याशीं असलेल्या गांवचा एक मुसलमान या सुमारास येरवडा तुरुंगांत पहारेकरी पोलीस म्हणून नोकरीवर होता. टिळकांचे खाण्यापिण्याचे हाल होतात असें त्या गरीब माणसाच्या लक्षांत आलें. खोबऱ्याचे तुकडे व गूळ कागदाच्या पुडींत घालून ती पुडी शिताफीनें टिळकांना पोंचती करण्याचें काम त्यानें सुरू केलें. टिळकांनीं या मार्गापासून त्याला परावृत्त करण्याचा प्रयत्न केला; पण, तो त्यांचें ऐकेना. हें खाऊन उष्णानें माझें तोंड आलें असें टिळकांनीं सांगून पाहिलें; तेव्हां या शिपायानें बदाम-पी व खडीसाखर यांची पुडी पोंचती करण्याचा क्रम सुरू केला. टिळकांच्या सुटकेनंतर हा इसम टिळकांना भेटला तेव्हां टिळकांनीं या उपकाराची फेड म्हणून त्याला वीस रुपये व एक रेशीमकांठी धोतर दिलें. या इसमानें नोकरी सोडण्याची भाषा काढली तेव्हां टिळकांनीं त्याला जो उपदेश केला तो एखाद्या भविष्यवाद्याला शोभेल असा आहे. टिळक म्हणाले* : आतां यापुढें तुमच्यासारखीं माणसें तेथें पुष्कळ येणार ! आम्ही हा पायंडा पाडून

* आठवणी व आख्यायिका : खंड १ : पृ २१२-१३ .

**ठेविला आहे...अशा माणसांस तुझ्याकडून जो उपयोग होईल तो दुसऱ्या भलत्यासलत्याकडून होईल काय?...म्हणून नोकरी सोडण्याची गोष्ट बोलूं नकोस! मात्र मला जसा उपयोगी पडलास तसा सर्वांना नेहमीं उपयोगी पडत जा, म्हणजे झालें!**

वेद-वाङ्मय व भारतीय तत्त्वज्ञान यांचा भोक्ता म्हणून युरोपियन पंडित मॅक्समुल्लर हा फार प्रसिद्ध होता. टिळकांनीं लिहिलेला 'ओरायन' हा ग्रंथ त्याच्या वाचनांत आल्यामुळें, टिळकांच्या पांडित्याबद्दल त्याला आदर वाटत असे. सक्तमजुरीची शिक्षा होऊन टिळक तुरुंगांत खितपत पडले आहेत व त्यांची प्रकृति बरीच खालावली आहे ही वार्ता त्याला समजली, त्यामुळें त्याला फार वाईट वाटलें. १८९८ च्या फेब्रुवारी महिन्यांत इंग्लंडमधील कित्येक प्रमुख व्यक्तींनीं टिळकांना तुरुंगांत मिळत असलेल्या वागणुकीसंबंधींचा एक अर्ज तयार केला. या अर्जावर मॅक्समुल्लर यांनीं स्वाक्षरी केली होती. तुरुंगांत वाचण्यासाठीं टिळकांना ऋग्वेद पाहिजे आहे अशी माहिती मॅक्समुल्लर-महाशयांना कळल्यामुळें, त्यांनीं स्वतः प्रकाशित केलेल्या ऋग्वेदाची एक प्रत टिळकांसाठीं पाठवून दिली. हा ग्रंथ टिळकांना पोंचल्यावर टिळकांनीं मॅक्समुल्लर-साहेबांना आभारप्रदर्शक पत्र लिहिलें. त्यांतील पुढील वाक्यें महत्त्वाचीं आहेत :

' माझ्या सुटकेच्या अर्जावर आपण सही केली असल्याचेंहि मला समजलें.' अर्जाचा निकाल कांहींहि होवो; पण, आपण मात्र मजवर इतके उपकार करून ठेविले कीं, आपले कोणत्या शब्दांनीं आभार मानावे हें कळत नाहीं. मनुष्यमात्रावर संकटें हीं येतच असतात. मजवरचें हें संकट लवकरच निघून जाईल. पण, आपण केलेल्या मदतीची आठवण मला कायमची राहील. घरींसुद्धां मला रिकामा वेळ मिळतो तो ऋग्वेद, ब्रह्मसूत्रें व भगवद्‌गीता हीं वाचण्यांत मी घालवीत असतों. तसाच येथेंहि वाचण्यास आपण पाठविलेला ऋग्वेद ग्रंथाहि उपयोगी पडेल.' यलीकडे 'ओरायन'च्या पूर्वीचे कालांतील वस्तुस्थितीविषयींचे माझे विचार मी निश्चित करीत होतों व हल्लींच्या या स्थितींतून बाहेर पडल्यावर तें काम पुरें करण्याचा माझा विचार आहे.

ऋग्वेदाचीं पुस्तकें टिळकांना मिळालीं त्या सुमारासच त्यांना रात्रीं

वाचण्यासाठी तीन तास दिवा ठेवण्याचीहि परवानगी मिळाली. या वाचनाचा टिळकांच्या विचारांवर काय परिणाम झाला हे सुटकेनंतर एकदम प्रसिद्ध झालेल्या टिळकांच्या एका मुलाखतीत स्पष्ट झालेले आहे. या मुलाखतीत टिळक म्हणतात :

मी बहुतेक ऋग्वेदाचाच अभ्यास केला. त्यास टीकांची मदत होती. त्यावरून मी असा तर्क बांधला आहे की, आर्य लोकांचे पूर्वज ज्या ठिकाणी सहा महिन्यांची रात्र होती अशा ठिकाणी म्हणजे उत्तर ध्रुवाजवळच्या मुलखांत होते. परंतु पुढे हळूहळू ते दक्षिणेकडे येऊं लागले. माझ्या म्हणण्यास भूशास्त्रवेत्त्यांच्या शोधाचें पाठबळ आहे. तथापि, तुरुंगांत मला पुरेशी पुस्तकें मिळाली नाहीत; ती अद्याप पहावयाची आहेत. ती पाहिल्यावर कदाचित् माझे मत फिरण्याचाहि संभव आहे. परंतु सध्यां माझ्या मनाची त्याविषयी खात्री झाली आहे.

ऋग्वेदाचें वाचन करीत असतांनाच टिळकांनी एका वहीत त्यांना मिळालेल्या पेन्सिलीच्या तुकड्याने कांहीं टाचणें करून ठेविली. टिळकांनी यानंतर जो इंग्रजी ग्रंथ लिहिला त्याची पहिली तयारी अशा प्रकारें झाली.

विठ्ठल छापखान्यांत केसरी-मराठा पत्रे छापण्याची व्यवस्था झालेली असल्यामुळें, टिळक त्या बाबतीत बेफिकीर निर्धास्त होते, पण, १४-१-१८९८ रोजी दुपारी या छापखान्याच्या इमारतीस आग लागल्याची बातमी त्यांना दुसऱ्या दिवशीं तुरुंगांत वाचावयास सांपडली. त्यामुळें पत्रांची व्यवस्था काय झाली असेल हा प्रश्न त्यांच्यापुढें उभा राहिला. १८-१-१८९८ च्या केसरीचा अंक जवळजवळ तयार झाल्यानंतर ही आग लागल्यामुळें, हा अंक वेळेवर प्रकाशित करण्याचें काम फार अवघड झालें. 'जगद्धितेच्छु' छापखान्यानें 'केसरी' छापून देण्याची आयत्या वेळीं तयारी दाखविल्यामुळें, निम्मा अंक तरी वेळेवर छापून प्रसिद्ध करतां आला. तात्पुरती सोय म्हणून केसरी छापून देण्याचें काम या छापखान्याच्या व्यवस्थापकांनी पत्करिलें, पण, टिळक सुटून येईपर्यंतची जबाबदारी पत्करण्यास ते तयार होईनात. केसरी घोंडोपंत विद्वांस एप्रिल महिन्यांत टिळकांच्या भेटीस गेले तेव्हां पत्रांच्या छपाईबद्दलची नवी व्यवस्था त्यांनीच सुचविली. आर्यभूषण छापखान्याची मालकी जरी गोखले दांडेकरांकडे होती तरीच वासुदेवराव केळकर यांच्याकडेहि

होती. केळकर यांच्या पश्चात् त्यांच्या अज्ञान मुलाच्या वतीनें ही व्यवस्था नारायणराव फाटक नांवाचे गृहस्थ पहात असत. टिळकांनीं या गृहस्थांना पत्र दिलें. या पत्राचा उपयोग होऊन, १९-४-९८ पासून केसरी-मराठा पत्रें फिरून आर्यभूषण छापखान्यांत छापलीं जाऊं लागलीं.

मध्यंतरीं चव्हाट्यावर उलगडलेल्या चापेकर-प्रकरणामुळें, सरकारचा टिळकांवरील राग अंशतः ओसरला होता. खुद्द पार्लमेंटमध्येंहि 'टिळकांना अन्याय झाला' असें गाऱ्हाणें मधूनमधून ऐकूं येत राहिल्यामुळें, टिळकांच्या शिक्षेचा फेरविचार करावा असें सरकारला वाटूं लागलें. बाहेरच्या निवळलेल्या परिस्थितीचा फायदा मिळविण्यासाठीं आपणहि काहीं करावें असें टिळकांच्या मनांत आलें. म्हणून आपल्या मुक्ततेची मागणी करणारा अर्ज त्यांनीं सरकारकडे पाठविला. हा अर्ज गेल्यामुळें, मुंबई सरकारच्या खलबतखान्यांत टिळकांना कोणत्या अटींवर सोडावें या प्रश्नाची वाटाघाट सुरू झाली. पूर्ण मुदत भरण्याआधीं सरकारनें टिळकांना सोडलें तर, टिळकांनीं राजकारणांतून कायमचें निवृत्त होण्याला सम्मति दर्शवावी अशी एक अट सरकारतर्फे सुचविण्यांत आली होती. स्वतःच्या राजकीय अपमृत्यूच्या असल्या करारावर टिळक सही करतील, ही गोष्ट शक्यच नव्हती! सुटकेनंतर लोकांनीं सत्कार-समारंभ केले तर टिळकांनीं त्यांत भाग घेऊं नये अशीहि एक अट सुचविण्यांत आली होती. टिळकांनीं ही अट स्वीकारली.

मुक्ततेच्या अटींसंबंधींची वाटाघाट चालू असतांना, ह्यूइनसाहेब पुष्कळ वेळां येरवड्यास जात असत व टिळकांपाशीं अघळपघळ बोलत बसत असत. आपल्या गोड नि हिकमती बोलण्यानें, ह्यूइनसाहेब अनेकांच्या गळ्यांत अनेक गोष्टी बांधूं शकतात असा अनुभव सरकारला आलेला होता. ह्यूइनसाहेब टिळकांवरहि हा प्रयोग यशस्वीपणें करूं शकतील अशी सरकारची कल्पना होती. पण अनेक प्रसंगीं टिळकांशीं वाटाघाटी केल्यावरहि, ह्यूइनसाहेबांना त्यांच्या कामांत यश आलें नाहीं. यामुळें ते आपण होऊनच पुढें पुढें असें म्हणूं लागले कीं, टिळकांवर अशी अट लादणें गैर आहे. या वाटाघाटी करण्याच्या कामीं मुंबई सरकारनें दाजीसाहेब खरे यांनाहि विश्वासांत घेतलें होतें. टिळकांवर फिरून राजद्रोहाचा खटला झाला व गुन्हा शाबीत झाला तर, या वेळीं न भोगलेली शिक्षा टिळकांनीं तेव्हां पुरी भोगावी ही अट सरकारतर्फे

येवढी सुचविण्यांत आली. *टिळकांनीहि या अटीला संमति दिली.* दि. ६-९-९८ रोजीं सायंकाळीं गव्हर्नरसाहेब व त्यांचे सल्लागार यांच्या दरम्यान टिळकांच्या सुटकेविषयीं चर्चा चालली होती. अखेरीस रात्रीं आठ वाजतां वरील अटीवर टिळकांना मुक्त करण्याचा हुकूम देण्यांत आला. या वाटाघाटींसाठीं ब्रुइनसाहेबानें दाजीसाहेब खरे यांना मुद्दाम पुण्यास बोलावून घेतलें होतें. रात्रीच्या रात्रीं या हुकुमाची अम्मलबजावणी करण्याचें काम ब्रुइनसाहेबानें केलें. रात्रीं १०॥ वाजण्याचे सुमारास टिळकांना बरोबर घेऊन दाजीसाहेब खरे अनपेक्षित रीतीनें टिळकांच्या निवासस्थानीं जाऊन पोंचले।

---

## पर्व सातवें : : 'पुनश्च हरिः ॐ'

इकडे सरकारकडून छळ चालला आहे, द्रव्य, कीर्ति, मान्यता हीं सर्व सरकारनें बुडविण्याला काढलीं आहेत अशा वेळीं ( आर्क्टिक होम )" हा ग्रंथ लिहिला गेला. असल्या संकटकाळीं पवित्र धर्मग्रंथ किंवा हिममय प्रदेश यांचें चिंतन करणाऱ्या माणसाचें मनोधैर्य कितीसा लोकांत आढळेल ?

—नेव्हिन्सन

१८९८ च्या सप्टेंबर महिन्यांत टिळक सुटले त्या वेळीं त्यांची प्रकृति अत्यंत क्षीण झालेली असल्यामुळें, कांहीं दिवस तरी त्यांनीं निर्भेळ विश्रांति घेणें अवश्य होतें. या काळांतहि टिळकांचें मन पूर्णपणें निश्चिंत राहील अशी स्थिति नव्हती. कै. बाबामहाराज यांची पत्नी ताईमहाराज यांना मुलगा होऊन तो दोन महिन्यांच्या आतच मरून गेला होता. यामुळें, आज ना उद्यां ताईमहाराजांचे मांडीवर मुलगा दत्तक देण्याचा प्रश्न निघणार, हें टिळकांना दिसत होतें. महाराजांच्या इस्टेटीवर मनस्वी कर्ज झालेलें होतें. *टिळक सुटून*

येतांच अनेक सावकारांचे तगादे सुरू झाले. हे तगादे निवारण्यासाठी योजना आंखण्याचें काम टिळकांना विश्रांतीच्या काळांतहि करावें लागत होतें. टिळक स्वतः सुटले असले तरी नातूबंधू अद्यापि तुरुंगांतच होते. दामोदरपंत चापेकर फांशी गेले असले तरी, उरलेल्या दोघां चापेकरबंधूंवर सरकारचा रोष आहे, हें टिळक जाणून होते. सुटकेनंतरचे सुमारें दोन महिने टिळकांनीं सिंहगडावर घालविले आणि त्यानंतर थोड्याच दिवसांनीं ते मद्रासच्या कॉंग्रेसला गेले. १८९९ च्या फेब्रुवारी महिन्यांत टिळक पुण्यास परत आले; पण, केसरी पत्राची उघड जबाबदारी त्यांनीं तत्काळ आपल्या अंगावर घेतली नाहीं. चापेकरप्रकरणाची निरवानिरव झाल्यावर, १८९९ च्या जुलै महिन्यांत टिळकांनीं स्वतःच्या नांवानें 'केसरी'चें डिक्लेरेशन केलें.

टिळक मद्रासला चालले होते त्या वेळीं वाटेंत घडलेली एक गोष्ट* टिळकांच्या या वेळच्या लोकप्रियतेचें मापन करण्याच्या दृष्टीनें महत्त्वाची आहे. टिळक ज्या गाडीनें चालले होते ती गाडी गुंटकल स्टेशन पुढील नंतरच्या स्टेशनवर पोंचली. इतक्यांत सामान्य दर्जाचा एक मुसलमान शोधक नजरेनें प्रत्येक डब्याकडे पहातपहात टिळकांच्या डब्यासमोर येऊन उभा राहिला. दक्षिण हैदराबादचे दिवंगत दे. म. वामनरावजी नाईक हे टिळकांच्या डब्यांत होते. त्यांनीं 'क्या देखते हो' असा प्रश्न त्या मुसलमानाला विचारला. तेव्हां तो उत्तरला : एक बडे आदमी जेलसे छुटकर इसी गाडीमें मद्रास जा रहे हैं; यह सुनकर उनको देखने हम लोग आये हैं। असें म्हणून, टिळकांकडे निरखून पहात व त्यांच्याकडे अंगुलिनिर्देश करीत तो मुसलमान म्हणाला : वह यही महाराज हैं! असे उद्गार काढून त्यानें टिळकांना दोनतीन वेळां लवून सलाम केला. मद्रासच्या कॉंग्रेसच्या वेळीं टिळकांनीं भाषण केलें नाहीं. या साध्या गोष्टीचा विपर्यास झाला. पण, कॉंग्रेसमध्यें भाषण केलें की त्या मागोमाग अनेक ठिकाणीं भाषणें करण्याचा प्रसंग येईल आणि आपल्या प्रकृतीला तें मानवणार नाहीं एवढ्याचसाठीं टिळकांनीं भाषण करण्याचें टाळलें होतें. मद्रासच्या मुक्कामांत तेथील अनेक गृहस्थांनीं टिळकांना पानसुपाऱ्या केल्या व मेजवान्याहि दिल्या. मद्रासेस पुरातन काळापासून वसाहत करून राहिलेल्या महाराष्ट्रीयांनीं दिलेल्या मेजवानीच्या वेळीं टिळक म्हणाले : पूर्वीच्या पाटीवर

* आठवणी व आख्यायिका : खंड २ : पृ. २३४-३५

कोणत्याहि भागांत महाराष्ट्रीय असोत, त्यांची एकमेकांची गांठ पडली म्हणजे जें प्रेम व आपलेपणा व्यक्त होतो त्यावरून भविष्य करण्यास कोणतीहि हरकत नाहीं, कीं महाराष्ट्रीय पुन्हा एकवार आपल्या गतवैभवास प्राप्त करून आपलें राज्य प्रस्थापित करतील मद्रासहून टिळक तंजावर, त्रिचनापल्ली, मदुरा इत्यादि ठिकाणीं गेले पाँडिचरी येथेहि जाण्याची संधि त्यांनी या वेळीं साधून घेतली. ते पुढे रामेश्वरवरून सीलोनलाहि जाऊन आले या प्रवासात त्यांनीं दक्षिण भारतातल्या लोकांच्या समाजरचनेचें व चालीरीतींचें निरीक्षण किती बारकाईनें केलें होतें हें त्यांनीं सुमारें वर्षानंतर जें व्याख्यान दिलें त्या प्रसंगीं सिद्ध झालें.

टिळक परत आले त्या सुमारास बाळकृष्णपंत चापेकर यांच्यावरील खटल्याचें प्राथमिक काम पुरें झालें होतें, आणि, त्यांच्यावरील खटला 'सेशन कमिट' झालेला होता.* द्रवीडबंधूंनी पुरविलेल्या माहितीमुळें रँड-आयर्स्टच्या वधाचा तपास लागला असल्यामुळें, या कामीं सरकारनें जें बक्षीस जाहीर केलें होतें त्या बक्षिसाची सर्व रक्कम द्रवीडबंधूंना मिळावयास पाहिजे होती पण, सरकारी अधिकाऱ्यांनीं कद्रूपणा करून द्रवीडबंधूंना फक्त दहा हजार रुपये दिले होते व त्यावरूनच इन्कमटॅक्साचे पैसे कापून घेतले होते द्रवीडबंधु यांविषयीं तक्रार करीत होते. ता ७ फेब्रुवारीच्या केसरींत द्रवीडबंधूंच्या या तक्रारीच्या समर्थनपर दिसणारा काहीं मजकूर प्रसिद्ध झाला, आणि, योगायोग असा कीं, ता. ८ फेब्रुवारी रोजीं रात्रीच्या पहिल्या प्रहरींच वासुदेवराव चापेकर, रानडे व साठे या तिघांनीं द्रवीडबंधूंवर पिस्तुलें झाडून त्यांना परलोकास पाठिलें १८९७ च्या जून महिन्यांतील प्रकाराची एक प्रकारें पुनरावृत्तीच पुण्यांत झाल्यामुळें आणि दैववशात् टिळक या वेळीं पुण्यातच असल्यामुळें, कित्येक इंग्रजी वृत्तपत्रांचें डोकें पुन्हा भडकू लागलें! इंग्लंडमधील 'ग्लोब' वृत्तपत्रानें या प्रसंगीं जो खोडसाळ लेख लिहिला त्यांतलें एक अवतरण मुंबईच्या टाइम्सनें प्रसिद्ध केलें, टिळकांनीं तत्काळ टाइम्साच्या संपादकावर कोर्टात खटल्याची तयारी केली आणि टाइम्सच्या संपादकास सपशेल माफी मागण्यावांचून गत्यंतर उरलें नाहीं. 'ग्लोब' पत्राच्या संपादकानें प्रथम पुष्कळ आव आणला होता, पण, शेवटीं त्यालाहि कित्तीनें माघार घेतघेत टिळकांची सपशेल माफी मागावी लागली.

चापेकरबंधूंच्या वर्तनाशीं टिळकांचा संबंध जोडण्याचा प्रयत्न इंग्रजी वृत्तपत्रें अशा रीतीनें करीत; तर शेजारच्या मुंबईचे कांहीं पुढारी अशा प्रकरणांतली एक वेगळीच जबाबदारी टिळकांवर टाकण्याचा प्रयत्न करीत. द्रवीडबंधूंचा पुण्यांत वध झाल्यावर, प्रा. शि. म. परांजपे यांच्या 'काळ' पत्रांत प्रसिद्ध झालेला कांहीं मजकूर वाचून सर फेरोजशहा मेथाप्रभृति मंडळींचा राग अनावर झाला. टिळकांनीं 'काळ' पत्रांतल्या लिखाणाचा स्पष्टपणें निषेध करावा असें टुमणें मेथासाहेबांनीं टिळकांच्या मागें लावलें. टिळकांनीं या गोष्टीला मान्यता दिली नाहीं; पण, भोंवतालीं घडणाऱ्या प्रकारांमुळें, आपल्या वर्तनाचा व लेखनाचा विपर्यास होण्याचा संभव किती दृढ आहे हें मात्र त्यांनीं पुरतेपणीं ओळखलें. ४ जुलै १८९९ पर्यंत टिळकांनीं 'केसरी' पत्राच्या संपादकत्वाची जबाबदारी उघडपणें आपल्या अंगावर घेतली नाहीं याचीं इतर कारणें आहेतच; पण, उघडपणें 'केसरी'चें संपादकत्व आपण पत्करिलें तर, अशा प्रकरणांतील केसरींतल्या लेखाच्या प्रत्येक शब्दाचा विपर्यास होऊं लागेल, हें ओळखूनहि टिळक वागले असावे. १८९९ च्या मे महिन्याच्या मध्याच्या सुमारास चापेकरबंधू व त्यांचे स्नेही रानडे यांना फांशी देण्यांत आल्यामुळें, जुलैपूर्वी या प्रकरणाची इतिश्री झाली होती.

टिळकांनीं 'केसरी' फिरून आपल्या हातीं घेतला त्या सुमारासच त्यांनीं लॉ क्लास फिरून सुरू करण्याविषयीची घोषणा केली. लॉ क्लास आठवडाभर चालूहि असेल; पण, १८ जुलैच्या अंकांत 'लॉ क्लास' बंद केल्याचें टिळकांनीं जाहीर केलें. यापुढें 'लॉ क्लास' फिरून सुरू करावयाचा नाहीं असें टिळकांनीं मनांत ठरविलें असलें पाहिजे. या वेळीं त्यांनीं लॉ क्लास बंद ठेविला त्याचें तात्कालिक कारण फिरून सुरू झालेला प्लेग हें होतें; पण, सकाळचा बहुतेक वेळ लॉ क्लासला देणें ही गोष्ट टिळकांना दिवसेंदिवस अवघडच वाटूं लागली होती. लॉ क्लास बंद केल्यानें प्रपंचाच्या आर्थिक योगक्षेमाची तजवीज कशी करावी हा प्रश्न त्यांच्यापुढें उभा रहाणार होता. कारण, या वेळीं टिळकांचें कुटुंब अगदींच मर्यादित नव्हतें. तीन मुलगे, दोन अविवाहित मुली अशीं पांच अपत्यें, त्यांच्याविषयींच्या सर्व प्रकारच्या जबाबदाऱ्या आणि त्याशिवाय सार्वजनिक कामानिमित्त हरघडी लागणारा पैसा—अशा सगळ्याची योजना करण्याची जोखीम टिळकांवर होती! 'केसरी' पत्राच्या चालू उत्पन्ना-

वून ही सर्व जबाबदारी मावेल, अशी या वेळींहि स्थिति नव्हती. असें असूनहि, टिळकांनीं 'लॉ क्लास' कायमचा बंद करण्याचें ठरविलें याचें कारण एकच संभवतें. राजद्रोहाच्या खटल्याच्या वेळीं सर्व प्रांतांतल्या, सर्व दर्जाच्या लोकांनीं डिफेन्स फंडाला मदत केली होती. या गोष्टीच्या जाणिवेमुळे टिळकांच्या मनांत जशी कृतज्ञता बुद्धि उद्भवली असेल त्याप्रमाणेच, एक प्रकारचा विश्वासहि त्यांच्या मनांत उत्पन्न झाला असेल, हें अगदीं शक्य आहे. आपल्याला मिळणारा जास्तींत जास्त वेळ लोककार्याकडे लावण्याचा मनोमन निश्चय करून टिळकांनीं आपली कृतज्ञताबुद्धि व्यक्त केली; आणि प्रसंगच पडला तर महाराष्ट्रजनता आपलें कांहीं कमी पडूं देणार नाहीं, अशा समजुतींत त्यांच्या मनातला विश्वास परिणत झाला. सत्कार्यासाठीं यथाशक्ति द्रव्य सतत देणाऱ्या महाराष्ट्रजनतेबद्दलची कृतज्ञताबुद्धि व्यक्त करणें हा पुढील जीवनक्रमांत टिळकांचा एक उदात्त विशेष होऊन राहिला होता. कसाहि प्रसंग आला तरी कोणाजवळ पैसा' मागणें हें टिळकांच्या स्वभावाला मानवण्यासारखें नव्हतें; पण, 'अमृत यदयाचित' हें सूत्रहि त्यांच्या परिचयाचें होतें.

टिळकांनी 'केसरी' हातीं घेतला त्याच सुमारास प्लेगची सांथ फिरून सुरू झाली. त्यामुळें टिळकांना फिरून सरकारच्या प्लेगप्रतिबंधक उपायांकडे वळावें लागलें. प्लेगप्रतिबंधक उपाय म्हणून लोकांनीं लस टोंचून घ्यावी अशी शिकवण या वेळीं सुरू झालेली होती. टिळकांचा या गोष्टीला तत्त्वतः विरोध नव्हता. हा उपाय अद्याप प्रयोगावस्थेंत असल्यामुळें कोणावरहि लस टोंचून घेण्याची सक्ती होतां कामा नये हें मत मात्र टिळक आग्रहानें मांडीत असत. १८९९ च्या जुलै महिन्यांत या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं पुण्याच्या नागरिकांची एक जाहीर सभा झाली. या विषयांतील तज्ज्ञ म्हणून सरकारनें डॉ. रीड यांची नेमणूक केली होती. या गृहस्थाच्या भेटीला पुणें नागरिकांचें शिष्टमंडळ गेलें त्यांत टिळकांनीं पुढाकार घेतला होता. मुंबईचे डॉ. भालचंद्र हे लस टोंचण्याच्या उपायाचा जोरानें पुरस्कार करूं लागले. त्यामुळें टिळकांना त्यांच्याशींहि जोरानें वाद करावा लागला. वादाचा विषय शास्त्रीय स्वरूपाचा आहे आणि या विषयाचा प्रभाव लोकांच्या जीवनाशीं संबंध पोंचत आहे हें पाहून, टिळकांनीं त्याचा शास्त्रीय पद्धतीनें अभ्यास केला. अनुभवावरील

अनेक ग्रंथ वाचून त्यांनीं केसरींत लेख लिहिण्याला सुरुवात केल्यामुळें, त्यांच्या लिहिण्याचा सरकारी अधिकाऱ्यांनाहि नीट विचार करावा लागला.

या सुमारास केसरींत लेख लिहिणारे श्री. कृष्णाजी आबाजी गुरुजी यांनीं कर्नाटकांत टोंचण्याच्या सक्तीमुळें कसा कहर चालला आहे हें पुराव्यानिशीं दाखवून दिलें. यानंतर कांहीं दिवसांनीं सरकारनें या सर्व विषयाचा विचार करण्यासाठीं एक कमिशन नेमलें; तेव्हां टिळकांची टीका व गुरुजींची माहिती बरोबर असल्याचें सरकारला मान्य करावें लागलें. पण, गुरुजींनीं लेख लिहून सरकारला चिडविलें होतें त्याचें प्रायश्चित्त त्यांना अन्य मार्गानें देण्याचा सरकारनें खटाटोप केला. कर्नाटकांतील प्लेगविषयक माहिती केसरींत प्रसिद्ध झाल्यावर कांहीं दिवसांनीं गुरुजींनीं मुंबई इलाखा सोडला व ते काशी क्षेत्रांत जाऊन राहिले. 'कालिदास' या नांवाचें मराठी वर्तमानपत्र त्यांनीं तेथें सुरू केलें. या पत्रांतील कांहीं लेख आक्षेपार्ह ठरवून सरकारनें गुरुजींच्या मागें शुक्लकाष्ठ लाविलें, तेव्हा टिळकांनीं गुरुजींना फार मदत केली.

१८९९ च्या डिसेंबर महिन्याच्या उत्तरार्धांत नातूबंधूंची बेळगांवाहून सुटका झाल्याची सुवार्ता आली. चापेकर-प्रकरणामुळें घडत गेलेल्या अन्यायांची इतिश्री अशा प्रकारें झाल्यामुळें, टिळक या वर्षीच्या लखनौ कॉंग्रेसच्या अधिवेशनाला मोठ्या समाधानानें गेले. अधिवेशन संपतांच कलकत्त्याकडे जाऊन ते ब्रह्मदेशांत गेले. छत्रे सर्कशीचे मालक श्री. काशिनाथपंत हे त्या वेळीं सर्कस घेऊन ब्रह्मदेशांत फिरत होते. त्यांच्या आग्रहावरून टिळक तिकडे गेले. या प्रवासांत टिळकांनीं रंगून, मंडाले वगैरे ठिकाणें पाहून घेतलीं. यानंतर थोडक्याच दिवसांनीं छत्रे यांची सर्कस चीन देशांत गेली आणि तेथील मोठमोठ्या शहरीं तिनें लोकप्रियता संपादन केली. चीनमध्यें घुसलेल्या युरोपियनांविरुद्ध चळवळ सुरू होण्याचा हा सुमार होता. पुढें चीनमधील राजकीय परिस्थितीविषयींची बातमीपत्रें केसरींत प्रसिद्ध झालीं. नानाप्रकारच्या धंद्यांत खात्रीचीं व जाणतीं माणसें पेरून ठेवावयाचीं व त्या सर्वांचा देशकार्याकडे उपयोग करून घ्यावयाचा हें टिळकांचें कायमचें धोरण त्यांच्या ब्रह्मदेशांतील प्रवासाच्या मागें होतें कीं काय, असा संशय या सर्व प्रसंगाचे धागेदोरे तपासून पाहिल्यावर येऊं लागतो.

टिळक पुण्यास परत आले तों १९०० सालच्या फेब्रुवारी महिना संपत आलेला होता. त्यांच्या मार्गदर्शनाची वाट पहात अनेक कामें खोळंबून

राहिलेली होती. या वर्षी प्रसिद्ध मुत्सद्दी नाना फडणवीस यांच्या मृत्यूला शंभर वर्षे पुरीं होत असल्यामुळें, नानांच्या मूळ गांवीं मोठा उत्सव करण्याचें कित्येक मंडळींनीं ठरविलें होतें. हा उत्सव १९-३-१९०० या दिवशीं वेळास येथें व्हावयाचा असल्यामुळें व टिळकांच्या मागें इतर अनेक उद्योग लागलेले असल्यामुळें, या वर्षीच्या उत्सवाला टिळक स्वतः जाऊं शकले नाहींत. पण उत्सवाचें महत्त्व लक्षात ठेवून त्यांनीं आपले भाचे धोंडोपंत विद्वांस यांना वेळास येथें धाडिलें.* नाना फडणविसांची एक मोठी रंगीत तसबीर व टिळकांच्या भाषणाची छापील प्रत बरोबर घेऊन विद्वांस प्रगट झाल्याबरोबर वेळासच्या उत्सवचालकांना टिळकांच्या आस्थेवाईकपणाचें मोठें कौतुक वाटलें. या वर्षी एप्रिल महिन्यांत रायगडावर पिरून शिवाजीमहाराजांचा उत्सव करण्यांत आला. या उत्सवाच्या प्रसंगानें शिवाजीमहाराजांची खरी जन्मतिथि कोणती हा प्रश्न चर्चेला निघाला. राजवाडेप्रभृति संशोधकांनीं ठरविलेली तिथि बरोबर नाहीं असें टिळकांनीं दाखवून दिलें. त्या वेळीं जे कागदपत्र उपलब्ध होते त्यांचा आधार घेऊन टिळकांनीं जो निष्कर्ष काढिला तो जेधे-शकावली वगैरे आधार मिळाल्यामुळें टिळकांनाच पुढें बदलावा लागला. या वर्षी रायगडावर झालेला शिवाजीमहाराजांचा उत्सव पहिल्या उत्सवाहूनहि अधिक उत्साहानें आणि थाटामाटानें साजरा झाला.

राजकारणाच्या उलाढालींत गुंतून गेलेल्या टिळकांची बुद्धि एकाच वेळीं किती प्रकारच्या विविध विषयांत गुंतलेली असे हें या वर्षी टिळकांनीं हातीं घेतलेल्या व पुरस्कारिलेल्या कांहीं उपक्रमांवरून सिद्ध होतें. सध्यां प्रचारांत असलेलीं पंचांगें शास्त्रीयदृष्ट्या निर्दोष नाहींत, निर्दोष व शास्त्रीय पंचांग बनविणें हें एक राष्ट्रीय कार्य आहे, असें टिळकांचे गुरु केरूनाना छत्रे यांचें मत होतें. या वर्षीच्या उन्हाळ्यांत पुण्यास कांहीं ज्योतिषी मंडळींना बोलावून टिळकांनीं शुद्ध शास्त्रीय पंचांग तयार करण्याच्या कार्याला चालना दिली. वारकरीसंप्रदायांतील संतश्रेष्ठ श्रीज्ञानेश्वरमहाराज हे एक नसून दोन आहेत, असा वाद नगर जिल्ह्यांतील एक विद्वान् श्री. भारदे यांनीं यापूर्वी सुरू केला होता. वारकरीसंप्रदायांतील एक अधिकारी पुरुष नानामहाराज साखरे यांनीं

* आठवणी व आख्यायिका : खं. १ : भा. २ : पृ. ६८.

श्री. भारदे यांच्या मतांचें खंडण करण्याचें ठरविलें. साखरे यांची या विषयावरील लेखमाला या सालच्या केसरींत बरेच महिनेपर्यंत चालली. ही लेखमाला सजविण्याच्या कामीं आणि तिची शास्त्रशुद्धता वाढविण्याच्या कामीं टिळकांनीं बरीच मदत केली होती, असें समजतें.

या वर्षीच्या मे महिन्यांत मुंबई इलाख्याची प्रांतिक परिषद सातारा येथें झाली. परिषदेचें अध्यक्षपद मुंबईचे शेठ गोकुळदास पारेख यांना देण्यांत आलें होतें. मुंबईचे मावळते गव्हर्नर लॉर्ड सँडर्स्ट यांचें सार्वजनिक स्मारक करावें अशी कल्पना कांहीं मुंबईकर मंडळींनीं या परिषदेपूर्वींच लोकांपुढें मांडली होती. लॉर्ड सँडर्स्ट यांची कारकीर्द लोकांना तापदायक झाली असल्यामुळें, टिळकांचा या स्मारकाला विरोध होता. यामुळें प्रांतिक परिषदेंत या विषयावर खूपच खडाजंगी झाली. सँडर्स्टस्मारकाच्या ठरावाची चर्चा चालू असतांना, अध्यक्षांनीं परिषद बरखास्त करून, राजिनामा देऊन, निघून जाण्याचा धाक घातल्यामुळें तर, परिषदेंत खूपच बाचाबाची झाली. केवळ टिळकांच्या सामोपचाराच्या धोरणामुळें ही परिषद सुरळित पार पडूं शकली. या परिषदेचा प्रसंग साधून श्री. अंताजी दामोदर काळे यांनीं आपली पैसा-फंडाची कल्पना लोकांपुढें मांडली. या कल्पनेचा पुरस्कार करण्याचें ठरवून टिळकांनीं या वर्षी केसरींतून या कल्पनेला चालना दिली.

१९०० सालच्या उत्तरार्धांत टिळकांनीं ज्या विषयांवर केसरींत लेख लिहिले ते विषय प्रायः स्थानिक महत्त्वाचे होते. दुष्काळी व्यवस्था, शेतसारा, प्लेगप्रतिबंधक उपाय इत्यादि जुन्या विषयांप्रमाणेंच टिळकांनीं या वर्षी पुणें शहरांत सुरू होऊं पाहणाऱ्या ड्रेनेजच्या योजनेचाहि परामर्ष घेतला. या वर्षीच वेदोक्ताचा वाद सुरू झाला. प्रथम बडोद्यास सुरू झालेला हा वाद लवकरच कोल्हापुरास आला व तेथील प्रोत्साहक वातावरणांत तो पुढें चांगलाच तरारला! या वेदोक्तप्रकरणीं टिळकांनीं नेमकें काय म्हटलें हें न पाहतांच टिळकांच्या या विषयावरील मतावर टीका केली जाते. म्हणून, टिळकांच्या लेखांतले कांहीं उतारे या ठिकाणीं देणें अवश्य आहे. 'मराठे आणि वेदोक्त कर्में' या लेखमालेंतल्या दुसऱ्या लेखांत* टिळक लिहितात :

* लो. टिळकांचे केसरींतील लेख : भा. ४ : पृ. ३१९-२३.

(१) महाराष्ट्रांत मराठे लोकांस जो मान आहे तो त्यांच्या वाडवडिलांच्या शौर्यामुळें त्यांस प्राप्त झालेला आहे व तशा प्रकारचें शौर्य, धाडस व देशाभिमान हे गुण जोंपर्यंत त्यांच्यामध्यें जागृत राहतील तोंपर्यंत त्यांचा मान कधींहि कमी व्हावयाचा नाहीं. वेदोक्त कर्में करणारे ब्राह्मण पाणी भरतात आणि पुराणोक्त कर्में करणारे मराठे राजपदाचा अनुभव घेतात हें जर आम्ही डोळ्यांनें पहात आहों तर वेदोक्त मंत्रांनींच आपले संस्कार झाले पाहिजेत असा आग्रह मराठ्यांनीं धरणें चुकीचें नव्हे काय? (२) मराठे संस्थानिकांस जर पुराणोक्त कर्में करणारे ब्राह्मण उपाध्ये नको असतील तर त्यांस त्यांनीं बोलावूं नये; पण, तेवढ्याकरितां सदर उपाध्ये जोंपर्यंत वहिवाटीप्रमाणें कर्में करण्यास तयार आहेत तोंपर्यंत त्यांचें वेतन बंद करतां यावयाचें नाहीं.

मुंबई सरकारच्या शिक्षणखात्याचे प्रमुख जाइल्ससाहेब यांना जिकडेतिकडे राजद्रोह दिसूं लागला होता व त्यामुळे ते शिक्षणसंस्थांवर नवीं नवीं नियंत्रणें लादूं लागले होते. यामुळे टिळकांनी या जाइल्ससाहेबावरहि या वर्षीं बरेच लेख लिहिले. जाइल्ससाहेबाच्या धोरणांतला कोणता भाग टिळकांना आक्षेपार्ह वाटत होता हें समजण्यासाठीं पुढील उतारा* पुरे आहे :

राजद्रोहरूपी प्लेगनें दूषित झालेलें वातावरण डिसइन्फेक्ट करण्याचें आपलें काम आहे अशी आपल्या मनाची खोटी समजूत करून घेऊन आमचे हर्क्युलिस-सदृश डायरेक्टर ही घाण काढण्यास स्वतः हातांत खराटा घेऊन सज्ज झाले...साहेबबहादुरांची दृष्टि खाजगी शिक्षणाकडे वळून एकंदर खाजगी शाळांचीं मुसकें दाबण्याचा त्यांनीं प्रयत्न केला...गणपतिउत्सवांत जाणें डायरेक्टरसाहेबांस आवडत नाहीं अगर शिवाजी-उत्सवांत सरकारी मदत घेणाऱ्या खाजगी शाळेंतील देखील कोणी मास्तर गेलेला त्यांना खपत नाहीं. म्हणून असल्या प्रकारच्या चळवळींत खाजगी शाळांतील मास्तरांनीं शिरूं नये म्हणून सर्क्युलरें निघालीं आहेत.

* लो. टिळकांचे केसरींतील लेख: खं. २: पृ. १३६-३७.

तुरुंगांतून सुटल्यावर टिळकांनीं प्रो. मॅक्समुल्लर यांच्याशीं पत्रव्यवहार सुरू केला होता. वेदकालनिर्णय व आर्यांचें मूळ वसतिस्थान या विषयांसंबंधींचे जे विचार टिळकांच्या मनांत या सुमारास घोळत होते ते या पंडिताला कितीसे पटतात-हें टिळक पहात होते. या जगन्मान्य पंडिताशीं टिळकांचें जवळचें नातें निर्माण झाल्यामुळें, १९०० सालीं नोव्हेंबर महिन्याच्या आरंभीं तो मेल्याची वार्ता प्रसिद्ध झाली तेव्हां टिळकांना फार वाईट वाटलें. टिळकांनीं केसरींत लिहिलेले अनेक मृत्युलेख चांगले आहेत; पण, प्रो. मॅक्समुल्लर यांच्यावरील मृत्युलेख या चांगल्या लेखांतहि चांगला ठरेल.

या वर्षाच्या डिसेंबर महिन्याच्या प्रारंभीं लातुरास जाऊन, टिळकांनीं तेथील कारखान्याची स्थिति कशी आहे हें पाहिलें. या वेळीं टिळकांचे चिरंजीव विश्वनाथपंत हे त्यांच्याबरोबर होते. लातूरला जातांना टिळकांनीं वाटेंत बार्शी येथें मुक्काम केला होता. टिळक पुण्यास परत आले नि थोडक्याच दिवसांनीं कॉंग्रेसच्या अधिवेशनासाठीं लाहोरला गेले. विषयनियामक कमिटींत त्यांनीं मेयापक्षाला विरोध केला. लाला लजपतराय नि विजयराघवाचारियर हे पुढारी या वेळीं पूर्णपणें टिळकांच्या मताचे झाले. कॉंग्रेसच्या खुल्या अधिवेशनांत टिळकांनीं 'दुष्काळ व दारिद्र्य' या विषयावर भाषण केलें. कॉंग्रेसनंतर त्यांचें 'वेदांचें प्राचीनत्व' या विषयावर अत्यंत विद्वत्तापूर्ण भाषण झालें.

नव्या-म्हणजे विसाव्या-शतकाच्या सुरुवातीचे पुरे १५-२० दिवसहि गेले नाहींत तोंच जुनें युग संपल्याचा इशारा देणारे दोन महत्त्वाचे मृत्यु घडले. दि. १६-१-०१ ला न्या. मू. रानडे इहलोक सोडून गेले नि त्यानंतर सहाच दिवसांनीं व्हिक्टोरिया राणी ख्रिस्तवासी झाली! या दोन्ही प्रसंगांचा परामर्श घेतांना टिळकांनीं अत्यंत निर्विकार वृत्तीनें लेखणी चालविली! व्हिक्टोरिया राणीच्या ६४ वर्षांच्या कारकीर्दींत इंग्लंडचें साम्राज्य वाढून नि औद्योगिक भरभराट होऊन इंग्लंडचें वैभव वस्तुतः इतरांच्या डोळ्यांत सलूं लागलें होतें. साधेल तेथें घुसून स्वार्थ साधण्याच्या इंग्रजांच्या संवयीला प्रतिकार करण्याची प्रवृत्ति सुरू झाली आहे हें बोअर युद्ध, चीनमधील बॉक्सर बंड इत्यादि घटनांकडे लक्ष ठेवणाऱ्या टिळकांना कळून चुकलें होतें; पण, महाराणीच्या मृत्यूच्या निमित्तानें तिच्या कारकीर्दींचें सिंहावलोकन करतांना या अप्रिय गोष्टींचा स्पष्ट उल्लेख टाळणें टिळकांना श्रेयस्कर वाटलें. रानड्यांचें कार्य ज्या

मानानें उदास त्या मानानें त्यांच्या मृत्यूनंतर तें कार्य पुढें चालविणारांची जबाबदारी मोठी, अशा जाणिवेनें टिळकांनीं रानड्यांवरील लेख लिहिला. सर्वगामी बुद्धि हा रानड्यांचा अलौकिक गुण; 'सर्वज्ञः स हि माधवः' या मोजक्या शब्दांत टिळकांनीं या गुणाचा यथार्थ गौरव केला।

१८९८ सालीं तुरुंगांत असतांना टिळकांच्या मनांत आर्यांच्या मूळ वसतिस्थानासंबंधींचे जे विचार उदय पावले ते विचार पारखून पक्के करण्याचें काम त्यांनीं एकसारखें चालविलें होतें. पत्रव्यवहाराच्या मार्गानें त्यांनीं प्रो. मॅक्समुल्लर यांच्यापुढें आपले विचार मांडले त्याप्रमाणेंच भारतांतल्या ठिकठिकाणच्या पंडितांशींहि त्यांनीं या विषयासंबंधींची चर्चा चालविली. मद्रास, कलकत्ता, लाहोर वगैरे ठिकाणीं टिळक मध्यंतरीं गेले होते; त्या वेळीं तेथील विद्वानांशीं त्यांनीं आपल्या सिद्धांताविषयीं विचारविनिमय केला. भाषाशास्त्र व ज्योतिषशास्त्र यांमुळें निघणाऱ्या निष्कर्षांना भूस्तरशास्त्र, तुलनात्मक दैवतशास्त्र इत्यादींचा आधार कितीसा मिळतो हें पाहण्यासाठीं त्यांनीं त्या विषयांवरील अनेक ग्रंथ अभ्यासिले. आपला सिद्धांत प्रस्थापित करतांना पारशी लोकांच्या अवेस्ता ग्रंथांतल्या कांहीं भागाचाहि उपयोग होण्यासारखा आहे हें लक्षांत येतांच, त्यांनीं पारशी धर्मगुरूंची भेट घेऊन पुष्कळ चर्चा केली. The Arctic Home in the Vedas या संकलित ग्रंथाची अशा रीतीनें चाललेली जुळवाजुळव, पक्की करण्याचें काम टिळकांनीं १९०१ सालीं जानेवारीपासून पुढील दोनतीन महिने चालविलें असावें.

इकडे हा उद्योग चालू असतांनाच, टिळकांचे मन दुसऱ्या एका प्रकरणांत गुंतलें होतें. त्यांचे दिवंगत मित्र बाबामहाराज यांच्या पत्नी ताईमहाराज यांची प्रकृति बिघडूं लागून त्यांना क्षयाची व्यथा जडते कीं काय अशी भीति वाटूं लागली होती. ताईमहाराजांनीं मुलगा दत्तक घ्यावयाचा तर तो कोणता या प्रश्नाची उठाठेव करण्यांत त्यांचे हितसंबंध गुंतले होते असे उपद्व्यापी लोक बाईंना बुद्धि शिकवूं लागले होते. दत्तक-प्रकरण असेंच लोंबत राहिलें तर त्यांतून अनंत भानगडी उपस्थित होतील असें मानण्याला सबळ कारणें उत्पन्न झालीं होतीं. त्यामुळें, कोल्हापूर, औरंगाबाद वगैरे ज्या भागांत योग्य असा मुलगा सांपडण्याचा संभव होता त्या भागांत मुलाचा शोध करण्याचें काम टिळकांनीं या सुमारास हातीं घेतलें होतें.

१९०१ च्या मे-जून महिन्यांत सिंहगडावर राहून टिळकांनी The Arctic Home in the Vedas या पुस्तकाच्या लेखनाचें काम पुरें केलें. या वर्षी टिळक मुलांमाणसांसह गडावर गेले होते. पुस्तकाचा मजकूर सांगण्याचें काम रोज १४।१५ तास चाले.* जून महिन्याच्या प्रारंभीं श्रीमंत दादासाहेब खापर्डे गडावर आले. दि. १० जून रोजीं ते व टिळक पुण्यास गेले असें दिसतें.† या दिवशीं टिळकांनीं आपल्या ग्रंथाचें अकरावें प्रकरण सांगून संपविलें. यावरून एक निष्कर्ष सहज निघतो तो हा कीं, या ग्रंथाचीं शेवटचीं दोन प्रकरणें १९०१ जूनपासून पुढील वीस-एकवीस महिन्यांत केव्हां तरी लिहिलीं गेलीं असावीं; कारण, १९०३ च्या मार्च महिन्यांत टिळकांनीं हा ग्रंथ प्रसिद्ध केला! ज्या काळांत ताईमहाराजप्रकरणाच्या शनिपीडेमुळें टिळकांच्या हितचिंतकांनाहि अन्न गोड लागत नव्हतें त्या काळांत हीं प्रकरणें लिहून, हस्तलिखिताला अखेरचें स्वरूप देऊन, एवढा ग्रंथ प्रसिद्ध करणाऱ्या टिळकांच्या उद्योगीपणाचें कौतुक करावें कीं त्यांच्या मनःशांतीचें कौतुक करावें, हेंच कळेनासें होतें !

टिळक-खापर्डे गडावरून पुण्यास आले नि रेंगाळत पडलेलें दत्तक-प्रकरण घातघाईवर आलें. वडगांव व पुणें येथें ट्रस्टींच्या सभा झाल्या. शेवटीं दि. १८।६।०१ रोजीं झालेल्या ट्रस्टींच्या सभेंत असें ठरलें कीं टिळक, खापर्डे व ताईमहाराज यांनीं औरंगाबादकडे जाऊन दत्तक-प्रकरणाचा निकाल करून पुण्यास परत यावें. हा ठराव झाल्यामुळें कोल्हापूरच्या घराण्यांतील मुलगा दत्तक घेतला जात नाहीं हें ठरलें. त्यामुळें कोल्हापूरच्या महाराजघराण्यांतली मंडळी चिथरली आणि दत्तकाला कोल्हापूरदरबारची परवानगी मिळणेंहि मुश्किलीचें झालें. टिळक-खापर्डे व ताईमहाराज ही मंडळी औरंगाबादेस श्रीराम-मंदिरांत उतरली. महाराजघराण्याशीं गोत्रज असलेली कांहीं मंडळी औरंगाबादनजीकच्या कांहीं खेड्यांतून रहात होती. तेथून मुलांना घेऊन त्यांचे वडील औरंगाबादेस येऊं लागले. टिळक,-खापर्डे नि ताईमहाराज यांनीं आपल्या भिन्नभिन्न दृष्टींनीं मुलांची पारख चालविली; आणि शेवटीं सर्वांचे श्रीमंत जगन्नाथमहाराज यांची निवड सर्वांच्या मतानें झाली. औरंगाबादची शास्त्री

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. २८९
† आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ५८३

मंडळी नि प्रतिष्ठित मंडळी यांच्यासमक्ष दि. २७ जूनला सर्व करारमदार झाले. दि. २८ जून रोजी सकाळी मुलग्या मांडीवर देण्याचा समारंभहि झाला. सर्व धार्मिक विधि मागाहून पुण्यास करण्याचे योजून टिळक व ताईमहाराज पुण्याकडे निघाली. दादासाहेब खापर्डे थोडे आधींच उमरावतीस गेले होते.

जुलैच्या आरंभीं टिळक नि ताईमहाराज पुण्यास परत आली. टिळकांचे एक सहट्रस्टी नि बाबामहाराजांच्या वेळेपासूनचे माहितगार कारभारी श्री. बळवंतराव नागपूरकर हे, स्वतःच्या मुलास दत्तक जात नाहीं असे ठरल्यावर, ताईमहाराजांनीं कोल्हापूरचे बाळामहाराज यांना दत्तक घ्यावें या मताचे झाले होते. औरंगाबादेस दत्तविधान झालें असलें तरीहि, बाळामहाराजांना ताईमहाराजांनीं दत्तक घ्यावें असें ठरलें नि त्याप्रमाणें कोल्हापुराहून पंडितमहाराज, बाळामहाराज वगैरे मंडळी निघून पुण्यास आली. ही सर्व मंडळी भाऊमहाराजांच्या वाड्यांतच उतरली. बाळामहाराजांना दत्तक घेण्याची परवानगी ताईमहाराजांनीं कोल्हापूरदरबारकडे मागितली तेव्हां टिळकांनीं दरबारला त्याविरुद्ध तार केली. नागपूरकर-ताईमहाराज यांनीं कोल्हापूरच्या छत्रतींना आपल्या बाजूला वळवून घेतलेंच होतें. पुण्याचे डिस्ट्रिक्ट जज्ज ॲस्टनसाहेब हे त्या वेळीं दक्षिणी संस्थानांच्या कारभारावर साम्राज्यसत्तेचे प्रतिनिधि म्हणून देखरेख करीत असत. त्यांचे हलके कान नि हलकें मन टिळकांविषयीं दूषित झालेंच होतें. ताईमहाराजांनीं साहेबांची भेट घेऊन आपली करुणकहाणी त्यांना सांगितली. मर्कटाला मद्यप्राशनाची संधि मिळाली! साम्राज्यसरकार, कोल्हापूरदरबार नि ताईमहाराज यांच्या संघटित चळवळीविरुद्ध झुंजण्यास टिळकांना सिद्ध व्हावें लागलें.

दि. १५ जुलैला दादासाहेब खापर्डे फिरून पुण्यास आले. कोल्हापुराहून आलेल्या मंडळींना महाराजांच्या वाड्याबाहेर कसें काढावें नि बाळामहाराजांचे दत्तविधान कसें टाळावें हे प्रश्न मोठे बिकट होऊन बसले होते. पहिला प्रश्न समाधानकारक रीतीनें सोडवितांना टिळकांना शेवटीं जोरजबरी करण्याची सिद्धताहि करावी लागली. पंडितमहाराज नाक मुठींत धरून वाड्याबाहेर पडले. त्यांनीं पोलिसांत टिळकांविरुद्ध फिर्याद गुदरली. पण, तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं. बाळामहाराजांचे दत्तविधान पुण्यास झटकन पार पडणार नाहीं असें ठरवून, कोल्हापूरच्या अनुकूल वातावरणांत तें घडवून आणण्याचे

कारस्थान रचण्यांत आलें. 'मुलगा होऊन मेला त्याच दिवशीं टिळक-प्रभृति ट्रस्टींचे अधिकार संपले' असा शास्त्रार्थ ताईमहाराजांना सुचविण्यांत आला. बाबामहाराजांच्या मृत्युपत्रान्वयें टिळकांना मिळालेलें अधिकारपत्र रद्द व्हावें अशी मागणी कोर्टांत करण्याचा ताईमहाराजांचा निश्चय झाला. २९।७।१९०१ रोजीं ॲस्टनसाहेबाकडे बाईचा अर्ज गेला.

कोल्हापूरच्या छत्रपतींनीं कोणत्याच दत्तविधानाला तूर्त मान्यता देऊं नये असें सुचविण्यासाठीं टिळक ऑगस्ट महिन्याच्या मध्याच्या सुमारास कोल्हापुरास गेले. दत्तविधान उरकून घेण्याला अधीर झालेली ताईमहाराज, नागपूरकर वगैरे मंडळीहि त्यांच्या मागोमाग कोल्हापुरास गेली. दत्तविधान ज्या दिवशीं झालें त्या दिवशीं–दत्तविधानाच्या वेळेआधीं जेमतेम एक प्रहर–टिळक छत्रपतींच्या भेटीस गेले होते; पण, दत्तविधानाला मान्यता दिल्याची अगर दत्तविधान आजच होणार असल्याबद्दलची दाद त्यांनीं टिळकांना लागूं दिली नाहीं. छत्रपतींच्या मुत्सद्दीपणाचा, धूर्तपणाचा नि पाताळयंत्रीपणाचा उपयोग उच्च कार्यांत व्हावयाचा तो अशा क्षुद्र, खाजगी कामांत होऊं लागला हें पाहून टिळकांना विषाद वाटला! जगन्नाथमहाराजांचें दत्तविधान कायदेशीर ठरावें नि बाळामहाराजाचें दत्तविधान अमान्य व्हावें म्हणून टिळकांनीं शेवटीं २३।९।०१ रोजीं पुण्याच्या फर्स्ट क्लास कोर्टांत फिर्याद दाखल केली.

दत्तक-प्रकरणाचें हें लचांड टिळकांच्या मागें लागलें होतें तरीहि राजकारणांतील महत्त्वाच्या प्रश्नांकडे त्यांना लक्ष द्यावें लागतच होतें. १९०१ सालच्या मे महिन्याचे शेवटीं मुंबई सरकारनें जमीनमहसुलाचा कायदा दुरुस्त करण्याविषयींच्या बिलाचा मसुदा प्रसिद्ध केला. या बिलाचा परिणाम मुंबई इलाख्यांतल्या लहानमोठ्या सर्वच शेतकऱ्यांवर होईल हें ओळखून, टिळकांनीं या बिलावर टीकेची झोड उठविली. शेतकऱ्यांच्या जमिनी कर्जबाजारीपणामुळें सावकाराकडे जातात, त्या तशा जाऊं नयेत, हा या बिलाचा हेतु असल्याचें सांगण्यांत येत होतें. पण, या बिलाच्या पोटांतला हेतु वेगळाच आहे हें टिळकांनीं ओळखलें होतें. दुष्काळांत सारा न दिल्यामुळें जमिनी खालसा कराव्या लागतील व त्या खालसा केल्या म्हणजे पुन्हा त्यांच्या मालकीहक्काचा आजपर्यंतच्या वहिवाटीप्रमाणें लिलाव न करितां त्या जमिनी कांहीं वर्षें मुदतीच्या कबुलायतीप्रमाणें लोकांस द्याव्या व सदर कबुलायतींत कुळानें ती जमीन

गहाण टाकूं नये अगर विकूं नये अशी शर्त घालावी; परंतु हल्लींच्या कायद्यांत खालसा केलेल्या जमिनी अशा रीतीनें कुळास देण्यास कलेक्टर यांस अधिकार नाहीं, तो अधिकार 'लँड रेव्हेन्यू' कोडांत दुरुस्ती करून त्यांस द्यावा या हेतूनें हल्लीं कौन्सिलपुढें...बिल आणिलें आहे, असें स्पष्टीकरण टिळकांनीं केलें. जूनपासून सप्टेंबरपर्यंत टिळकांनीं या बिलावर टीका करण्याच्या निमित्तानें खूप लोकजागृति केली. या विषयावरील टिळकांचे सर्व लेख वाचले म्हणजे असें दिसतें कीं, आयर्लंड वगैरे देशांत शेतकरीवर्गाच्या उद्धारासाठीं चाललेल्या चळवळींकडे टिळक बारकाईनें पहात होते आणि आफ्रिकेंत चालू असलेल्या बोअर युद्धांतल्या बारीकसारीक घटनांकडेहि त्यांचें सूक्ष्म लक्ष होतें.

लोकमताचा तीव्र विरोध असूनहि सरकारनें शेवटीं बिल जसेंच्या तसें पास केलें हें पाहून मुंबई कायदेमंडळातील मेथा-गोखले-खरेप्रभृति लोकप्रतिनिधि निषेध म्हणून कौन्सिलांतून निघून गेले. या प्रकाराची इंग्रजी वर्तमानपत्रांनीं थट्टा सुरू केली. या थट्टेचा समाचार घेतांना टिळकांनीं दि. १-१-१९०१ च्या केसरींत जो लेख लिहिला तो अनेक दृष्टींनीं महत्त्वाचा आहे. कायदेमंडळांतून उठून गेलेल्या सभासदांचें समर्थन करतांना टिळकांनीं लिहिलें :

दुरभिमानाचा आणि दुराग्रहाचा जेथें बाजार माजला, प्रीति आणि शहाणपणा जेथून सुटला आणि केवळ मनगटाच्या जोरावर मुत्सद्दीपणाचीं कार्यें उरकून घेण्यास ज्या ठिकाणीं मंडळी सज्ज झाली आणि असल्या मंडळींचेंच जेथें विशेष प्राबल्य तेथून, आपला पक्ष खरा असला तरी, शहाण्या माणसानें उठून जाण्याखेरीज दुसरी कांहीं सोय आहे, असें आम्हांस वाटत नाहीं.

लोकप्रतिनिधींची अशी विटंबना करणाऱ्या सरकारला टिळकांनीं पुढील वाक्यांत मारलेला उपरोधिक टोला मोठा मासलेवाईक आहे :

लोकांचे प्रतिनिधि कायदेकौन्सिलांत घेऊन जर अशाच तऱ्हेनें त्यांचा बोज ठेवावयाचा असेल तर, यापेक्षां पांचसहा संगमरवरी दगडाचे पुतळे करून त्यांचीच कायदेकौन्सिलांत निरनिराळ्या ठिकाणीं स्थापना करावी आणि निरनिराळ्या भागांच्या नियमणुकी झाल्या म्हणजे एका पुतळ्यास नामदार मेथांची टोपी तर दुसऱ्यास

प्रो. गोखल्यांचें पागोटें घालून चटावरीलं श्राद्धाप्रमाणें कायदे-कौन्सिलांतील फार्स उरकून घ्यावा, हें फार चांगलें.

ट्रस्टींचे अधिकार रद्द करण्याविषयींचा ताईमहाराजांचा अर्ज आणि जगन्नाथ महाराजांचें दत्तविधान मान्य होण्याविषयींची टिळकांची फिर्याद हीं दोन प्रकरणें ॲस्टनसाहेबापुढें आल्यावर त्यानें बाईंच्या अर्जाचें काम प्रथम हातीं घेतलें. ट्रस्टींचे अधिकार रद्द ठरतात कीं काय, एवढा साधा प्रश्नच त्याच्यापुढें होता. अधिकार रद्द होत नाहींत याची अप्रत्यक्ष कबुली बाईंनींच दिलेली होती. असें असूनहि, ॲस्टनसाहेयानें जाणूनबुजून या प्रकरणाची लांबण लावण्याला सुरवात केली. औरंगाबादचें दत्तविधान खोटें आहे असें सिद्ध व्हावें या हेतूनें ताईमहाराजांच्यातर्फे सादर करण्यांत आलेला पुरावा त्यानें स्वीकारला आणि टिळकांवर फौजदारी खटला भरला जावा याविषयीं-ची प्राथमिक सिद्धता करून ठेवण्याचा उद्योग त्यानें आरंभिला. ॲस्टन-साहेयाचें हें धोरण पाहून, अर्जाची चौकशी दुसऱ्या कोणापुढें तरी व्हावी असा अर्ज टिळकांनीं हायकोर्टाकडे केला; पण त्याचा उपयोग झाला नाहीं. ॲस्टनसाहेबाच्यापुढें या अर्जाच्या प्रकरणांत टिळकांची उलटतपासणी झाली ती तब्बल सोळा दिवस चालली होती! या तपासणीला १६ नोव्हेंबर १९०१ रोजीं सुरुवात झाली. तपासणीचें काम चालू असतानाच नाताळची सुट्टी सुरू झाली.

या वर्षीच्या नोव्हेंबर महिन्यांत रँग्लर परांजपे यांना सेंट जॉन कॉलेजचे फेलो निवडण्यांत आलें. इंग्लंडांतील आपला शिक्षणक्रम संपवून परांजपे आतां लवकरच परत येतील असें दिसूं लागलें. परांजपे रँग्लर झाले त्या वेळीं टिळकांनीं त्यांचें 'केसरी'त अभिनंदन केलें होतें; त्याप्रमाणेंच याहि प्रसंगीं त्यांनीं फिरून परांजपे यांचें अभिनंदन केलें. परांजपे १९०१ च्या डिसेंबरांत स्वदेशीं परत आले. त्यानंतर कांहीं दिवसांनीं टिळक मुद्दाम त्यांच्या घरीं जाऊन त्यांना भेटून आले. पांडित्याच्या क्षेत्रांत लौकिक कमावणारी प्रत्येक भारतीय व्यक्ति म्हणजे भारताचें भूषण, असें समजणारे टिळक अशा व्यक्तींकडे किती आपलेपणानें पहात हें यावरून स्पष्ट होतें. गणितज्ञ म्हणून टिळकांची योग्यता फार श्रेष्ठ आहे हें परांजपेहि जाणून होते व त्या दृष्टीनें त्यांना टिळकांबद्दल आदरहि वाटत होता, हें पुढील हकीकतींवरून सिद्ध

होत आहे. टिळकांचे चिरंजीव विश्वनाथपंत यांनी वर्गात परांजपे यांना अवघड वाटलेलें एक उदाहरण वडिलांना विचारून सोडवून नेलें. उदाहरण सोडविण्याची ती अभिनव रीत पाहून परांजपे थक्क झाले! ही रीत टिळकांनीं सुचविली आहे असें विश्वनाथपंतांनीं वर्गात सांगितलें तेव्हां "मला वाटलेंच! टिळकांच्या शिवाय दुसऱ्या कोणाला ही रीत सुचणार नाहीं" असे उद्गार परांजपे यांनीं मोकळ्या मनानें काढिले.

या वर्षीचें कॉंग्रेसचें अधिवेशन कलकत्ता येथें झालें. टिळक कलकत्त्यास चालले असतांना नागपूरच्या प्रौढ विद्यार्थ्यांचे प्रतिनिधि म्हणून श्री. माधव श्रीहरि अणेप्रभृति तरुण टिळकांना भेटले. परत जातांना नागपूर येथें मुक्काम करीन असें अभिवचन टिळकांनीं या तरुणांना दिलें. कॉंग्रेसचें सर्व काम फेरोजशहांच्या तंत्रानें चालतें व त्यांच्या ओशाळेपणानें सर्व कार्यक्रम पार पाडण्यांत येतो अशी तक्रार टिळकांनीं या कॉंग्रेसच्या वेळीं केली. कॉंग्रेसच्या खुल्या अधिवेशनांत टिळकांनीं 'एज्युकेशन कमिशन'च्या ठरावावर भाषण केलें. मुख्य भाषण मालवीय यांचें झालें व टिळकांनीं ठरावाला अनुमोदन दिलें. जपानची शिक्षणपद्धति व हिंदुस्थानांतील शिक्षणपद्धति यांची टिळकांनीं आपल्या भाषणांत तुलना केली. कलकत्ता येथील या मुक्कामांत टिळकांचें 'हिंदुधर्म' या विषयावर व्याख्यान झालें. या व्याख्यानाचा वृत्तपत्रांत प्रसिद्ध झालेला गोषवारा वाचून अनेकांना आनंद व अभिमान वाटला.* कलकत्ता येथील मुक्कामांत टिळक स्वामी विवेकानंद यांना भेटण्यासाठीं त्यांच्या मठांत गेले होते. हा मठ गंगेच्या कांठीं होता व तेथें पोंचण्यासाठीं टिळकांना नौकेतून मैल-दीडमैल जावें लागलें. टिळकांच्या स्वागतासाठीं स्वतः स्वामी विवेकानंद गंगातीरीं उपस्थित होते व टिळक नौकेतून उतरूं लागले तेव्हां स्वामीजींनीं त्यांना हात दिला. टिळक कांठावर पोंचल्याबरोबर, या दोन थोर व्यक्तींनीं परस्परांना प्रेमालिंगन दिलें व प्रेमाश्रूंनीं एकमेकांस स्नान घातलें. स्वामीजींच्या मठांत फलाहार वगैरे मामुली गोष्टी झाल्याच; पण, स्वामीजी व टिळक यांच्या दरम्यान कांहीं हितगुजहि झालें. कलकत्ता येथील याच मुक्कामांत टिळकांनीं 'माताजींची कन्याशाळा' म्हणून प्रसिद्ध असलेल्या संस्थेला भेट दिली.

* केळकरकृत टिळकचरित्र, उत्तरार्ध : खं. १ : भा. २ : पृ. ३९.

संस्थेच्या चालक बाई कलकत्त्याच्या समाजांत 'माताजी' म्हणून ओळखल्या जात. वस्तुतः त्या महाराष्ट्रीय होत्या. उच्चवर्णीतील खानदानी सरदार घराण्यांत त्यांचा जन्म झालेला होता; पण, कांहीं प्रसंगामुळें ४०।४२ वर्षांपूर्वी दक्षिण सोडून त्या कलकत्ता येथें स्थायिक झाल्या होत्या. या बाई संन्यस्त वृत्तीनें रहात आणि लोकसेवेचें एक साधन म्हणून वरील संस्था चालवीत. संस्था पाहिल्यावर सर्व मंडळी खाजगी दिवाणखान्यांत येऊन बसली; तेव्हां माताजी टिळकांना शुद्ध मराठींत म्हणाल्या : बळवंतरावजी, मी आज खरोखर कित्येक वर्षांनीं आपल्या माहेरघरीं आलें आहे असें मला वाटत आहे. आजचा माझ्या मातृभाषेंत बोलण्याचा प्रसंगहि मला फार वर्षांनीं लाभला आहे. तुमच्या भेटीनें माझ्या पूर्वआयुष्यांतील सर्व प्रसंग किती ताजे असे माझेपुढें उभे राहिले आहेत, हें मी काय सांगूं ! * ”

अणेप्रभृति तरुणांना कबूल केल्याप्रमाणें, कलकत्त्याहून परत येतांना टिळक नागपुरास उतरले. प्रि. ताम्हन यांच्या अध्यक्षतेखालीं सभा होऊन राजाराम नाटकगृहांत त्यांना मानपत्र देण्यांत आलें. 'भगवद्‌गीता' या विषयावर त्यांनीं या प्रसंगीं जें व्याख्यान दिलें त्यांत गीता-रहस्यांतील सिद्धांताचें त्यांनीं विवेचन केलें. टिळकांचें आदरातिथ्य करणारे श्रीमंत गोपाळराव बूटी यांनीं आपल्या निवासस्थानीं एका प्रसिद्ध गवयाचें गाणें केलें. टिळक बैठकींत बसले होते; पण गाण्यांत त्यांचें लक्ष नव्हतें. तेव्हां एका वृद्ध गृहस्थानें त्यांना म्हटलें : महाराज ! आपणांला गाण्याची फारशी अभिरुचि दिसत नाहीं ! एवढीच कला आपल्या हातून हस्तगत व्हावयाची कशी राहिली ! यावर टिळक म्हणाले : **भगवंताच्या मुखानें गाइलेलें गाणें (भगवद्‌गीत) ऐकल्यामुळें मानवगीत रुचेनासें झालें. अमृत प्यायला मिळाल्यानंतर थंडगार सरबत पिण्याची इच्छा होत† नाहीं !** गवई होते ते नुसते कलावंत नव्हते, चांगले मार्मिक होते. चालू असलेली चीज संपतांच त्यांनीं तंबोरा खालीं ठेविला आणि टिळकांच्या चरणांवर आपलें मस्तक ठेविलें !

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ४२२-२५.

† आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. १५.

या सुमारास राजकारणाला जे व्यापक स्वरूप येऊं लागलें होतें तें व्यक्त करण्यास 'केसरी'ची जागा अपुरी पडते ही जाणीव टिळकांना होऊं लागली होती. म्हणून दि. ११-२-१९०२ च्या अंकापासून त्यांनी केसरीचा आकार वाढविला. जपानच्या वाढत्या सत्तेचा भावी राजकारणावर काय परिणाम होईल यविषयींचे विचार टिळकांच्या मनांत या सुमारास घोळत होते आणि शिक्षणाच्या वगैरे निमित्तानें जपानांत माणसें धाडण्याच्या उद्योगाला ते लागलेले होते. ब्रिटिशांच्या साम्राज्याचा पापटपसारा, ब्रिटिशांशीं स्पर्धा करूं पहाणाऱ्या सत्तांचा उदय, पादाक्रांत देशांमधून होत असलेली जागृति या सर्वांचा विचार करून, हिंदुस्थानच्या भावी राजकारणाचें धोरण ठरविलें पाहिजे, अशा विचारांत टिळकांचें मन या वेळी गढून गेलें होतें. भोंवतालीं घडणाऱ्या या घटनांपासून भारतीय नेत्यांनीं असा बोध घेतला पाहिजे त्याप्रमाणेंच भरतखंडावर राज्य करणाऱ्या इंग्रजांनीहि त्यापासून बोध घेतला पाहिजे असें टिळकांचें मत होतें. टिळकांनी केसरींत या सुमारास लिहिलेले कांहीं लेख या दृष्टीनें वाचले म्हणजे टिळकांच्या दृष्टीचा व्याप नि सखोलपणा यांची कल्पना येतें. 'अनावर राज्यविस्तार*', 'हिंदुस्थानची अंतर्व्यवस्था†' 'पूर्वेकडील लोकांचें विचारैक्य‡', 'आशियासंबंधीच कारस्थानें¶' 'साम्राज्याची घटना§' वगैरे लेख या दृष्टीनें विशेष वाचनीय आहेत.

ॲस्टनपुढील अर्जाचें काम रेंगाळत चाललें होतें. टिळकांविरुद्ध सबळ पुरावा मिळण्यासारखा नसल्यामुळें, विरोधी पक्षाकडून बनावट पुरावा तयार करण्याचे उद्योग चालू होते आणि असल्या पुराव्याचा बोजवारा उडविण्यासाठी बचावपक्षाचे उद्योग टिळकांतर्फेहि चालले होते. ताईमहाराजांचें खरेखोटें आजारपण, त्यांच्या प्रतिष्ठेमुळे त्यांची सोय पहाण्याची जरूरी, इत्यादि कारणांमुळें चौकशीचें काम लांबत होतेंच; पण, हें काम शक्य तितक्या संथपणानें चालविणाऱ्यांच्या मनांत आणखीहि एक हेतु होता. आर्थिक मारामारीनें टिळकांना जिकिरीस आणावयाचें अशा हेतूनें सगळ्या कारवाया चालल्या होत्या. अखेरीस, दि. २-४-१९०२ रोजी ॲस्टनसाहेबानें निकाल दिला. त्यानें टिळक-

* केसरी : २५-२-०२. † केसरी : ४-३-०२. ‡ केसरी : २८-४-०२.
¶ केसरी : २६-५-०२. § केसरी : ६-६-०२ व १६-६-०२.

प्रभृति ट्रस्टींचें अधिकारपत्र तर रद्द केलेंच; शिवाय, टिळकांच्या हातून फौजदारी स्वरूपाचे अनेक गुन्हे झाले असावे असा शेरा मारून, त्यानें सर्व प्रकरण पुण्याच्या सिटी मॅजिस्ट्रेटकडे पाठवून दिलें. दि. १७-४-१९०२ रोजीं टिळकांनीं अॅस्टनच्या निकालाविरुद्ध हायकोर्टांत अपील दाखल केलें, अॅस्टननें ज्या फौजदारी गुन्ह्यांबाबत संशय व्यक्त केला होता त्यांत कितीसें तथ्य आहे हें पहाण्याच्या दृष्टीनें गुप्त पोलीसचौकशी सुरू झाली. ही चौकशी पुढें दोनतीन महिने चालू होती.

या प्रकारामुळें टिळकांचें मन व्यग्र झालें होतें; पण, त्यांचे उद्योग मात्र थांबले नव्हते. नित्याच्या राजकीय कामाव्यतिरिक्त इतरहि उद्योग त्यांनीं सुरूच ठेविले होते. या वर्षीच्या उन्हाळ्यांत उत्तर हिंदुस्थानांतले हंसस्वरूप या नांवाचे स्वामी पुण्यांत आले होते. त्यांचीं प्रवचनें पुण्यांत फार लोकप्रिय झालीं. या स्वामींचा जाहीर सत्कार करण्याच्या कामीं टिळकांनीं पुढाकार घेतला होता. ४ जुलै १९०२ रोजीं स्वामी विवेकानंद यांनीं आपलें अवतार-कार्य संपविलें. त्या निमित्तानें टिळकांनीं 'केसरी'त एक अत्यंत मार्मिक लेख लिहिला. विवेकानंदांच्या कार्याचें श्रीमत् शंकराचार्यांच्या कार्याशीं असलेलें साम्य सुचवितांना टिळकांनीं पुढील वाक्य लिहिलें*:

हिंदुधर्माचें उज्ज्वल स्वरूप कोणतें, असा प्रकारचा धर्म आमच्या देशांत झाला हेंच आमचें अमूल्य धन व बळ आणि त्याचा सर्व जगभर प्रसार करणें हेंच आमचें खरें कर्तव्य असें बोलणारे नव्हे तर जगांत सिद्ध करून दाखविणारे सत्पुरुष हजार-बाराशें वर्षांपूर्वी एक शंकराचार्य होऊन गेले व एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस दुसरे स्वामी विवेकानंद झाले !

जुलै महिन्यांत सार्वजनिक सभेंत अकोल्याचे रा. सा. विष्णु मोरेश्वर महाजनी यांचें व्याख्यान झालें. व्याख्यानाला टिळक व गोखले दोघेहि हजर होते. या प्रसंगीं घडलेली पुढील मनोरंजक हकीकत† प्रसिद्ध झालेली आहे;

व्याख्यान सुरू होण्यापूर्वी टिळकच प्रथम बोलावयास उठले व त्यांनीं

* लो. टिळकांचे केसरींतील लेख: भाग ४: पृष्ठ ३३०

† आठवणी व आख्यायिका: खंड १: भाग १: पृष्ठ ९६

ना. गोखले यांसच अध्यक्ष होण्याबद्दल विनंति केली. ना. गोखले हे आपणांस अध्यक्षस्थान नको म्हणत व टिळक हे आग्रहपूर्वक त्यांना तें स्वीकारण्याविषयीं विनंति करीत. हा देखावा पाहून तेथें जमलेल्या दोनहि पक्षांतील लोकांस जो आनंद झाला तो विलक्षण!

' ॲस्टनसाहेबाच्या निकालाविरुद्ध टिळकांनीं हायकोर्टाकडे अपील केलें होतें त्याचा निकाल १९-८-१९०२ रोजीं लागला. ॲस्टनसाहेबाला चपराक बसून ट्रस्टींचे अधिकार कायम झाले, पण, या सुमारास टिळकांविरुद्ध फौजदारी करण्याचा सरकारचा विचार पक्का झाला होता. ८-९-१९०२ रोजीं सिटी मॅजिस्ट्रेटकडून या प्रकरणाबाबतचे कागदपत्र स्पेशल मॅजिस्ट्रेट मि. क्लेमंट्स यांच्याकडे रवाना झाले. १५-९ पासून क्लेमंट्ससाहेब रीतसर या कामावर नियुक्त झाले आणि २-१०-१९०२ पासून या फौजदारी खटल्याला प्रत्यक्ष प्रारंभ झाला.

या तापदायक खटल्याचें काम चालू असतांनाच पुण्यांत प्लेग झाल्यामुळे टिळक आपल्या मुलामाणसांसह गांवाबाहेर रहावयास गेले होते. या वर्षीच्या प्लेगनें टिळकांच्या खुद्द घरांत पुष्कळच धुमाकूळ घातला. टिळकांचा एक पुतण्या-भाऊ व एक भाचा यांना या वर्षीच्या प्लेगानें उचलिलें! पण, या सर्वांपेक्षां टिळकांच्या दृष्टीनें अधिक महत्त्वाचा बळी म्हणजे खुद्द त्यांच्या मुलाचा! १-२-१९०३ रोजीं टिळकांचे थोरले चिरंजीव विश्वनाथपंत हे या संहारक सांथीला बळी पडले. घरीं हा प्रसंग ओढवला असतांनाहि, टिळकांना आपलीं सर्व कामें नित्याप्रमाणें चालू ठेवावीं लागलीं! या प्रसंगींहि टिळक कोणत्या वृत्तीनें आपलीं कर्तव्यें करीत असत याचें प्रसिद्ध झालेलें वर्णन अत्यंत हृदयद्रावक आहे. टिळकांचे त्या वेळचे एक लेखक श्री. आप्पाजी विष्णु कुलकर्णी हे या प्रसंगासंबंधानें लिहितांना म्हणतात* :

विश्वनाथपंत वारल्यावर पुढें दुसरे दिवशीं सोमवार आला...ज्या झोपडींत विश्वनाथपंत वारले त्या झोपडीपासून दहापाच पावलांवर टिळकांची झोपडी होती...जिकडेतिकडे औदासिन्य पसरल्याचा देखावा दिसत होता. अशा स्थितींत कोणासहि काम सुचणें शक्य नव्हतें; पण, टिळक यांनी त्या दिवशीं

* आठवणी व आख्यायिका : खं. १ : भा. १ : पृ. ९७-९८.

नेटिव्ह संस्थानिकांबरोबर इंग्रज सरकारच्या झालेल्या तहनाम्यांची व करारांची पुस्तकें आणवून तीं वाचलीं व केसरींतील 'श्री. महाराज होळकर यांचा राजिनामा मंजूर झाला' हा अग्रलेख मला तोंडानें सांगितला... लिहिण्याचें काम चाललें होतें. तिकडे झोपडींत बापूला ताप आला आहे अशी कुजबूज सुरू झाली व रामभाऊ म्हणाला, मी दादांना सांगतो. आमचें लिहिणें चालू असल्यामुळे 'आतां नको सांगू' असें टिळकांच्या कुटुंबानें सांगितलें. हें सर्व भाषण मला ऐकूं येत होतें व टिळकांनींहि पण! ऐकलें असेल. पण, मजकूर सांगण्यांत त्यांचें चित्त वेधून गेलें होतें. मजकूर संपत आला म्हणून मीहि बोललों नाहीं. नंतर मजकूर संपल्यावर रामभाऊनें 'बापूस ताप आला आहे' असें येऊन सांगितलें...रामभाऊचे शब्द कानीं पडतांच बापूला पहाण्यास जाण्याची त्यांची प्रवृत्ति व्हावी; पण, आश्चर्याची गोष्ट ही कीं, यत्किंचितहि न घाबरतां व घाई न करतां, मीं लिहिलेला सर्व मजकूर...त्यांनीं वाचला व त्यांत दुरुस्ती करून मग तो छापावयास पाठविला.

या सुमारास धोंडोपंत विद्वांस कोंकणांत गेलेले असल्यामुळें केसरीच्या व्यवस्थेच्या बारीकसारीक कटकटींतहि टिळकांना लक्ष घालावें लागे. प्लेगमुळें छापखान्यांतील 'जुळणीस' कमी झाले आहेत अशी तक्रार टिळकांच्या कानीं आली आणि धडपड करून आपणच पुरेसे जुळणीस मिळविले नाहींत तर केसरीचा अंक वेळेवर निघणार नाहीं असा संभव दिसूं लागला. या वेळीं टिळक प्रथम 'आर्यभूषण' छापखान्याच्या व्यवस्थापकांवर कडाडले. केसरी नियमित निघाला पाहिजे याविषयीं त्यांचा किती कटाक्ष असे हें समजण्याच्या दृष्टीनें त्यांचे या वेळचे उद्गार* संस्मरणीय आहेत. "**तुम्ही आर्यभूषणचे मालक व मी केसरीचा 'एडिटर' दोघेहि वारलों तरी आमच्या चौदा दिवसपर्यंत 'केसरी' मंगळवारचा मंगळवारींच पोस्टांत पडला पाहिजे,**" हे उद्गार काढून टिळक उठले, गुडघा दुखत होता तरी तसेच चालत गांवांत गेले आणि पांचचार छापखान्यांच्या व्यवस्थापकांना भेटून त्यांनीं पुरेसे जुळणीस मिळविले. विश्वनाथपंतांच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसांनीं टिळकांचे जामात श्री. केतकर हे समाचारासाठीं गेले असतांना टिळक म्हणाले :

* आठवणी व आख्यायिका : खं २ : पृ. ५३५

अहो! गावची होळी पेटल्यावर प्रत्येक घरच्या गोवऱ्या जाव्या लागतात त्याप्रमाणेंच झालें! पुत्रवियोगानंतर थोड्याच दिवसांनी टिळक मुलामाणसांसह सिंहगडावर जाऊन राहिले. पण, ग्रेमेंदस पुढील खटल्याचें काम चाललेलें असल्यामुळे त्यांना वारंवार पुण्यास येऊन जावें लागे.

या खटल्याच्या कामांत टिळकांनी आपल्या तर्फेचे साक्षीदार तपासण्यासाठी कमिशन मागून घेतलें. या कमिशनच्या कामाच्या निमित्ताने ते या वर्षीच्या उन्हाळ्यांत उमरावती व औरंगाबाद या भागांत गेले होते. उमरावती येथे टिळकांचा मुक्काम होता त्या अवधीत तेथील विद्यार्थ्यांनी टिळकांना पान सुपारी केली व मानपत्र दिलें. लोकमान्यांचा मुक्काम उमरावतीस आहे ही वार्ता आसपासच्या जिल्ह्यांतून पसरल्यामुळे अनेक शेतकरी टिळकांच्या दर्शनासाठी येत असत. शेतकरीवर्गाबद्दल टिळकांना काय वाटत असे हें त्यांनी या प्रसंगी एका स्वयंसेवकाजवळ काढलेल्या उद्गारावरून स्पष्ट होत आहे. टिळक म्हणाले*: हिंदुस्थानांत शेतकरी हा राष्ट्राचा आत्मा आहे. त्याच्यावरील मालिन्याचा पडदा जर दूर सारता आला तरच हिंदुस्थानचा उद्धार होईल. याकरितां शेतकरी आपला व आपण शेतकऱ्याचे असें आपणास वाटावयाला हवें.

टिळक उमरावतीहून पुण्यास परत आले त्या सुमारास ग्रेमेंदसाहेबापुढील खटल्याचे काम बहुतेक आटपत आलें होतें, आणि टिळकांतर्फे 'डिफेन्स' तयार करण्याची वेळ आलेली होती. या खटल्यांत टिळकांच्या वतीनें श्री. दादासाहेब करंदीकर यांनी बहुतेक सर्व काम चालविलें व कोर्टांतील 'डिफेन्स'चें भाषण त्यांनींच २०-७-१९०१ पासून १-८-१९०१ पर्यंत केलें. पण हें भाषण तयार करण्याचे काम स्वतः टिळकांनींच केलें होतें. पुण्याचे सुप्रसिद्ध श्री. दत्तर श्रीकृष्ण देव व गुलसखळे वकील श्री. गोपाळराव घोरपडे यांना अर्ध्यावाळीने मजूर लावून टिळकांनी स्वतः 'डिफेन्स' तयार केला. हें काम बरेच दिवस अहोरात्र चाललें होतें.†

या खटल्याचा निकाल लागून टिळकांवर कांहीं नवें संकट ओढवणार तो

---

* आठवणी व आख्यायिका : ख. २ पृ. ९८

† आठवणी व आख्यायिका ख. २ : पृ. ११०

सुमारासच टिळकांवर आणखी एक प्रसंग ओढवला. पुण्यांतील एक विद्वान् प्रो. जिन्सीवाले हे १८-८-०३ रोजीं मृत्यु पावले. मय्यासाहेब व टिळक यांच्या मतांत व आचारांत कांहीं फरक होता; पण, दोघांचें परस्परांविषयींचें प्रेम निर्व्याज होतें. त्यामुळें, मय्यासाहेबांच्या मृत्यूनें आपली कौटुंबिक हानि झाली, असें टिळकांना वाटलें. प्रो. जिन्सीवाले याच्या चरित्रापासून व चारित्र्यापासून तरुणांनीं काय शिकावें हें सांगत असतां, टिळकांनीं पुढील वाक्यें* लिहिलीं आहेत :

**मी हिंदु आहें, हिंदु राहीन, हिंदु मरेन आणि हिंदुत्वानेंच आपला अभ्युदय केव्हां ना केव्हां तरी संपादन करीन असा त्यांचा पूर्ण विश्वास होता आणि तो विश्वास बदलण्यास पाश्चिमात्य शिक्षणाची सबब इतर सुशिक्षित पुढें आणतात ती खरी नाहीं, असें त्यांनीं आपल्या आचरणावरून सिद्ध केलें होतें. प्रो. जिन्सीवाले यांच्या चरित्रापासून तरुण मंडळीनें जर कांहीं विशेष बोध घ्यावयाचा असेल, तर हाच होय.**

२४-८-१९०३ रोजीं क्रेमंट्ससाहेबानें टिळकावरील खटल्याचा निकाल सांगितला आणि त्यानें टिळकांना दीडवर्ष सक्तमजुरी व एक हजार रुपये दंड, अशी शिक्षा ठोठावली! टिळकांना शिक्षा होणार ही गोष्ट लोकांना कळली होती. सरकारनें कोर्टाच्या आवाराबाहेर घोडेस्वार व आवारांत सशस्त्र पोलीस आणून ठेविले होते. शिक्षा सांगितल्याबरोबर टिळकांची येरवड्यास रवानगी व्हावी अशी सर्व सिद्धता आगाऊच करून ठेवण्यांत आली होती. असें असलें तरी, टिळकांना तुरुंगांत नेतांना त्यांना हातकड्या घालण्यांत येतील असें मात्र कोणासच वाटलें नव्हतें! पण सरकारी अधिकाऱ्यांनीं त्या दिवशीं आपली ही देखील हौस भागवून घेतली! याबद्दल वर्तमानपत्रांनीं नापसंती व्यक्त केली. टिळकांना शिक्षा झाली त्याच दिवशीं पुण्याचे सेशन्स जज्ज मि. ल्यूकस यांनीं त्यांच्या तर्फेचें अपील दाखल करून घेतल्यामुळें, सुमारें प्रहरभर तुरुंगांत काढल्यावर टिळक घरीं परत आले.

या अपिलाचें काम ऑक्टोबर महिन्यांत सुरू झालें. तत्पूर्वींच—म्हणजे या

---

* लो. टिळकांचे केसरींतील लेख : भा. ४ : पृ. ३४५.

वर्षांच्या सप्टेंबर महिन्यांत—बाईमहाराज मरण पावल्या, ही या सर्व प्रकरणांतील एक विचित्र विधिघटना होय. या बाई टिळकांप्रमाणेंच हट्टी व करारी होत्या आणि तोडीस तोड म्हणूनच त्यांनी टिळकांशी मरेपर्यंत वैर चालविलें असें कित्येकांकडून म्हणण्यांत येतें. पण, वैराच्या नादीं लागून या बाईंनीं स्वतःच्या अब्रूलाहि कमीपणा आणला याचें समर्थन कसें होणार! या बाईच्या अब्रूचा चव्हाटाच टिळकांना करावयाचा असता तर तो करण्याला अवश्य असणारा पुरावा त्यांच्या हातीं होता, असें म्हणतात. हा पुरावा पुढें आणून टिळकांनीं आपल्या मागची सारी कटकट थांबवावी असें त्यांना सुचविण्यातहि आलें होतें; पण, थोर कुळांतल्या एका स्त्रीची अब्रू संभाळतांना स्वतःला कितीहि मानसिक वा शारीरिक कष्ट पडले तरी ते पत्करले, असें सांगून टिळकांनीं या सूचनेचा अव्हेर केला होता!

ल्यूकससाहेबापुढें करण्यांत आलेल्या अपिलाचा निकाल दि. ४-१-१९०४ रोजीं सांगण्यांत आला. टिळकांना झालेली दीड वर्षांची शिक्षा कमी होऊन ती सहा महिन्यांवर आली; पण, त्यामुळें त्यांच्यावर करण्यांत आलेल्या गलिच्छ आरोपांपैकीं कांहींचें गालबोट निष्कारण टिळक उरलें! म्हणून या निकालाविरुद्ध हायकोर्टाकडे अपील करण्यांत आलें. हें अपील दाखल होऊन टिळकांचा जामीनअर्ज मंजूर होईपर्यंत जे तीनचार दिवस गेले त्या अवधींत टिळकांना फिरून तुरुंगांत रहावें लागलें. ३-३-१९०४ रोजीं मुंबई हायकोर्टाचे न्यायमूर्ति जेंकिन्स व बेटी यांनीं टिळकांना सर्व आरोपांतून मुक्त केलें. दोन अडीच वर्षेपर्यंत टिळकांच्या मागें लागलेली ही साडेसाती अशा रीतीनें संपली. त्यामुळें टिळकांच्या अभिमान्यांना जसा आनंद वाटला त्याप्रमाणेंच खुद्द टिळकांनाहि आपला— म्हणजे सत्पक्षाचा— अखेरीस जय झाल्याबद्दल अभिमानच वाटला. हा सार्वजनिक आनंद प्रगट करण्यासाठीं दि. २२-३-१९०४ रोजीं रे मार्केटच्या पटांगणांत महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांच्या अध्यक्षते- खालीं सभा भरविण्यांत आली होती.

१८९७ च्या कारावासांतून मुक्त झाल्यावर टिळकांनीं 'पुनश्च हरिः ॐ' म्हणून आपल्या जीवितकार्याला सुरवात केली होती. एका दृष्टीनें आगंतुक अशा या दत्तक प्रकरणानें त्यांना २॥-३ वर्षे छळल्यामुळें, त्यांच्या राजकारणी खटाटोपांना कांहीं अंशीं पायबंद बसला; पण, या खटल्याचें खाजगी स्वरूप

प्रायः नष्टच झालें असल्यामुळे, या खटल्यांतील लढतीलाहि राजकीय लढती-चेंच स्वरूप आलें होतें. टिळकांनीं सुरू केलेली राजकारणी लढत जशी त्यांच्या मरणापर्यंत चालूच राहिली, तद्वतच, या दत्तक प्रकरणाची लढतहि त्यांना अखेरपर्यंत पुरली. मात्र, या लढतींतला यापुढील भाग पुष्कळसा मामुली स्वरूप धारण करून चालला!

---

## पर्व आठवें : : : क्रांतिप्रवाहांतून मार्गदर्शन

राजनीति पहिल्यानें स्वार्थास ओळखते; आणि मग तर्क-शास्त्र तदनुकूल असेल तर त्याकडे वळते.

—टिळक

राजद्रोहाच्या खटल्यांतील शिक्षा भोगून टिळक बाहेर आले त्या सुमारास लॉर्ड कर्झन यांची हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल म्हणून नेमणूक झाली. ही नेमणूक मोठी सूचक होती. दीर्घकालपर्यंत आततेचा उपयोग घेता आल्यामुळें इंग्लंडची साम्राज्यसत्ता स्थिरावली होती. या साम्राज्याचें वैभव अन्य राष्ट्रांच्या डोळ्यांत सलू लागलें होतें; आणि त्या वैभवाला खड पडूं नये यासाठीं ब्रिटिश मुत्सद्द्यांची धडपड सुरू झाली होती. १८७७ सालीं इंग्लंडच्या राणीनें आपल्या बिरुदावलींत भरतखंडाची सम्राज्ञी हे शब्द योजिले. इंग्लंडच्या साम्राज्यवैभवात हिंदुस्थानचें महत्त्व पहिल्या प्रतीचें आहे, असा या योजनेचा अर्थ होता. यापुढील वीसपंचवीस वर्षांत ब्रिटिशांची सत्ता चारी खंडांत पसरत गेली होती आणि युरोपिअन राष्ट्रांमध्यें सत्ताकेंद्रे निर्माण करण्याची स्पर्धा सुरू झाली होती. मागासलेल्या, दुबळ्या व पादाक्रांत समाजांना पुढें येण्याला नि स्वतंत्र होण्याला अशी स्पर्धाच उपयोगी पडत असल्यामुळें, दुबळ्या आणि दलित राष्ट्रांत एकोणिसाव्या शतकाचे शेवटीं नव्या विचाराचे वारे वाहूं लागले होते. १८९९ मध्यें बोअर युद्ध सुरू झालें तें या क्रांतीचेंच सूचक होतें.

या क्रांतीची बाधा हिंदुस्थानांतल्या आपल्या सत्तेला होऊं नये अशी ब्रिटिश मुत्सद्द्यांची तीव्र इच्छा होती. या क्रांतीचा राष्ट्रप्रगतीला उपयोग व्हावा ही इच्छा टिळकांच्या मनांत उदय पावली. सत्तेचें केंद्रीकरण करण्याचें कर्झनचें धोरण आणि त्या धोरणाला टिळकांनीं दिलेले तडाखे यांचा खरा अर्थ कळण्यासाठीं ही भूमिका लक्षांत ठेविली पाहिजे.

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस इंग्लंडच्या साम्राज्यसत्तेला बरेच प्रतिस्पर्धी निर्माण झाले होते. युरोप आणि आशिया या खंडांना व्यापणारा आणि अनेक समुद्रांना भिडलेला रशिया हा एक जबरदस्त प्रतिस्पर्धी होता. अतिपूर्वेकडे आपले पाय पसरणारा फ्रान्स हा दुसरा प्रतिस्पर्धी होता. पाश्चिमात्य राष्ट्रांच्या पायाशीं शिष्यत्वाच्या नात्यानें बसणारा जपानहि हळूहळू पुढें येत होता. दूरदृष्टीनें पहाणाऱ्याला त्याच्या भावी सामर्थ्याची कल्पना करितां येत होती. चोहोंबाजूंनीं प्रतिस्पर्धी निर्माण होण्याचीं लक्षणें दिसूं लागतांच, इंग्लंडनें आपल्या हिंदुस्थानांतील साम्राज्याच्या सरहद्दी वाढविण्याला नि बळकट करण्याला सुरवात केली. यामुळें हिंदुस्थानचा लष्करी खर्च दरसाल वाढूं लागला. टिळकांनीं कर्झनच्या धोरणांतील अनेक दोष सडेतोडपणानें दाखविले. कर्झनचें चुकीचें लष्करी धोरण हा दोष त्यांत प्रमुख होता.

सत्तेचें केंद्रीकरण करून साम्राज्यसत्ता स्थिरावूं पहाणाऱ्या कर्झननें १८९९ सालीं स्थानिक स्वराज्यसंस्थांच्या स्वातंत्र्याला आळा घालण्याचा प्रयत्न केला. यासंबंधीं लिहितांना टिळकांनीं जें एक सूचक वाक्य* लिहिलें त्यांत कर्झन-शाहीच्या सगळ्या दोषांचें सार आहे. "कैलासावरीलच सर्व कडपाळ फिरून गेलें आहे; आणि त्यामुळें पूर्वी जेथें फुलांची वृष्टि होत होती तेथें गोवऱ्यांची वृष्टि होण्याचा प्रसंग आलेला आहे," असें लिहून टिळकांनीं यापुढील काळांत प्रत्येक क्षेत्रात सरकार आपलें घोडें दिरकवणार याची जणूं सूचनाच दिली. आपण आपल्या कारकीर्दीत पांच महत्कृत्यें करणार असा पुकारा कर्झननें केला; तेव्हां टिळकांनीं कर्झनशाहीची जणूं कुंडलीच वर्तविली! साम्राज्याच्या दृष्टीनें तुमचीं कृत्यें कितीहि सोज्ज्वळ ठरलीं तरी प्रजेच्या दृष्टीनें तीं निरर्थकच ठरणार असें कर्झनला बजावतांना

---

* केसरी : १९-९-१८९९.

टिळकांनीं पुढील वाक्य* लिहिलें : **हिंदुस्थानच्या लष्करावर जास्त पैसा खर्च करणें,...सरहद्दीची नवीन व्यवस्था लावून नवे प्रांत करणें वगैरे कामें साम्राज्याच्या दृष्टीनें महत्त्वाचीं असतील;...पण, हिंदुस्थानांतील रयतेची स्थिति जर सुधारली नाहीं...तर इंग्रजी साम्राज्याच्या भरभराटींतहि हिंदुस्थानच्या रयतेस उपाशी मरण्याची पाळी येणार आहे किंवा आलेली आहे, म्हटलें तरी चालेल.**

प्रतिस्पर्धी निर्माण झाल्यामुळे ब्रिटिश साम्राज्याच्या सूत्रचालकापुढें जे नवेनवे प्रश्न उपस्थित झाले त्यांची चर्चा करण्याच्या निमित्तानें टिळकांनीं १९०१ पासून १९०४ पर्यंत जे लेख लिहिले ते अत्यंत श्रेष्ठ दर्जाचे आहेत. विशाल दृष्टि व गभीर विवेचन हे न्या. मू. रानडे यांच्या लेखनांतील उदात्त विशेष या लेखांत ठळकपणें आढळतात. 'राज्यकर्त्यांच्या दृष्टीनें काळ्या लोकांचें सैन्य, हिंदुस्थानांतील प्रजा आणि हिंदुस्थानांतील संस्थानिक किंवा जमीनदार ह्यांस गेल्या वीस वर्षांत बहुतेक पूर्णपणें निरुपद्रवी बनविण्यांत आलें आहे...राष्ट्राच्या दृष्टीनें ही स्थिति इष्ट नाहीं. सर्व सुरळीत व्यवहार चालला आहे तोंपर्यंत ठीक आहे; पण, युरोपांतील बलाढ्य राष्ट्रांमध्यें जी चढाओढ चाललेली आहे ती ज्या वेळीं निकरास येईल तेव्हा हिंदुस्थानचें इंग्लंडच्या गळ्यांतील ओझें इंग्लंडास असह्य नाहीं, तरी अडचणीचें झाल्या-खेरीज रहाणार नाहीं', या अवतरणात† टिळकांनीं व्यक्त केलेला विचार चाळीस वर्षांतहि कित्येकांना उमजलेला नाहीं. जपानच्या उत्कर्षाकडे टिळक अत्यंत आस्थेवाईकपणानें पहात. कर्झनच्या शिक्षणविषयक धोरणाचा समाचार घेताना जपाननें अल्प काळांत घडवून आणलेल्या सर्वांगीण शैक्षणिक प्रगतीचा उल्लेख टिळकांनीं वारंवार केलेला आहे. जपान, चीन व हिंदुस्थान यांच्या संबंधाविषयींची टिळकांची कल्पना स्पष्ट होती, हें पुढील अवतरणावरून‡ उघड होत आहे :

**आपण तिघेही एकाच पंख्याचे अवयव आहों. हिंदु हा या पंख्याच्या काड्या आहे; त्यावरून पसरलेला कागद चिनी हा आहे आणि जपानी हा पंख्याच्या काड्या सांधणारा खिळा आहे. चीन, जपान**

---

*केसरी : २-४-१९०१. †केसरी : ४-३-१९०२. ‡केसरी : २८-४-१९०३

व हिंदुस्थान यांचें ऐक्य या...रूपकापेक्षा अधिक चांगल्या रीतीनें व्यक्त करणें अशक्य आहे

हिंदी संस्थानिकांना निष्प्रभ करण्याचें आणि संस्थानिकांच्या ताब्यांतील मुलूख गडप करण्याचें कर्झनशाहींतलें धोरण कोठपर्यंत जाणार ही विवंचना टिळकांना सतत वाटत होती. काश्मीरकडे कर्झनची वक्रदृष्टि वळली तशीच ती नेपाळकडेहि वळते की काय, अशी शंका टिळकांना वाटत* होती. टिळक नेपाळकडे किती अभिमानानें पहात हें सांगणारी एक आख्यायिका प्रसिद्ध झालेली आहे. साताऱ्याचे छत्रपति श्रीमंत आपासाहेबमहाराज हे पुणें मुक्कामीं १९०४ मध्यें एप्रिलच्या आरंभीं परलोकवासी झाले. या प्रसंगीं टिळकांनीं छत्रपतींच्या योग्यतेप्रमाणें पुढील सर्व व्यवस्था व्हावी यासाठीं अतोनात श्रम केले. आपासाहेबमहाराज व टिळक यांचा १८९६-९७ सालापासून चांगला परिचय होता. आपासाहेबमहाराजांचे चिरंजीव श्रीमंत भाऊसाहेब यांचा विवाह नेपाळच्या राजकन्येशीं व्हावा यासाठीं टिळकांनीं कशी खटपट चालविली होती हें पुढील अवतरणांत स्पष्ट झालेलें आहे :

आपासाहेबमहाराज असतांना त्यांचे चिरंजीव भाऊसाहेब महाराज यांचें लग्न करावयाचें ठरलें...सामान्य व साधारण प्रतीच्या एखाद्या घराण्याशीं हा संबंध घडावा हें टिळकांना पसंत नव्हतें... म्हणून नेपाळ संस्थानचे आदिराजे यांची कन्या भाऊसाहेबमहाराजांस करावी म्हणून त्यांनीं फार खटपट केली. आदिराजे यांच्या कोणी गंगामाता म्हणून गुरु होत्या. त्यांनीहि हा संबंध अवश्य घडवून आणावा म्हणून सल्ला दिली. परंतु अखेर हा संबंध घडून आला नाहीं.

इंग्लंडची साम्राज्यशाही व तिचे प्रतिस्पर्धी यांच्या साठमारीत हिंदुस्थानचें काहीं साधावयाचें असेल तर, हिंदी नेत्यांनीं अनेक खटपटी केल्या पाहिजेत, असें समजणाऱ्या टिळकांनीं नेपाळमध्यें आपलें ठाणेंहि घातलें होतें†. ब्रिटिश हिंदुस्थानांत दुर्लभ अशी काहीं विद्या हस्तगत करण्यासाठीं टिळकांनीं

* केसरी, २५-२-१९०२

† आठवणी व आख्यायिका : खं. २ पृ. १००.

आपले सहकारी श्री. कृ. प्र खाडिलकर यांना १९०२ च्या सुमारास नेपाळमध्यें धाडिलें होतें. खाडिलकरांनीं नेपाळांत स्वदेशी कौलाचा कारखाना काढून तेथील राजवाड्याकरितां कौलें तयार करून दिलीं अशी माहिती प्रसिद्ध झालेली* आढळते! कौलें करण्याची विद्या ब्रिटिश हिंदुस्थानांत दुर्लभ होती कीं काय?

एडवर्ड बादशहा राज्यावर बसले ही गोष्ट जाहीर करण्याकरतां कर्झननें १९०३ च्या आरंभीं दिल्लीस दरबार भरविला व राजघराण्यांतील पुरुषापेक्षांहि आपला दर्जा श्रेष्ठ आहे ही गोष्ट त्यानें हिंदुस्थानांतल्या राजेरजवाड्यांच्या निदर्शनास आणून दिली. खानदानीचे लोक, सुशिक्षित लोक, कर देणारे गरीबगुरीब प्रजाजन अशा सगळ्यांना कस्पटासमान लेखणारा कर्झन कांग्रेसच्या मागण्यांना धुडकावीत असला तरी, भोंवतालची अनुकूल स्थिति लक्षांत घेऊन कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनीं याच वेळीं चळवळ सातत्यानें चालू ठेवण्याची योजना आंखली पाहिजे हें बजावतांना, "टिळकांनीं पुढील उताऱ्यांत† कर्झनच्या अनेक पापांचा पाढाच वाचला आहे :

आज तिबेटांत तर उद्यां इराणांत आणि परवां अफगाणिस्थानांत, याप्रमाणें एकसारखी पुंडाई चालू आहे. हिंदी लोकांस वरिष्ठ जागा न मिळण्याचा बंदोबस्त चालला आहे... ऑफीशियल सीक्रेट ॲक्टानें नेटिव वर्तमानपत्रांचीं तोंडें आवळलीं आहेत. युनिव्हर्सिट्या सरकारी अधिकाऱ्यांच्या ताब्यांत जाऊन वरिष्ठ शिक्षणाच्या प्रसारास धक्का बसला आहे... आणि एतद्देशीय राजे व संस्थानिक यांजवरहि करांचें व अपमानाचें ओझें लादण्यांत येत आहे.

टिळकांच्या मागें लागलेलें फौजदारीचें लचांड संपत आलें त्या सुमारास रुसो जपानी लढाई सुरू झाली व चिमुकला जपान विजयी होणार असा संभव दिसूं लागला. हा प्रसंग किती अर्थगर्भ आहे याचें स्पष्टीकरण करतांना टिळकांनीं पुढील वाक्यें‡ लिहिलीं आहेत : आशिया खंड म्हणजे युरोप खंडांतील लोकांनीं अंमल चालवून पादाक्रांत करण्याकरितां ईश्वरानें निर्मिलेला प्रदेश होय अशी जी आजपर्यंत समजूत होती ती जपानास मिळत असलेल्या जयामुळें आतां पहिल्यानेंच ढासळण्यास सुरवात झाली आहे आणि ही समजूत एकदां ढासळूं लागली म्हणजे तिचा

---

* केसरी : २०।१२।०४. † केसरी : ५।७।०४.

जपानासच नव्हे तर हिंदुस्थानासहि फायदा मिळाल्यावांचून राहणार नाहीं.

परदेशांत घडणाऱ्या इतरहि कित्येक घटना टिळकांना उत्साहवर्धक वाटल्या. १९०४ च्या सप्टेंबरांत ॲम्स्टरडॅमला झालेल्या समाजवाद्यांच्या मेळाव्यांत महर्षि दादाभाई नौरोजी सामील झाले नि अत्यंत निर्भीडपणें त्यांनीं भारतांतल्या ब्रिटिश राजवटीचें दोषाविष्करण केलें. रशियन प्रधान एम्. डी. प्लेह्वे यांचा या सुमारास क्रांतिकारकांनीं वध केला. आठवड्यांत घडलेल्या सर्व गोष्टी कदलीदलन्यायानें लोकांपुढें मांडणारे मा. शि. म. परांजपे यांनीं दि. २।८।०४ च्या 'काळ'पत्रांत 'येणेंप्रमाणें वरील अध्यायामध्यें एम्. डी. प्लेह्वे यांचें आख्यान समाप्त झालें; आतां आपण आपल्या कर्झनसाहेबांच्या आख्यानाकडे वळूं' असा मजकूर लिहिला. त्याच्या अर्थाचा विपर्यास करून अनेकांनीं काहूर माजविलें. 'काळ'पत्राला सावरून घेण्यासाठीं टिळकांनीं दि. २७।९।०४ च्या केसरींत 'मराठी आणि इंग्रजी काळ' हा लेख लिहिला नि त्यांत त्यांनीं पुढील ठणठणीत वाक्य लिहिलें :

टाइम्स किंवा इंग्रजी अधिकारी कांहींहि म्हणोत, आम्ही सरकारास स्पष्टपणें असें कळवितों कीं, कर्झनशाही आमच्या गळ्याभोंवतालच्या गुलामगिरीचा पाश अधिकाधिक दृढ करीत चालली आहे आणि...हें धोरण जर असेंच कायम राहिलें तर हिंडमन किंवा काळकर्ते म्हणतात त्याप्रमाणें परिणामीं ब्रि. साम्राज्यास तें अपायकारक झाल्यावांचून कधींहि राहणार नाहीं.

कॉंग्रेसची निष्क्रियता नाहींशी करण्यासाठीं टिळकांनीं या सुमारास केसरींत लिहिलेल्या लेखांचा विपर्यास होऊन, टिळक कॉंग्रेसला अपाय करीत आहेत अशी तक्रार इंग्लंडमध्यें असलेल्या दादाभाई नौरोजींकडे करण्यांत आली. यामुळें दादाभाईंनीं २-११-१९०४ रोजीं टिळकांना एक पत्र लिहिलें. या पत्रांतील उपदेश टिळकांनीं मानिला. या पत्रांत दादाभाई लिहितात* :

पुढील राजकारणाच्या क्षेत्रांत युद्ध करण्याचें राष्ट्रीय सभा हें एक आपलें शस्त्र झालें आहे. आज ती सर्वगुणपूर्ण नाहीं. पण, हळूहळू तिला आम्ही अधिक

* केळकरकृत टिळकचरित्र : उत्तरार्ध, खंड २ : भा. ४ : पृ. ८१.

बळकट करूं इच्छितों... जर ती एकदां निर्बल झाली व तिला इजा पोंचली तर याचीच दुरुस्ती करण्यास आम्हांस पुष्कळ काळ लागेल. सरकाराशीं भांडतांना आम्ही सर्व एकदिलाचे असावें पाहिजे...काँग्रेस आज मोडली तर तें हिंदुस्थानाला मोठें संकट व अँग्लो-इंडियन लोकांचा तो एक मोठा जय होईल.

काँग्रेसचे कार्य वर्षभर सतत करणारीं कांहीं माणसें नियुक्त झालीं पाहिजेत तरच आशिया खंडांतील जागृतीचा लाभ हिंदुस्थानाला होईल असें मत वेडरबर्न, सर हेन्री कॉटनप्रभृति हितचिंतकहि प्रतिपादूं लागले होते. त्यामुळें मुंबईच्या काँग्रेसच्या अधिवेशनांत कामाची कांहीं तरी योजना आंखली जाईल, असें टिळकांना वाटलें. यापूर्वीच्या दोन काँग्रेसअधिवेशनांना टिळक हजर राहूं शकले नव्हते; पण, सर हेन्री कॉटन यांच्या अध्यक्षतेखालीं १९०४ च्या अखेरीं मुंबईस झालेल्या काँग्रेसला ते उपस्थित होते. अधिवेशन चालू असतांना त्यांनीं वेडरबर्न-कॉटनप्रभृतींची भेट घेतली. 'काँग्रेसला कार्योन्मुख करा, नाहीं तर काँग्रेसचा तमाशा बंद करा' या मताचा प्रचार टिळकांनीं केसरींतून केला असल्यामुळें, महाराष्ट्रांतून अधिवेशनाला पुरेसा पैसा मिळाला नव्हता. टिळकांचा शब्द लोक किती मानतात याचा हा पुरावाच होता. त्यामुळें काँग्रेसच्या अधिवेशनांत टिळकांच्या म्हणण्याला स्वाभाविकपणेंच महत्त्व आलें. टिळकांनीं काँग्रेसच्या मंडपांत प्रवेश केल्यावरोबर त्यांच्या नांवाचा जयजयकार करण्यांत आला. राष्ट्रीय सभेला व्यवस्थित घटना असावी या मताचा पुरस्कार टिळकांनीं केला. लाला लजपतराय हे याच मताचे होते. सर फेरोजशहा मेथा यांना घटना, सततचें कार्य वगैरे मानगडी नको होत्या. त्यामुळें त्यांचा व लालाजींचा या अधिवेशनांत तंटा झाला. शिष्टमंडळें पाठविणें वगैरे सनदशीर चळवळीचे उपाय तरी नेटानें व निकरानें चालविले पाहिजेत, असें टिळकांनीं या अधिवेशनांत सांगितलें.

हें अधिवेशन चालू असतांनाच टिळक इतर उद्योगांत गुंतले होते. सर्व हिंदुस्थानभर मान्य होईल असें शुद्ध व शास्त्रीय पंचांग तयार करण्याच्या प्रश्नाला या वर्षीच्या ऑगस्टपासून चालना मिळाली होती. या प्रश्नांत लक्ष घालणारी भिन्नभिन्न मतांची मंडळी मुंबईस जमली होती. या सर्वांचें म्हणणें पृथक्पणें ऐकून घेण्याची व या सर्वांच्या म्हणण्याचा मेळ घालण्याची

कामगिरी टिळकांनीं केली. पैसाफंडाची कल्पना गेल्या तीनचार वर्षांत लोकप्रिय झाली होती; आणि पैसाफंडाला कांहीं तरी व्यवस्थित रूप देण्याची जरुरी भासू लागली होती. मुंबईच्या या मुक्कामांत टिळकांनीं हेंहि कार्य केलें. हीं सर्व कामें करून, वसईच्या मंडळींच्या निमंत्रणावरून तेथें जाऊन, जानेवारीच्या मध्याच्या सुमारास टिळक पुण्यास परत आले.

हिंदी लोकांचा पाणउतारा करण्याची कोणतीहि संधि सोडावयाची नाहीं हा कर्झनशाहीचा बाणा होता; आणि अशा रीतीनें वागणाऱ्या कर्झनची शोभा करावयाची हा राष्ट्रीय वृत्तीच्या लोकांचा पण होता. यामुळें फेब्रुवारी महिन्यांत एक चांगलाच वाद निर्माण झाला. कलकत्ता विद्यापीठाच्या पदवीधरांना उपदेश करण्याच्या निमित्तानें कर्झननें खरें बोलण्याचा महिमा सांगितला. सुशिक्षित हिंदी लोक खोटें बोलतात, हा या उपदेशांतला गर्भित अर्थ होता. तो नेमका शोधून, 'अमृतबझार' पत्रिकेनें व 'केसरी'नें कर्झनसाहेबांची जी रेवडी उडविली ती हिंदी वृत्तपत्रांच्या इतिहासांत चिरस्मरणीय राहील. गव्हर्नर जनरल म्हणून हिंदुस्थानांत येण्यापूर्वी कर्झननें कोरिया वगैरे देशांत प्रवास केला होता. या प्रवासाचें कर्झनलिखित वृत्त प्रसिद्ध झालें होतें. मोठमोठ्यांच्या मनांत स्वतःविषयीं अनुकूल मत निर्माण व्हावें म्हणून या प्रवासांत कर्झननें बेछूटपणानें असत्य विधानें केलीं होतीं. यासंबंधींचीं अवतरणें देऊन पत्रिकेनें व केसरीनें सत्यभाषी कर्झनची चांगलीच हजेरी घेतली. कर्झनला आपल्या भाषणांत महाभारताचा उल्लेख करण्याची दुर्बुद्धि सुचली होती. या वर्मावर नेमकें बोट ठेवून टिळकांनीं कर्झनची जी फरफट काढली ती पुढील अवतरणांत* दिसून येत आहे :

लॉर्ड कर्झन म्हणतात कीं, 'महाभारतांत सत्याचा महिमा गायिला आहे; पण त्यास कांहीं अपवाद दिले आहेत. तेवढ्यावरून त्यांनीं असें विधान केलें आहे कीं, सत्याची किंमत पशियांतील लोकांपेक्षां युरोपियन लोकच जास्त ओळखतात. लॉर्ड कर्झन यास महाभारत कितपत कळत असेल याची वानवाच आहे. आणि कळलें असलें तरी, भारतांतील मधुर वचनांचा त्यांच्या अंतःकरणांत कटु परिपाक

*केसरी : २१-२-१९०५.

झाला आहे. सर्पाप्रमाणें दूध पिऊन ते गरळ ओकीत आहेत असें त्यांच्या हल्लींच्या उक्तींवरून उघड होतें.

१९०५ च्या उन्हाळ्यांत टिळक नाना फडणविसांच्या उत्सवासाठीं वेळास येथें गेले होते. या दौऱ्यांत त्यांनीं त्या मार्गांतल्या अनेक गांवांना भेट दिली. लाडघर येथें जाऊन आपल्या वृद्ध सासूबाईंचा परामर्ष घेण्याला व आशीर्वाद मिळविण्याला टिळक विसरले नाहींत. नानांच्या उत्सवाचे वेळीं इतर गोष्टी नेहमींप्रमाणें झाल्या. नानांच्या घराण्यांतील एका वृद्ध गृहस्थांशीं टिळक या वेळीं कसे वागले हें पाहण्यासारखें आहे. नानांचे वंशज हरी आप्पाजी भानू व त्यांची पत्नी अशीं उभयतां या वेळीं हयात होतीं. नानांच्या प्रतिमेची मिरवणूक रीतीप्रमाणें त्यांच्या घरीं गेली. तेव्हां टिळकांनीं हरी आप्पाजींना चरणस्पर्शपूर्वक साष्टांग नमस्कार केला. ते केवळ हरी आप्पाजी यांनाच भेटून स्वस्थ राहिले नाहींत; त्यांनीं नंतर त्यांच्या पत्नीच्या पायांवर डोकें ठेविलें. कालचक्राच्या फेऱ्यांत नानांच्या वंशजांना विपन्नस्थिति आली या विचारानें टिळकांचें अंतःकरण मळमळून आलें. आपल्यासारखे ऐतिहासिक परंपरेचे दुवे दृष्टीस पडणें आजकाल दुर्लभ झालें आहे, असे* उद्गार टिळकांनीं काढले.

हीं कामें व हे राजकारणी उद्योग चालू असतांनाच दत्तकप्रकरणीं लाविलेल्या दाव्याकडे टिळकांना लक्ष द्यावें लागत होतें. १९०४ च्या जुलै महिन्यांत या दाव्याच्या कामाची सुरवात झाली आणि १९०५ च्या जूनपासून वादी या नात्यानें टिळकांच्या साक्षीस सुरवात झाली. या खटल्याच्या कामाप्रमाणेंच टिळकांना 'केसरी' संस्थेचा योगक्षेम व सांसारिक कर्तव्यें यांच्याकडेहि लक्ष द्यावें लागत होतें. त्यांनीं आपल्या दुसऱ्या मुलीचें लग्न १९०२ सालीं केलें होतें. १९०५ च्या फेब्रुवारी महिन्यांत त्यांनीं आपल्या तिसऱ्या मुलीचेंहि लग्न उरकून घेतलें. या सुमारासच त्यांनीं केसरी-संस्थेसाठीं व स्वतःसाठीं गायकवाड-वाडा विकत घेतला. टिळक वकिली करीत नसले तरी, वकिली बारकावे काढण्यांत ते अत्यंत कुशल होते. या कौशल्याचा उपयोग रावांपासून रंकांपर्यंत हजारों लोकांना मोफत झालेला आहे. गायकवाड-वाड्याच्या खरेदीच्या वेळीं टिळकांनीं हें कौशल्य प्रकट केलें. वाड्याच्या

* आठवणी व आख्यायिका : खं. १ : भा २ : पृ. ४०-४१.

तील काहीं साहसी माणसें दखडे वगैरे घालतात हें बरें का, असा प्रश्न त्यांनीं टिळकांना विचारल्यावर, टिळकांनीं या प्रकारांविषयींची आपली नापसती व्यक्त केली होती आणि राजकीय प्रगतीच्या दृष्टीनें हे प्रकार निरुपयोगी आहेत असेंहि मत टिळकांनीं व्यक्त केलें होतें. **मानवी स्वभावांतील भेद आणि भिन्न प्रकृतीला जुळणारी मानवी मनाची भिन्न उत्क्रांति यांचा विचार करून मी या प्रकारांचा उघड निषेध करीत नाहीं, असेंहि टिळकांनीं या भेटींत* सांगितलें होतें.**

वंगभगाचा अपमान जिव्हारीं झोंबल्यामुळें बंगाली पुढारी हालचाल करूं लागतील; आणि, उत्साहाला योग्य वाव नसल्यामुळें वहातील लागलेले तरुणहि या चळवळींत सामील होतील असा हिशोब मनांत करून, टिळकांनीं वंगभंगाच्या प्रश्नाला भारतीय स्वरूप देण्याचें ठरविलें. ७-८-१९०५ रोजीं कलकत्त्याच्या 'टाउन हॉल'मध्यें वंगभंगाचा निषेध करण्यासाठीं टोलेजंग सभा झाली आणि हा दिवस बंगालभर सुतकाचा दिवस म्हणून पाळण्यात आला. वंगभंगामुळें सतप्त झालेल्या बंगाली लोकांनीं बहिष्काराची भाषा सुरू केली हें पाहून टिळकांना समाधान वाटलें. अर्जविनंत्या, सभाप्रस्ताव येथें सगळ्या चळवळींची धाव आजवर खुंटत असे; आता चळवळ यापुढें चालली—ती कृतीचें रूप धारण करूं लागली—हें पाहून टिळकांना आशा वाटूं लागली.

या चळवळीचा पुरस्कार करण्यासाठीं टिळकांनीं या सुमारास लिहिलेले लेख अत्यंत जाज्वल्य आहेत. आजवरच्या चळवळींत अळणीपणा आलेला होता, बहिष्काराच्या कल्पनेमुळें हा अळणीपणा नाहींसा होईल असें भविष्य 'आणीबाणीची वेळ' या लेखात टिळकांनीं वर्तविलें. 'राष्ट्रीय बहिष्कार' या लेखांत त्यांनीं चीननें बहिष्कार पुकारून अमेरिकेला शुद्धीवर कसें आणिलें हें सांगितलें. 'बहिष्कार-योग' या लेखांत त्यांनीं महाराष्ट्रात स्वदेशीची मुहूर्तमेढ रोवणाऱ्या सार्वजनिक काकांचा गौरव केला; आणि बहिष्काराच्या चळवळीवर आक्षेप घेणाऱ्या लोकांचें तोंड बंद करण्याचा प्रयत्न केला. युवराजांना हिंदुस्थानांत बोलावून ब्रिटिश साम्राज्याच्या वैभवाची पिरून एकदा जाहिरात करणाऱ्या कर्झनलाहि बहिष्काराच्या कल्पनेचा धाक वाटावा आणि चळवळींत भाग

* आठवणी व आख्यायिका : खंड १ : भा. २ : पृ. २४९-५०.

घेऊन अवसानघात करणाऱ्या लोकांचें स्वरूपहि स्पष्ट व्हावें, म्हणून टिळकांनी पुढील वाक्य* लिहिलें :

**युवराज इकडे आल्याबरोबर विलायती 'डायमंड लेदर'चा बूट चढवून आम्ही लोटांगण घालीत त्यांच्याकडे गेलों तर आमच्या व आमच्या मतांच्या पोंचटपणास पारावार रहाणार नाहीं.**

या चळवळीला बंगालमध्यें व महाराष्ट्रांत भरती येऊं लागली त्या सुमारास टिळकांना दत्तक-प्रकरणातील कांहीं कामासाठीं वऱ्हाडांत जावें लागलें. या मुक्कामात उमरावती येथें टिळकांचें व्याख्यान झालें आणि यवतमाळेस त्यांचा फार मोठा सत्कार झाला. 'जुनीं व नवीं साम्राज्यें' या विषयावर उमरावती येथें बोलतांना टिळकांनी प्राचीनकाळीं हिंदुस्थानांत होऊन गेलेल्या साम्राज्यां-पेक्षां ब्रिटिश साम्राज्य कसें अपायकारक आहे हें स्पष्ट करून सांगितलें. ते यवतमाळ येथें गेले त्या वेळपर्यंत तेथें पाऊस पडला नव्हता.† तेथील कार्यकर्ते दुष्काळाच्या भीतीनें ग्रस्त झाले होते. टिळकांच्या आगमनाचे वेळींच मेघ-राजाचेंहि आगमन झाल्यामुळें लोकांचा उत्साह शतगुणित झाला. यवतमाळच्या कार्यकर्त्यांचा गौरव करतांना टिळकांनी 'यवतमाळ लवकरच लोकमताचें ठाणें होईल' असा आशीर्वाद दिला. त्या वेळीं तेथें निघणाऱ्या 'हरिकिशोर' साप्ताहिकाच्या कार्यालयाला टिळकांनी भेट दिली. कार्यालयांतील दैन्य टिळकांच्या दृष्टीस पडूं नये यासाठीं धडपडणाऱ्या एका कार्यकर्त्याला टिळक म्हणाले : **मनुष्याला आपल्या दारिद्र्याची लाज वाटावयास नको; त्याला आपल्या दुर्गुणांची लाज वाटली पाहिजे.**

बंगालमधील चळवळीची तीव्रता वाढूं लागली आणि अधिकाधिक लोक या चळवळींत सामील होऊं लागले. बहिष्काराच्या कल्पनेचें रूपांतर होऊं लागलें आणि त्यामुळें लोक स्वदेशी उद्योगधंद्यांच्या स्थितीचा विचार करूं लागले. या सुमारासच आयर्लंडमध्यें चालू असलेल्या 'सिनफेन' चळवळीशीं आपल्या चळवळीचें साम्य नेऊन भिडवावें अशी कल्पना प्रादुर्भूत झाली. कर्झननें बंगालमधील सुशिक्षित वर्गाला चांगलेंच दुखवून ठेविलें असल्यामुळें,

* केसरी : १५-८-१९०५.

† आठवणी व आख्यायिका : खंड २ : पृ. २४६-४७.

बहिष्काराचा रोख सरकारी शिक्षण पद्धतीकडेहि वळूं लागला. यांतूनच हळूहळू राष्ट्रीय शिक्षणाची कल्पना विकास पावूं लागली. टिळक या सर्व कल्पनांशीं तद्रूपता पावत होते आणि महाराष्ट्रांत या कल्पना रुजविण्याचा प्रयत्न करीत होते.

या चळवळींत विद्यार्थिवर्ग बहुसंख्येनें सामील होऊं लागल्यामुळें, विद्यार्थ्यांनीं सभा-चळवळींशीं संबंध ठेवूं नये असे हुकूम निघूं लागले. बंगाल-मधील बहिष्काराची लाट सप्टेंबर महिन्यांत महाराष्ट्रावर येऊन धडकली. ठिकठिकाणचे विद्यार्थी चळवळींत सामील होऊं लागले. या वर्षीच्या गणेशो-त्सवांत टिळक बेळगांवकडे जाऊन आले आणि 'काळ'कर्ते परांजपे नाशिक भागांत जाऊन आले. सप्टेंबर अखेरपासून पुण्यांतील विद्यार्थ्यांच्या सभा सुरू झाल्या आणि शेवटीं फर्ग्युसन कॉलेजमधील सावरकरप्रभृति विद्यार्थ्यांनीं विदेशी कपड्यांची होळी पेटवून या वर्षींचें सीमोल्लंघन साजरें केलें. कॉलेजच्या प्रमुखांनीं सावरकरांना दंड करून वसतिगृहांतून बाहेर काढलें. विद्यार्थिवर्गाला चळवळीपासून परावृत्त करण्याचे हे प्रयत्न टिळकांना पसंत पडले नाहींत. 'हे आमचे गुरुच नव्हेत' या ठसठशीत मथळ्याचे तीन लेख त्यांनीं केसरींत लिहिले. विद्यार्थ्यांनीं चळवळींत पडूं नये याचा अर्थ कोणीच चळवळींत पडूं नये असा होतो हा मुद्दा स्पष्ट करतांना टिळकांनीं पुढील विवेचन* केलें: शाळेच्या विद्यार्थ्यांनीं विद्यार्थी म्हणून राजकीय चळवळींत पडूं नये, मोठ्यानें राजाचे नोकर म्हणून पडूं नये आणि म्हाताऱ्यानें पेन्शनर म्हणून पडूं नये, एतावता जन्मल्यापासून मरेपर्यंत चुकून एखादा मनुष्य गेल्यास जावो, बाकी सगळे—

बाल्ये राजगुरुर्यन्ता यौवने भृतिदो नृपः ।
तदा पेन्शनदाता च न हिंदुः प्रभुरात्मनः ।

या राजनीतीच्या तत्त्वांत चिरडून जाऊन जन्मल्यापासून मरेपर्यंत एकसारखें दास्यत्वांत मुरलें जावें आणि... अशा रीतीनें राष्ट्रभक्तिशून्य पुरुषांची सरकारी नोकरीकरितां परंपरा तयार व्हावी.

इकडे हिंदुस्थानांत या चळवळीला तेज चढत होतें त्या वेळींच तिकडे

* केसरी : २४-१०-१९०५.

इंग्लंडांत हिंदुस्थानची वकिली चांगल्या प्रकारें चालू होती. कॉंग्रेसतर्फे इंग्लंडात प्रचारासाठीं गेलेल्या ना. गोखल्यांनी या सुमारास व्याख्यानांची झोड उठवून दिली होती. ५० दिवसांत त्यांनी ४५ व्याख्यानें दिलीं, असें म्हणतात. गोखल्यांच्या भाषणांतील स्पष्टोक्ति खुद्द टिळकांनाहि पसंत पडली. ७-११-०५ च्या केसरींत गोखल्यांच्या इंग्लंडमधील भाषणाचा उल्लेख करून टिळक लिहितात: लॉर्ड कर्झन हे शहाणे आहेत, कर्ते आहेत, पण, हिंदी लोकांच्या पायांत दास्याची जड बिडी कायमची रहावी अशा तजविजी करण्यांत त्यांचें सर्व शहाणपण खर्च झालें आहे... प्रो. गोखले यांनीं विलायतेंतील लोकांपुढें लॉर्ड कर्झन यांचा जो दुर्गुण मांडला आहे, तो हाच होय.

सर सेनापति किचनेर व कर्झन यांच्या लटक्यांत कर्झनसाहेबांना शेवटीं राजिनामा द्यावा लागला. असें असलें तरी राजपुत्राच्या भारतभेटीची योजना मागें पडली नाहीं. नोव्हेंबरच्या मध्याच्या सुमारास राजपुत्र मुंबईस आले आणि देशांत प्रचंड असंतोष माजला असूनहि, राजनिष्ठ लोक त्यांच्या सत्काराच्या पर्वणीसाठीं धावपळ करूं लागले. या वर्षी काशीक्षेत्रीं भरणाऱ्या कॉंग्रेसपुढें जे अनेक वादग्रस्त प्रश्न येऊं पहात होते त्यांत या विषयाची भर पडली. या अधिवेशनाचें अध्यक्षपद ना. गोखले यांना देण्याचें ठरलें होतें त्यामुळें आपली इंग्लंडातील वकिली यशस्वी करून, डिसेंबरच्या आरंभीं गोखले स्वदेशीं परत आले टिळकांनीं गोखल्यांच्या कार्याचा मोकळेपणानें गौरव केला आणि यासाठीं त्यांनीं पुण्यांत जाहीर सभाहि भरविली. या सुमारास टिळक सातारा जिल्ह्यांत गेले होते. ते तिकडे हिंडत होते तोंच इकडे 'भाला' पत्राचे संपादक श्री. भा. रा. भोपटकर यांच्यावर राजद्रोहाचा खटला भरण्यांत आला. टिळक पुण्यास न थांबतां तसेच तडक मुंबईस गेले आणि या खटल्यासंबंधींची व्यवस्था करून ते बनारसला जाण्याच्या तयारीस लागले.

या वेळीं, कॉंग्रेसला सुरवात होण्यापूर्वी थोडे दिवस टिळक बनारसला गेले होते. त्यांच्या दुरच्या नात्याची कांहीं बायकामंडळी त्यांच्याबरोबर यात्रेच्या हेतूनें गेली होती. कॉंग्रेसचे नियोजित अध्यक्ष गोखले यांच्या स्वागतासाठीं टिळक स्टेशनवर गेले होते. स्टेशनवरच्या अलोट गर्दीत सिस्टर निवेदिता या अमेरिकन विदुषी टिळकांना भेटण्याच्या उत्सुकतेनें इकडेतिकडे हिंडत होत्या. टिळकांच्या बरोबर असलेले श्री. देवल यांनीं या विदुषीची व टिळकांची भेट

करून दिली. तेव्हां सिस्टर निवेदिता यांनीं टिळकांशीं हस्तांदोलन केलें. "आजवर आम्ही अमेरिकेंतील लोक आपल्याला 'ओरायन' व 'आर्क्टिक होम' या ग्रंथांचे विद्वान् लेखक म्हणून ओळखीत होतों; आज आपल्या प्रत्यक्ष दर्शनाचा योग आल्यामुळें समाधान वाटलें,* असें या बाई टिळकांना म्हणाल्या.

या वेळीं टिळकांचें नांव इतकें दुमदुमून राहिलेलें असूनहि, काँग्रेसमधील कित्येक शिष्ट त्यांना बरोबरीनें वागविण्याला तयार नव्हते. उचासनावर बसलेल्या मान्यवरांत टिळकांना सुखानें जागा मिळाली नाहीं. या वेळचें ना. गोखले यांचें अध्यक्षीय भाषण फार स्तोत्रोक्तिपूर्ण झालें. या भाषणांत कर्झन व औरंगजेब यांची तुलना करण्यांत आली. कर्झनची आरती करतांना टिळकांनीं यापूर्वीच जो लेख† लिहिला त्यांतहि हीच तुलना केलेली आहे. या वर्षी विषयनियामक समितींत बरीच खणाखणी झाली. बंगालची फाळणी, स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण या विषयांवर तर वाद झालाच; पण, राजपुत्राच्या स्वागताचा ठराव करण्याचा घाट नेमस्त पुढारी घालूं लागले; त्यामुळें वादाचें रण चांगलेंच माजलें. बंगालप्रांतानें उचललेला बहिष्कारचा ठराव मान्य झालाच पाहिजे असा महाराष्ट्रांतील मंडळींनीं आग्रह धरला. सुरेंद्रबाबू राजपुत्राच्या स्वागताच्या ठरावाबद्दल हट्टून बसले. तडजोड होण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हां टिळकांनीं बाबू मोतिलाल घोष यांनीं तांतडीनें निघून यावें, अशी तार धाडली. पत्नी अत्यवस्थ आहे; येऊं शकत नाहीं, असें मोतीबाबूंचें उत्तर आलें. तुम्हीं आलेंच पाहिजे; नाहींतर तुम्हांला आणण्यासाठीं मनुष्य पाठवितों, अशी तार टिळकांनीं पुनः केली. या तारेचें मोतीबाबूंकडून जें उत्तर आलें तें बाबूजींच्या टिळकांवरील श्रद्धेचें गमक म्हणून लक्षांत ठेवण्यासारखें आहे. "कुटुंब फारच आजारी आहे, तरी येतों," असें बाबूजींनीं लिहिलें होतें.$ शेवटीं या स्वागताच्या ठरावाच्या बाबतींत टिळकांनीं नामी शक्कल लढविली. स्वागताचा ठराव करून त्याला गान्हाण्याची पुस्ती जोडावी, असें टिळकांनीं सुचविलें. आपल्या आजीच्या जाहीरनाम्यांतील

---

* आठवणी व आख्यायिका : खंड २ : पृ. १६०-६१.

† केसरी २९-८-१९०५.

$ आठवणी व आख्यायिका : खंड ३ : पृ. ११३.

असें सुचवितांना टिळकांनी यांच लेखांत, राजकीय बाबतींत महाभारतांत सांगितल्याप्रमाणें ब्राह्मणी मागणीचा कांहीं उपयोग होत नाहीं हें वाक्य लिहिलें. राजकीय चळवळीचें संथपणाचें धोरण चालू रहावें असें म्हणणारे कित्येक नेमस्त, राष्ट्रीय सभा निघून २०-२५ वर्षेच झालीं आहेत असा कोटिक्रम करीत होते. या कोटिक्रमाचें खंडन करतांना टिळक लिहितात: राष्ट्रीय सभेच्या पंचवीस वर्षांत तत्पूर्वीचीं पन्नाससाठ वर्षें मिळून मग या मुद्द्याचा आपणास विचार केला पाहिजे.

राजकीय अधिकार मिळण्याचा संभव, राष्ट्रीय सभेचें धोरण बदलण्याची आवश्यकता इत्यादि विषयांची चर्चा अशा प्रकारें चालली असतांना, बंगालमध्यें घडलेल्या एका गोष्टीमुळें चर्चेला एक नवीन विषय मिळाला. बारिसाल प्रकरणांत सुरेंद्रबाबूंनीं जो नेट दाखविला होता आणि या प्रकरणामुळें फुल्लर-साहेबांवर राजीनामा देण्याचा जो प्रसंग आला होता त्यामुळें सुरेंद्रबाबू हे त्यांच्या प्रांतबांधवांना विजयी वीर वाटूं लागले होते. ७-८-१९०६ रोजीं कलकत्त्याच्या लोकांनीं सुरेंद्रबाबूंना धान्याभिषेक केला. या धार्मिक विधीचें रहस्य समजून न घेतां इंग्रजांनीं मनाशीं असें ठरविलें कीं, बंगाली लोकांनीं सुरेंद्रबाबूंना आपला राजा मानिलें आणि त्यांनीं त्यांचा राज्याभिषेक केला! या वेडगळ समजुतीच्या आहारीं गेलेले हिंदुस्थानांतले इंग्रज आणि त्यांचे विलायतेतले जातभाई बंगाली लोकांना बंडखोर ठरवूं लागले; या लोकांनीं चालविलेल्या या धांवपळीचा समाचार घेतांना टिळकांनीं ११-९-१९०६ च्या केसरींत 'मुंबईच्या टाइम्सचा बेअकलमणा' हा लेख लिहिला. एडवर्ड बाद-शहाच्या डोक्यावरील कोहिनूरचा मुकुट सुरेंद्रनाथ हिरावून घेतो कीं काय या जबरदस्त भीतीच्या आहारीं गेलेल्या टाइम्सच्या एडिटरच्या पोकळपणाचे टिळकांनीं या लेखांत नामी वाभाडे काढले आहेत.

इंग्रजी वृत्तपत्रांनीं बंगाली लोकांवर संघटित बंडखोरीचा केलेला आरोप टिळकांनीं अशा रीतीनें झाडून टाकला हें खरें आहे तरी, देशांतील तरुणांत एक प्रकारची बंडखोरी वाढत आहे हें टिळकांना दिसत होतें. या वर्षीच्या मे महिन्यापासून नाशिक येथील तरुण मंडळी व तेथील सरकारी अधिकारी यांच्या दरम्यान ज्या झटापटी चालू होत्या त्या टिळकांना अवगत होत्या. 'सोनेर बंगला' नांवाची क्रांतिकारक संघटना बंगालमध्यें नांदत असल्याचा

बोभाटा होत आहे, हें टिळक पहात होते. बंगालमध्येंच ईस्ट इंडिया रेल्वेवरील लोकांनीं संप केल्याचें वृत्त त्यांना विदित होतें. देशांत वाढत चाललेला हा उत्साह उतूं जाऊं नये, तो प्रभावी व्हावा, हा विचार टिळकांच्या मनांत या सुमारास एकसारखा खेळत असे. या वर्षीच्या गणेशोत्सवांत टिळक नाशिक, बेळगांव वगैरे ठिकाणीं गेले. नाशिक येथील तरुणांनीं चालविलेल्या 'अभिनव भारत' संस्थेचा त्यांनीं परिचय करून घेतला. तुम्हां तरुणांचे विचार बरोबर आहेत; पण योग्य व पुरेशी तयारी होईपर्यंत कांहीं करणें अविचाराचें आहे; तोंपर्यंत विवेकानें वागा व कार्य करीत रहा, असा सल्ला त्यांनीं या तरुणांना दिला.

या वर्षीच्या ऑगस्ट महिन्यापासून राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न प्रामुख्यानें पुढें येऊं लागला. कलकत्ता येथें राष्ट्रीय कॉलेज व शाळा सुरू करण्यांत येऊन राष्ट्रीय शिक्षण मंडळातर्फे परीक्षा घेतल्या जातील व पदव्या दिल्या जातील, असें जाहीर झालें. या सुमारासच पुण्यांत 'महाराष्ट्र विद्याप्रसारक मंडळ' ही संस्था स्थापन होऊन डॉ. नानासाहेब देशमुख, चिंतामणराव वैद्य, दाजीसाहेब खरे, विष्णु गोविंद विजापूरकर व स्वतः टिळक अशा लोकांच्या सह्यांनीं समर्थ विद्यालयाच्या स्थापनेचा संकल्प जाहीर झाला. राष्ट्रीय शिक्षणाचा विषय अशा रीतीनें प्राधान्य पावूं लागल्यामुळें, टिळकांना या विषयावरील आपले सर्व विचार फिरून एकवार मांडण्याची संधि मिळाली. 'राष्ट्रीय शिक्षण व खाजगी शाळांची जबाबदारी' हा मथळा घालून टिळकांनीं या सुमारास एकंदर तीन लेख लिहिले. यांपैकीं दोन लेख १९०६ च्या अखेरीस लिहिलेले आहेत व शेवटचा लेख १९०७ च्या जानेवारीच्या अखेरीस लिहिलेला आहे. भारतांतील जुन्या शास्त्रांचे टिळक अभिमानी होते; पण, त्यांचा याविषयींचा अभिमान आंधळा नव्हता, हें पुढील अवतरणावरून स्पष्ट होत आहे*: बुद्धीची कुशाग्रता वाढविण्यास हिंदुस्थानांतील न्यायव्याकरणादि प्राचीन शास्त्रें जरी कितीहि उपयोगी असलीं तरी, देशाचा उत्कर्ष होण्यास ज्या विषयांचें ज्ञान लागतें त्या विषयांचें शिक्षण या आमच्या जुन्या शाब्दिक शास्त्रांपासून मिळत नाहीं आणि मिळणेंहि शक्य नाहीं. पाश्चिमात्य राष्ट्रांनीं

* केसरी : ४-१२-१९०६.

देशाभिवृद्धीस उपयोगी पडणारीं हीं शास्त्रें व हे विषय नवीन सिद्ध केलेले आहेत; आणि पाश्चिमात्य राष्ट्रांचा एकंदर इतिहास पाहिला तर त्यांच्या वाङ्मयात किंवा शिक्षणक्रमांत याच विषयास प्राधान्य दिलेलें आढळून येतें.

रिस्ले सर्क्युलरसारखीं धोरणें निर्माण करून सुशिक्षित तरुणांच्या मनांतल्या राजकीय महत्त्वाकांक्षा नष्ट करण्याचा कर्झनशाहीपासून चाललेला प्रयत्न फोल आहे असें दाखवून सांगतांना टिळकांनी इंग्रजी वाङ्मय व इतिहास यांच्या शिक्षणाचा मनावर होणारा परिणाम किती हितावह असतो, हें पुढील वाक्यांत विशद करून सांगितलें आहे :

लॉर्ड कर्झन येवो किंवा त्याचे वडील येवोत, इंग्रजी वाङ्मयाच्या किंवा इतिहासाच्या शिक्षणानें देशांतील तरुण पिढीच्या मनांत जी महत्त्वाकांक्षा उत्पन्न झालेली आहे व जिच्या सिद्ध्यर्थ उद्योग करण्यास तरुण पिढी तयार आहे, ती शाळेंतील शिस्तीच्या सबबीवर दाबून टाकण्याचा प्रयत्न कधींच सफल होणें शक्य नाहीं.

या वर्षीच्या सप्टेंबर महिन्याच्या मध्याच्या सुमारास गोखले विलायतेहून परत आले. मोर्लेसाहेब काहीं तरी सुधारणा जाहीर करणार ही गोष्ट गुप्त राहिली नव्हती. काँग्रेसच्या चळवळीमुळे या सुधारणा द्याव्या लागल्या तरी, त्यांचा राष्ट्राला नीटसा उपयोग होऊं नये म्हणून, मुसल्मानांना स्वत:कडे वळवून घेण्याचे सरकारी प्रयत्न जोरात सुरू झाले. मिंटोसाहेबांच्या प्रेरणेनेंच सिद्ध झालेलें मुसल्मानांचें शिष्टमंडळ ऑक्टोबरच्या आरंभीं मिंटोसाहेबांना भेटलें, मुसलमान इकडून सवतासुभ्याची भाषा बोलूं लागले. या कुयोगाकडे टिळकांचें लक्ष होतें. हिंदुसमाजांत मिळूनमिसळून वागल्यानें व हिंदुसमाज सुसंघटित केल्यानेंच मुसल्मानांच्या या प्रवृत्तींना आळा बसेल हें बोलणारे टिळक स्वदेशी प्रदर्शनासाठीं पंढरपुरास जाऊन, कार्तिकी एकादशीच्या निमित्तानें गोळा झालेल्या भाविकांमध्ये राष्ट्रीय जागृति करीत होते. सुधारणा निश्चित व्हाव्या यासाठीं चालू वर्षाची चळवळ जोरांत चालविली पाहिजे असें त्यांनीं मनाशीं ठरविलें; आणि महर्षि दादाभाई नौरोजी यांच्या अध्यक्षतेखालीं कलकत्ता येथे होणारें राष्ट्रीय सभेचें अधिवेशन या दृष्टीनें यशस्वी कसें होईल, हें पहाण्याच्या उद्योगाकडे ते वळले. पं. श्यामजी कृष्णवर्मांसारखे परदेशांत जाऊन राहिलेले भारतीय आयर्लंड, ईजिप्त, इ० देशांत उघड प्रयत्नांना

राष्ट्रीय जागृतीशीं समरस होत आहेत आणि त्यांच्या प्रयत्नांमुळें हिंदुस्थानचें गाऱ्हाणें अमेरिकेंतल्या लोकांच्या कानीं पडत आहे या गोष्टीची पकी माहिती टिळकांना होती; आणि म्हणूनच, कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेचें काम पीछेहाटीच्या स्वरूपाचें होतां कामा नये, असा आग्रह त्यांनीं धरिला होता.

कलकत्त्याच्या अधिवेशनाचें अध्यक्षपद लजपतराय यांना द्यावें ही खापर्डे यांची सूचना पुढें आल्यावर, कित्येकांनीं हा मान टिळकांना द्यावा असेंहि सुचविलें होतें. कॉंग्रेसमधील मेथागटाला लजपतराय व टिळक हे दोघे सारखेच अप्रिय होते! एखाद्या निर्मळ नेमस्ताचें नांव सुचवून निभाव लागणार नाहीं हें या चाणाक्ष मंडळींनीं ओळखलें होतें; म्हणून त्यांनीं इंग्लंडांत असलेल्या दादाभाई नौरोजींचें नांव अध्यक्षपदासाठीं सुचविलें. गेल्या दोनतीन वर्षांत दादाभाईंच्या मतांची उत्क्रांति कशी होत चालली आहे याचें ज्ञान टिळकांना होतें. यामुळें– आणि वयोवृद्ध दादाभाईंच्या साठ वर्षांच्या राष्ट्रकार्याबद्दल त्यांना नितान्त आदर वाटत असल्यामुळें– त्यांनीं दादाभाईंच्या निवडणुकीचें मनःपूर्वक स्वागत केलें. कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून दादाभाई जें सांगतील तें आपल्याला इष्टच ठरेल अशा आत्मविश्वासानें टिळकांनीं दि: १८-१२-१९०६ च्या केसरींत "दादाभाई सांगणार तरी काय?" हा लेख लिहिला. कलकत्ता येथील कॉंग्रेसची फलश्रुति व त्या फलश्रुतीला होणारें दादाभाईंचें साहाय्य यांचें भविष्यवादी टिळकांनीं केलेलें पुढील वर्णन वाचण्यासारखें आहे :

दादाभाई यांच्या संबंधानें विचार करतांना नेहमीं ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, ते कांहीं घोपाखी अगर शिळोप्याचे वेळीं काम करणारे गृहस्थ नव्हत. सर्व बाजूंनीं, सर्व तऱ्हेनें, सर्व प्रकारच्या लोकांच्या साहाय्यानें आपलें कार्य तडीस नेण्याचें मन त्यांनीं पत्करलेलें आहे... तो पुरुष हल्लीं आमच्या देशांत...जी जागृति दिसत आहे तिच्यावर विरजण घालण्यास तयार होईल, असें आम्हांस वाटत नाहीं...नवीन पक्ष किंवा नवीन चळवळ हें राष्ट्राच्या जोमाचें व जिवंतपणाचें लक्षण आहे असें त्यांचें मत आहे; व तेंच मत खरें असून, दादाभाईंच्या आगमनानें यंदां त्यास अधिक पुष्टि मिळेल, असा आम्हांस भरंवसा आहे.

वाटेंत उमरावतीस थांबून व नागपूरच्या मंडळींना बरोबर घेऊन टिळक

कलकत्त्याच्या काँग्रेसला गेले. वृद्ध दादाभाईंनी आपल्या अध्यक्षीय भाषणात बहिष्काराची भाषा वापरिली, हा आपला एक प्रकारचा जयच होय असें टिळकांना वाटलें असलें पाहिजे. बहिष्काराचा ठराव आपल्याला हवा त्या पद्धतीनें संमत होईल की नाहीं, याची टिळकांना प्रथम शंका वाटत होती. 'बहिष्कारसंघ' या नावाची संघटना जरूर तर सिद्ध करण्याचा विचारीह त्यांच्या मनात घोळत होता. बहिष्काराच्या ठरावावर कलकत्ता येथील विषय-नियामक समितींत फारच खडाजंगी झाली. या प्रसंगी टिळक कसे वागले व शेवटीं त्यांनी आपला इष्ट हेतु कशा रीतीनें सिद्ध करून घेतला हें पुढील* उताऱ्यात मार्मिकपणानें सांगितलें आहे :

विरुद्ध पक्षाचें कांहींहि ऐकावयाचें नाहीं ही मवाळमंडळींची दृष्टि असल्या-मुळें वाद माजला व तेढ उत्पन्न झाली. अरविंदबाबू व पालबाबू आपल्या अनुयायांसह उठून जाऊं लागले. पालबाबूंनी खापर्डे यानाहि बरोबर नेलें, त्यांना दादासाहेब म्हणाले : चला बळवंतराव! येथे बसण्यांत काय अर्थ आहे! लोकमान्य म्हणाले, "तुम्ही जा, माझें काम येथेंच आहे." असाहि प्रसंगीं लोकमान्यांनीं आपलें मन शांत ठेविलें होतें. रात्रीं फार झाल्यावर, काँग्रेस-च्या अधिकारी मंडळींनीं विषयनियामक मंडळापुढें ठेविलेल्या ठरावावर काँग्रेस-पुढें मांडण्याकरितां कांहींतरी उपसूचना पाठवाव्या याचा विचार चालविला. रात्रीं १२ १ वाजेपर्यंत हा वाद चालला, पण, कोणाचेंच एकमत होईना. तेव्हां लोकमान्यांनीं सर्वांस निजण्यास जाण्यास सांगितलें व 'तुम्ही जा, मी सर्व करतों' असें म्हटलें. सर्व मंडळी गेल्यावर टिळक आपल्या खोलींत रात्रभर जागत होते. त्यांनीं बहिष्काराच्या विषयावर उपसूचनात्मक तीनचार ठराव लिहून काढले व सकाळीं उठल्याबरोबर त्यांपैकीं एक स्वतःच्या नांवावर व एक खापर्डे यांच्या नांवावर काँग्रेसचे चिटणिसांकडे पाठविला. त्याचप्रमाणें एक मोतीबाबूंकडे व एक बिपिनबाबूंकडे पाठवून, त्यांनीं सह्या करून चिटणिसांकडे पाठविण्यास सांगितलें, आणि त्याच भविष्य केलें की "दादासाहेब, तुमची किंवा मोतीबाबूंची उपसूचना सुरेंद्रबाबू कबूल करणार! आम्ही आणि बिपिनबाबू दोघेहि जहाल, तेव्हां आमचें म्हणणें ऐकावयाचें नाहीं हें ठरलेलेंच!" हें

* आठवणी व आख्यायिका : खं. १ : पृ. १६५, १६६

भविष्य तंतोतंत खरें ठरलें. दहा वाजण्याच्या सुमारास सुरेंद्रबाबूंकडून स्वयंसेवक लोकमान्यांकडे चिठी घेऊन आला. त्यांत मोतीबाबूंची किंवा खापर्डे यांची उपसूचना आम्हांस कबूल आहे; तुम्हीं किंवा बिपिनबाबू यांनीं आपल्या उपसूचना काँग्रेसपुढें मांडूं नयेत, असा मजकूर होता. भविष्य खरें झालें; लोकमान्यांची युक्ति साधली! टिळकांनीं उपसूचना अशाच तयार केल्या होत्या कीं, त्याच्या स्वतःच्या आणि बिपिनबाबूंच्या उपसूचना या शब्दांनीं कडक, पण अर्थानें नरम होत्या; व दुसऱ्या शब्दांनीं नरम, पण अर्थानें जास्त कडक होत्या.

कलकत्त्याच्या काँग्रेसपूर्वी नेमस्तांनीं टिळकाविषयींचे अनेक प्रवाद उठविले होते. पुण्याहून पांचशें पैलवान घेऊन टिळक जाणार आहेत, अशी कंडी उठविण्यांत आल्यामुळें, नेमस्त पुढारी आपला सर्व फौजफाटा घेऊन कलकत्त्यास सिद्ध होते! त्यामुळें कलकत्त्यास प्रतिनिधींची संख्या अठराशें पर्यंत गेली होती. कलकत्त्याच्या काँग्रेसमध्यें नरमगरम पक्षाची लठ्ठालठ्ठी होऊन काँग्रेस मोडेल, असें शुभ वर्तमान इंग्रजी वृत्तपत्रांनीं वर्तविलें होतें. पण, तें खोटें ठरून कलकत्त्याची काँग्रेस प्रगतिकारक ठरली. या काँग्रेसची फलश्रुति सांगतांना टिळकांनीं दि. ८-१-१९०७ च्या केसरींत 'गेल्या राष्ट्रीय सभेंत विशेष काय झालें?' या मथळ्याचा लेख लिहिला. काँग्रेसचा समारोप करतांना दादाभाईंनीं जे शब्द उच्चारले त्यांचें वर्णन टिळकांनीं पुढीलप्रमाणें केलें :

**स्वराज्य–लोकांनीं आपण होऊन चालविलेलें स्वराज्य–आपणांस प्राप्त झाल्याखेरीज आपल्या उद्धाराचा दुसरा मार्ग नाहीं असें नेटानें, स्पष्टपणें व सोप्या भाषेनें, गहिंवरून दादाभाई यांनीं जेव्हां सांगितलें तेव्हां कोणी वृद्ध देवदूत आपल्या तरुण पिढीस शेवटचा उपदेश करण्याकरतांच अवतरला आहे कीं काय, असा क्षणभर भास झाला.**

कलकत्त्यास पास झालेले ठराव जुन्या व नव्या मार्गांचा समन्वय साधणारे आहेत हें टिळकांनीं पुढील वाक्यांत सांगितलें आहे: भिक्षांदेहीचा मार्ग राष्ट्रीय सभेनें सर्वस्वी सोडला नाहीं हें खरें आहे; पण, ह्याबरोबरच एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, स्वदेशी चळवळ, बहिष्कार आणि राष्ट्रीय शिक्षण या तीनांहि

# पर्व नववें : : : संग्रामाची तयारी

> तरुण लोकांच्या उत्साहावर गार पाणी ओतण्यांत अर्थ नाहीं व त्यांस भलतीकडे भडकूं देण्यांतहि अर्थ नाहीं. मात्र त्यांच्या कर्तृत्वशक्तीस योग्य अवसर देणें व तिचें पोषण करणें हेंच काम पुढाऱ्यानें जपून करावयाचें असतें.
>
> —टिळक

लाहोरहून कलकत्त्यास गेलेल्या पंजाबी देशभक्तांनीं काँग्रेसचें पुढील अधिवेशन पंजाबमध्यें भरावें अशी मागणी केली होती; पण, लजपतराय यांच्या पंजाबांत काँग्रेस भरली तर ती कलकत्त्याहून अधिक भयंकर ठराव पास करील अशी भीति मेथाप्रभृतींना वाटली; म्हणून त्यांनीं पंजाबचें निमंत्रण अमान्य करून नागपूरचें निमंत्रण स्वीकारलें. कलकत्त्याची काँग्रेस मोडली तर नाहींच; उलट तिनें स्वराज्याची भाषा उच्चारली, हें पाहून इंग्रजी वृत्तपत्रें निराशहि झालीं नि बेतालहि बनलीं ! तुम्ही स्वराज्याचा बकवा खुशाल करा, समशेरीनें जिंकून घेतलेला तुमचा देश आम्ही समशेरीनेंच संभाळूं, अशा धाक दाखविण्याला त्यांनीं सुरवात केली.

कलकत्त्याच्या ठरावांमुळें राष्ट्रीय वृत्तीच्या वृत्तपत्रांनीं आपला सूर चढविण्याला सुरवात केली नि त्यांना दाबून टाकण्याच्या सरकारी धोरणाचीहि तत्काळ सुरवात झाली. 'पंजाबी' पत्राच्या संपादकांवर खटला भरण्यांत आला नि मुंबईच्या विहारी साप्ताहिकाकडून जामीन मागण्यांत आला. टिळकांनीं कलकत्त्याच्या ठरावांचा जोरानें पुरस्कार चालविला. धार्मिक कार्यांत विलायती वस्तूंवर बहिष्कार घालण्याचें महत्त्व पटवून देऊन, त्यांनीं बहिष्काराच्या समर्थनासाठीं आयर्लंडमधील देशभक्तांच्या धोरणाचा आधार घेतला. कलकत्त्याच्या ठरावांमुळें देशांतल्या चळवळीला भिनसनदशीर स्वरूप येईल, या चिंतेनें गोखल्यांचें मन ग्रस्त झालें. संयुक्तप्रांतांत त्यांनीं दिलेल्या व्याख्यानांत या

चितेची छटा उमटली. 'नामदार गोखले यांचा घोटाळा'* 'खरे खासे गोखले'† आणि 'सनदशीर व कायदेशीर'¶ हे तीन लेख अत्यंत विवेचक पद्धतीने लिहून, टिळकांनीं गोखल्यांच्या मनातली चिंता नाहीशी करण्याचा प्रयत्न केला. मेथांच्या मानानें गोखल्यांची थोरी आपल्याला अधिक पोषक आहे या जाणिवेने, टिळकांनीं या तीन लेखापैकी पहिल्या लेखात पुढील वाक्ये अशी लिहिली आहेत :

नवीन राजकीय विचाराची लाट हिंदुस्थानांत चोहोंकडे पसरत चाललेली पाहून त्यांना आनंद होत आहे हें खरें; पण, राजकीय चळवळ करण्याची पूर्वीची सनदशीर पद्धत सोडून चालावयाचें नाहीं, असें त्यांचे म्हणणे आहे.

सनदशीर व कायदेशीर या शब्दांतला सूक्ष्म भेद स्पष्ट करण्यासाठीं टिळकांनीं लिहिलेला लेख आजसुद्धा विचारप्रवर्तक ठरेल. बहिष्कारावर आक्षेप घेणाऱ्या गोखल्यांना गप्प बसविण्यासाठीं टिळकांनीं त्यांच्याच सहीचा 'परदेशी माल विकत घेणार नाहीं' अशा आशयाचा १८९४ सालचा प्रतिज्ञालेखच प्रसिद्ध केला।

१०-२-०७ रोजीं मुंबईस वैश्यसंघाची सभा झाली त्या वेळीं टिळकांनीं स्वदेशी उद्योगधंदे सुरू करण्याच्या कल्पनेवर भर दिला. स्वदेशी व बहिष्कार ही अभेद्य जोडी आहे असें मानणाऱ्या टिळकांना गोखले बहिष्काराला बिचकतात कां याचें आश्चर्य वाटे. बहिष्कार द्वेषमूलक किंवा द्वेषसूचक आहे हें गोखल्यांचें म्हणणें चुकीचें आहे, बहिष्कार बंगालपुरता मर्यादित ठेवावा असें म्हणणारे गोखले उगीच काथ्याकूट करीत आहेत वगैरे मुद्दे प्रस्थापित केल्यावर, टिळकांनीं गोखले व त्यांचा पक्ष यांच्या मनोवृत्तीचें चित्र रंगविताना, 'सरकारवांचून आपलें चालणार नाहीं' आणि 'सरकारशीं विरोध करणें इष्ट नाहीं' या दोन खुंटांभोंवतीं ते सों सों घालीत आहेत," अशी स्पष्ट व समर्पक मीमांसा केली.

सरकारला विरोध करणें इष्ट नाहीं ही गोष्ट बंगालमधील हिंदूंना नीट पटावी, म्हणून तेथील सरकारी अधिकारी या मुद्द्यावर फार प्रयत्न करीत होते. ढाका येथील नबाबाला हाताशीं धरून व त्याला हिंदुविरुद्ध चेतवून, पटवल्या बंगाली हिंदूंना सतावण्याचा उद्योग या भागांत पद्धतशीर रीतीनें चालला होता.

* केसरी : १२-२-०७. † केसरी : १९-२-०७. ¶ केसरी : ५-३-०७.

चारदोनशें गुंडांना हाताशीं घेऊन हे नबाबसाहेब या सुमारास कोमिल्ला शहरांत शिरले व त्यांनीं तेथें धुडगूस घातला. नबाबसाहेबांचे पारशी चिटणीस या शहरांतल्या हिंदूंना अपशब्द बोलले. हिंदूंचा विरोध मोडून काढण्याचे हे सरकारी प्रयत्न यशस्वी मात्र होत नव्हते. बंगाली तरुणांपैकीं एकानें नबाबसाहेबांच्या एका हस्तकावर गोळी झाडल्यामुळें तो प्राणास मुकला होता.

मोर्लेसाहेबांच्या मनांतून हिंदुस्थानला जे अधिकार द्यावयाचे होते त्यांविषयीं हिंदुस्थान सरकारचा अभिप्राय या सुमारासच ठरत होता. चळवळ्या लोकांच्या उपद्व्यापांमुळें, येऊं पाहणाऱ्या सुधारणांची भट्टी बिघडेल असें मेथापंथाला वाटत होतें. त्यामुळें, कलकत्त्याच्या ठरावांना मूठमाती देण्याचे त्यांचे प्रयत्न सुरू झाले. मार्च महिन्यांत कित्येक प्रांतांतून ज्या प्रांतिक परिषदा झाल्या त्यांतून बहिष्कार वगैरे विषयांसंबंधींच्या ठरावांचें उच्चाटन व्हावें म्हणून या लोकांनीं खूप धडपड केली व बऱ्याच ठिकाणीं त्यांना यशहि आलें. अलाहाबाद येथें झालेल्या परिषदेच्या वेळीं पं. मालवीय यांनीं या कामांत यश मिळविलें. रायपूर येथें वऱ्हाड मध्यप्रांताची परिषद झाली तेव्हां रा. ब. मुधोळकर यांनीं 'वंदे मातरम्'च्या घोषालाहि बंदी केली. या परिषदेंत स्वदेशीचा ठराव पास झाला; पण, बहिष्काराचा ठराव मात्र वगळण्यांत आला. मुंबई इलाख्याची प्रांतिक परिषद २९-३-१९०७ रोजीं सुरत येथें झाली. या परिषदेला टिळक जाऊं शकले नाहींत. केळकर, चिंतामणराव वैद्य वगैरे राष्ट्रीय पक्षांतले लोक या परिषदेला गेले होते. या परिषदेंत विषयनियामक समितींतील चर्चेच्या वेळीं राष्ट्रीय शिक्षणाच्या ठरावावर फेरोजशहा मेथा व टिळकांचे अनुयायी यांच्यामध्यें बरीच खडाजंगी झाली. मेथांनीं या मंडळींना चुचकारण्याचा आव आणला व ठराव बाजूला टाकला. हा सर्व प्रकार टिळकांना कळला तेव्हां 'फेरोजशहा मेथा यांनीं आपल्या लोकांपेक्षां अधिक चलाखी दाखविली'* असें त्यांनीं कबूल केलें. देशांतील जहालपणा दपून रहावा म्हणून मेथापंथाचे लोक असे प्रयत्न करीत होते त्या वेळींच जहाल पुढाऱ्यांची लोकप्रियता अनेक प्रकारांनीं व्यक्त होत होती. रायपूर परिषदेच्या वेळीं अध्यक्षांनीं कलकत्त्याचे ठराव मागें टाकले; पण, परिषदेच्या ठिकाणाबाहेर खापर्डे यांनीं

* केळकरकृत टिळक-चरित्र : उत्तरार्ध : खं. २ : भा. ५ : पृ. ५८.

व्याख्यानें दिलीं तीं ऐकण्याला हजारों लोक जमले. पं. मालवीय यांनीं प्रांतिक परिषदेचा सोंवळेपणा टिकविला; पण, या परिषदेनंतर थोडक्याच दिवसांनीं लाला लजपतराय प्रयागला गेले असतांना, सहस्रावधि लोकांनीं त्यांचीं व्याख्यानें ऐकलीं. आणि, सर्वसामान्य लोक जहाल भाषा ऐकून समाधान मानीत होते व पुढारी तशी भाषा बोलून संतुष्ट होत होते त्या वेळींच, यांच्याहि पुढें मजल मारणारे कित्येक तरुण अन्य मार्गाचें संशोधन करीत होते! दि. २०-२-१९०७ रोजीं कलकत्ता येथील शस्त्रागारांत चोरी झाली. एका तरुणानें या शस्त्रागारांतली कांहीं काडतुसें व दारूगोळा लांबविला, असें मागाहून बाहेर आलें.

या वर्षाच्या एप्रिल महिन्यांत टिळक कांहीं दिवस सिंहगडावर जाऊन राहिले होते. कलकत्ता येथील कॉंग्रेसनें नवा मार्ग आंखला यामुळें संतुष्ट झालेले पं. श्यामजी कृष्णवर्मा यांनीं प्रांतोप्रांतीं राजकारणी महंत निर्माण व्हावे यासाठीं या वर्षी फेब्रुवारी महिन्यांत दहा हजार रुपयांची रक्कम बाजूला काढली होती. पंडितजींनीं आपली ही योजना टिळकांना कळविली. या योजनेचें टिळकांनीं मनोभावें स्वागत केलें. मोर्लेसाहेबांच्या सुधारणांच्या योजनेसंबंधींचा हिंदुस्थान सरकारचा अभिप्राय तयार होऊन तो विलायतची वाट धरूं लागला होता. हा अभिप्राय प्रतिकूल असल्यामुळें, हिंदी लोकमत हळूहळू अधिकच प्रक्षुब्ध होऊं लागलें. 'पंजाबी' पत्राच्या संपादकांवर करण्यांत आलेल्या खटल्यांत ते दोषी ठरल्यामुळें, या निकालाविरुद्ध अपील करण्यांत आलें होतें. त्याचा निकाल एप्रिल महिन्यांत सांगण्यांत आला. दि. १६-४-१९०७ रोजीं 'पंजाबी'च्या संपादकांना अधिकारी तुरुंगाकडे घेऊन जात असतांना लाहोर शहरांत बरीच गडबड उडाली. कांहीं पोलिसांवर आणि क्वचित् एखाद्या इंग्रजावरहि लोकांनीं हात टाकला. या सुमारासच बंगालचे पुढारी बिपिनचंद्र पाल हे मद्रास प्रांतांत व्याख्यानें देत हिंडत होते. त्यांच्या व्याख्यानांचा परिणाम म्हणून कांहीं ठिकाणीं विद्यार्थ्यांनीं संप केले व कांहीं ठिकाणीं तरुणांनीं विदेशी कपड्यांची होळी केली. या सुमारासच बंगालमधील मैमनसिंग जिल्ह्यांतले मुसल्मान अत्याचार करीत होते व क्षुब्ध झालेले हिंदु तरुण ठायीं ठायीं त्या ठिकाणीं त्यांचा प्रतिकारहि करीत होते.

राजकीय अधिकार देण्याच्या बाबतींत होत असलेली दिरंगाई हे या वेळेर

पसरलेल्या असंतोषाचें कारण आहे ही गोष्ट कबूल न करतां, सरकारी अधिकाऱ्यांनीं या असंतोषाची मीमांसा अन्य प्रकारें चालविली. १८५७ च्या बंडाला या सालीं पन्नास वर्षे पुरीं होत असल्यामुळें, हिंदी लोक फिरून बंड करण्याच्या विचारात आहेत असें त्यांना वाटूं लागलें. या बंडाचा प्रादुर्भाव मुख्यतः पंजाबात होईल अशा कल्पनेनें त्यांनीं दि. ९-५-१९०७ रोजीं लाला लजपतराय याना अचानक उचललें आणि मंडाले येथें नेऊन ठेविलें! सरदार अजितसिंग यानाहि पकडण्याची तयारी सरकारनें केली होती; पण, सरदारजी जवळजवळ महिनाभर सरकारी अधिकाऱ्याच्या हातींच लागले नाहींत.

सरकारनें लालाजींवर हात टाकल्यामुळें, अगोदरच संतप्त झालेले लोक अधिकच संतप्त झाले. ही घटना घडली त्या वेळीं टिळक सिंहगडावरच होते. तेथून पुण्यांत आल्यावर काहीं दिवसानीं त्यांनीं पुण्यातील शिवाजी-उत्सवांत व्याख्यानें दिलीं. या वर्षी हा उत्सव पार पडतो कीं नाहीं अशीच शंका कित्येकाना वाटत होती; पण, उत्सव कसा तरी पार पडला. लालाजींच्या हद्दपारीमुळें टिळक किती प्रक्षुब्ध झाले असतील आणि या प्रश्नासंबंधानें खाजगी रीतीनें बोलताना त्यानीं किती कडक भाषा वापरली असेल हें, या प्रकारानंतर दीड महिन्यानें त्यानीं जें व्याख्यान दिलें त्यातल्या पुढील उद्गारावरून* स्पष्ट होत आहे: कोणीहि असें म्हणत नाहीं कीं, बेकायदेशीर मार्गांचें अवलंबन करावयाचें. दुर्दैवानें सरकारच्या वर्तनामुळें बेकायदेशीर मार्ग स्वीकारण्याची वेळ आली तर, पुढच्या पुढें पाहतां येईल. सध्या काहीं ती वेळ नाहीं आणि तसा कोणाचा हेतूहि नाहीं. अशा वेळीं कायदेशीर चळवळ बेकायदेशीर ठरवून, लाला लजपतरायासारख्या पुरुषास ब्रह्मदेशात पाठविणें हें गैरशिस्त होय.

लजपतराय यांच्या हद्दपारीमुळें हिंदुस्थानभर क्षोभ माजला. परदेशातल्या हिंदवासीयानींहि या गोष्टीचा निषेध केला. लंडनमध्यें श्यामजींच्या 'इंडिया हाउस'मध्यें रहाणाऱ्या व तेथें जमणाऱ्या तरुणांची वृत्ति या घटनेमुळें भडकली. आजपर्यंत या तरुणाना अविचारी म्हणणारे पंडितजीहि या घटनेमुळें पुरे क्रांतिकारक बनले. येथून पुढें या क्रांतिकारक मंडळींनीं रशियन मार्गाचा

---

* केळकरकृत टिळकचरित्र: उत्तरार्ध: खं. २: भा. ५: पृ. ५३.

प्रत्यक्ष अवलंब करण्याचें ठरविलें, आणि, त्याचवेळीं कित्येकजण तत्काळ त्या उद्योगाला लागले. कलकत्ता येथील ठरावांमुळें किंचित् चिडून गेलेल्या गोखल्यांनींहि ज्या घटनेचा उघड निषेध केला, त्या घटनेमुळें देशांतील व देशाबाहेरील हिंदी तरुणांच्या वृत्ति क्षुब्ध झाल्या, यांत आश्चर्य काय!

पुढील राष्ट्रीय सभेचें अधिवेशन नागपुरास करावयाचें हें जसें कलकत्ता येथेंच ठरलें, तसेंच नागपुरास अध्यक्ष कोणाला करावयाचें हेंहि कित्येकांनीं तेथेंच ठरविलें होतें. फेरोजशहा मेथाप्रभृति मंडळींनीं हा मान रासबिहारी घोष यांना द्यावयाचा असें ठरवून टाकलें होतें. जानेवारी महिन्यापासून नागपूरच्या मंडळींची कॉंग्रेसच्या अधिवेशनाविषयींची खटपट सुरू झाली. मेथांनीं कांहींहि ठरविलें असलें तरी, अखेरीस अध्यक्षाची निवड स्वागत-समितींतल्या बहुमतानें व्हावयाची होती. फेब्रुवारी महिन्याच्या शेवटीं नागपुरास स्वागतसमिति बनविण्यासाठीं पहिली सभा झाली. या सभेपासूनच तेथील नेमस्त पुढारी व जहाल तरुण यांच्यामधील मतभेदाचें प्रदर्शन सुरू झालें होतें. टिळकांना या अधिवेशनाचे अध्यक्ष करावें, असें नागपूरच्या तरुण मंडळींचें ठाम मत होतें. स्वागतसमितीच्या सभासदांच्या हें बहुमतानें अध्यक्षाची निवड व्हावयाची असल्यामुळें, हे दोन्ही पक्ष आपल्या मताच्या सभासदांची स्वागतसमितींत भरती करण्यासाठीं झटत होते. लालाजींच्या हद्दपारीमुळें उत्पन्न झालेल्या क्षोभाचा या उत्सवांवरहि परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. नव्या मताची तरुण मंडळी सभासदत्वाची फी देऊन भराभर सभासद होऊं लागली. सुरक्षित ठिकाण म्हणून आपण नागपूरची निवड केली, पण, शेवटीं ही निवड अंगलट येणार कीं काय, अशी चिंता मेथाप्रभृतींना वाटूं लागली.

मोर्लेसाहेब अधिकाराचा हप्ता देणार म्हणून खूप गाजावाजा झाला होता. अल्पसे अधिकार द्यावे असें मोर्ले यांच्या मनांतहि होतें, तेवढे तरी अधिकार पदरांत पडले म्हणजे मिळविली असें मानणारे नेमस्त पुढारी त्या धोरणानें वागत होते. पण, देशांत चालू असलेल्या या आंदोलनामुळें शेवटीं मोर्ले-साहेबांच्या सुधारणा या वेळीं गुलदस्तांतच राहिल्या! मोठ्या हिकमतीनें त्यांनीं ऑगस्ट महिन्याच्या शेवटीं इंडिया कौन्सिलवर दोन हिंदी सभासद नेमून घेतले. ते नेमतानाहि त्यांनीं हिंदु-मुसलमान हा भेद पाळिलाच! या

सर्व प्रकारांचें वर्णन करण्यासाठीं टिळकांनीं ३–९–१९०७च्या केसरीच्या अंकांत 'टोणग्याचें आचळ' हा लेख लिहिला. अखेर मोर्लेसाहेबांनीं देखील लोकांची साफ निराशा केल्यामुळें, त्यांचे गोडवे गाणारे नेमस्त या प्रकरणीं चांगलेच उघडे पडले!

या वर्षी सप्टेंबरच्या सुमारास टिळकांचा मुक्काम सिंहगडावर असतांना, हेन्री नेव्हिन्सन् या इंग्रज पत्रपंडितानें तेथें जाऊन त्यांची भेट घेतली. या पत्र-पंडितानें काढलेलें टिळकांचें शब्दचित्र त्याच्या 'न्यू स्पिरिट इन् इंडिया' या पुस्तकांत प्रसिद्ध झालें आहे. या पत्रपंडिताशीं बोलतांना टिळकांनीं आपल्या राजकीय धोरणाचा जो खुलासा केला तो अत्यंत महत्त्वाचा आहे. जहाल म्हणून ओळखले जाणारे– आणि व्यक्ति या दृष्टीनें बंडखोरीलाहि मनानें तयार असणारे– टिळक व्यवहाराच्या दृष्टीनें केवढे थोर, वास्तववादी मुत्सद्दी होते हें या पत्रपंडितानें लिहून ठेविलेल्या मजकुरांतील पुढील भागावरून* स्पष्ट होत आहे :

आजच इंग्रजांचें राज्य सर्वस्वी झुगारून द्यावें असें म्हणणारांचा पक्ष फारच लहान आहे. शिवाय अगदीं दूर भविष्यकाळीं घडणाऱ्या या गोष्टी! त्यांच्या-शीं आम्हांला आज काय कर्तव्य! आमच्या हातीं शस्त्र नाहीं, आमच्या-आमच्यांत ही अशी फूट, संघटना कसलीच नाहीं, आम्ही तें इंग्रजांचें अधिराज्य कसें डळमळविणार! देशाच्या राज्यकारभारांत अखेरीस आम्हांला मोठा अधिकार मिळावा, एवढाच आमचा उद्देश! झालेच तर 'होमरूल' सारखी म्हणजे स्वतंत्र पण संयुक्त अशा प्रांतिक सरकारांची मिळून एखादी संघटना होईल; पण, यालाहि झालें तरी कांहीं पिढ्या जाव्या लागतील.

टिळकांनीं या इंग्रजाबरोबर हिंडून त्याला सारा सिंहगड दाखविला; पण, गड दाखवितांना टिळकांचें सारें लक्ष त्या गडाच्या लढाऊ परंपरेशीं खेळत होतें. या प्रसंगापूर्वी कांहीं वर्षे टिळक जुन्नर येथें गेले होते. शिवनेरी किल्ला पाहून 'हा किल्ला पंधरा दिवस तरी लढविला येईल' हे उद्‌गार त्यांच्या तोंडून सहज निघाले होते! नेव्हिन्सनबरोबर सिंहगडावर हिंडतांनाहि टिळकांच्या मनांत याच पद्धतीचे विचार घोळत असले, तर नवल नाहीं. टिळकांच्या

* केळकरकृत टिळक-चरित्र : उत्तरार्ध, खं. २ : भा. ५ : पृ. ४९–५०

मनाची ही ठेवण लक्षांत घेऊन आणि टिळकांनीं या भेटींत काढिलेले 'हिंदी लोकांच्या हिताकरितां निर्वाणपदावर उभे रहाण्याची तयारी आम्हीं केलेली आहे' हे उद्‌गार स्मरून, नेव्हिन्सनसाहेबांनीं टिळकांच्या सगळ्या व्यक्तिमत्वाचें वर्णन एका वाक्यांत केलें आहे. 'समरांगण हें त्यांना आनंदभुवन वाटतें' हेंच तें वाक्य होय.

इकडे सिंहगडावर टिळक व नेव्हिन्सन यांच्या गांठीभेटी होत होत्या त्याच वेळीं तिकडे नागपूर शहरांत टिळकांचे अनुयायी आपला हा नेता राष्ट्रीय सभेचा अध्यक्ष होऊं शकतो कीं नाहीं, या खटपटींत गढून गेले होते. सप्टेंबर महिना उजाडला त्या सुमारास नागपूरच्या स्वागतसमितीच्या सभासदांची संख्या २६०० पर्यंत गेली होती. नेमस्त पक्षाचे सभासद ८०० नोंदले गेले होते व नवीन पक्षाचे १८०० दों नोंदले गेले होते. कोणत्याहि पक्षाला आपल्याला हवा असलेला अध्यक्ष निवडून आणण्याला लागणारें बहुमत मिळालेलें नव्हतें. पण, नवीन मताच्या सभासदांची संख्या भरभक्कम असल्या-मुळें, टिळक अध्यक्ष झाले पाहिजेत असा त्यांचा आग्रह होता. या प्रश्नाचा नीट निकाल लागल्याशिवाय, सभासदांची वर्गणी म्हणून त्यांनीं जमा केलेले ४५ हजार रुपये हातचे सोडण्याची त्यांची तयारी नव्हती. कांहीं झालें तरी टिळकांना अध्यक्षपद द्यावयाचें नाहीं असा नागपूरच्या नेमस्तमंडळींचा पण होता. यामुळें सभांवर सभा भरत होत्या. मध्यस्थी करून हें प्रकरण मिट-विण्याचे प्रयत्न चालू होते; पण, प्रश्न सलोख्यानें मिटण्याचा संभव दिसेना. २२-९ रोजीं नागपूरच्या 'टाउन हॉल'मध्ये भरलेल्या सभेंत शेवटीं दगडफेक होण्यापर्यंत मजल गेली. पुढें काय करावें याविषयीं मार्गदर्शन करण्यासाठीं कोणी तरी मनुष्य पाठवा, अशी तार नागपूरच्या तरुण मंडळींनीं टिळकांना केली; पण, नागपुरास काय चाललें आहे व टाउन हॉलमधील सभेच्या वेळीं काय घडण्याचा संभव आहे हें ओळखून, तार मिळण्याच्या आधींच टिळकांनीं एक मनुष्य रवाना केला होता.

या वर्षीच्या गणेशोत्सवांत टिळकांनीं पुण्यांत जीं व्याख्यानें दिलीं त्यांत त्यांच्या मनांत उसळणारा संताप एकसारखा व्यक्त होत होता. स्वदेशी-बहि-ष्काराची चळवळ नेटानें व स्वार्थत्यागपूर्वक चालवून, जगाच्या चावडीवर स्वाभिमानी राष्ट्रांतील नागरिक म्हणून बसण्याचा अधिकार प्रस्थापित करा, हेंच

या भाषणाचें सार आहे, पण, या भाषणात उमटलेल्या शब्दामागें विलक्षण निर्धार आहे असें स्पष्ट दिसतें. **'सध्यांची स्थिति जर तुम्हांस असह्य झाली नसेल तर हें राष्ट्र जितक्या लवकर मरेल तितकें बरें! कृतघ्न लोकांनीं या भूमाला भार होण्यापेक्षां दुसरे कोणी येऊन ती सनाथ करतील'** हे उद्गार* नमुना म्हणून लक्षात ठेवण्यासारखे आहेत

अशा रीतीनें लोकांचें नि लोकमान्यांचें चित्त प्रक्षुब्ध होऊन गेलें होतें त्या सुमारासच अंगाचा दाह करणारें आणखी एक प्रकरण उद्भवलें वीरनवाली नावाची १७ १८ वर्षांची हिंदु स्त्री एकटीच प्रवास करताकरता अपरात्रीं रावळपिंडी स्टेशनवर उतरली. तिला एकटीला असहाय स्थितींत पाहून अँग्लोइंडियन स्टेशनमास्तर मूर व त्याचा एक मुसलमान हस्तक या दोघानीं तिच्यावर पशुवत् बलात्कार केला. हें प्रकरण कोर्टात गेल्यावर मूरनें बेशरमपणानें असें सांगितलें कीं, चारदोन आण्याचे पैसे दिसताच ही बाई आपल्याला वश झाली! ब्रिटिश कोर्टात मूर निर्दोषी ठरला! इहलोकीं न्याय मिळेल अशी आशा न उरल्यामुळें, आत्महत्या करून, हिंदुस्थानात पौरुषाचा ऱ्हास झाला आहे हें वीरनवालीनें जगजाहीर केलें!

या प्रकरणाचा शेवट व्हावयाचाच होता त्या सुमारास टिळक कर्नाटकात दौऱ्यावर गेले वीरनवालीची कहाणी ऐकून टिळकांच्या चित्ताला फार खोल जखम झाली होती, हें दे म गंगाधररावजी देशपांडे यांनीं आपल्या आठवणींत† सांगितलें आहे टिळक या वेळीं कर्नाटकात गेले होते ते कै अण्णासाहेब किर्लोस्करांचे बंधु श्री गणपतरावजी यांच्या आग्रहावरून गेले होते. प्रा शि म परांजपे हेहि त्यांच्याबरोबर होते कर्नाटकातील पुढाऱ्यांनीं श्रीचिदंबरेश्वराच्या उत्सवाच्या निमित्तानें टिळकांना बोलाविलें होतें धारवाड, गुर्लहोसूर, सौंदत्ती, बैलहोंगल, मुरगोड इत्यादि गावीं व्याख्यानें देऊन टिळक शेवटीं बेळगावास आले मराठेशाहींतले शेवटचे रणशूर सेनापति बापू गोखले यांचा या भागाशीं निकट संबंध होता ही गोष्ट टिळकांना अवगत असल्यामुळें, त्यांनीं आस्थेनें बापू गोखले यांचा वाडा पाहिला आपल्या

---

* केळकरकृत टिळक-चरित्र . उत्तरार्ध, ख २ : भा ५ . पृ २८

† आठवणी व आख्यायिका . ख. २ . पृ. २२.

तोफांबरोबर चाललेला २५।३० घोडेस्वारांचा थाट पाहून टिळक म्हणाले: गुर्लहोसूरच्या बापू गोखल्यांची स्वारी आपले गुरु दीक्षित यांच्या दर्शनास व भेटीस येत असे तेव्हांप्रमाणेंच हा देखावा दिसत आहे. टिळकांचे हे शब्द ऐकून गंगाधरराववजी देशपांडे यथार्थ आदरानें म्हणाले*: स्वराज्यासाठीं धारातीर्थी देह ठेवणारा बापू गोखले आजहि नाहीं; पण, परिवारांत रावबाजीच अद्यापि पुष्कळ आहेत! गुर्लहोसूर गांवीं टिळकांचा मुक्काम होता तेव्हां त्यांना कळलें कीं, बेळगांवचा कलेक्टर मॅकन याचा मुक्काम जवळच आहे. मॅकनची गांठ घेण्याचें टिळकांच्या मनांत आलें. चिठी पाठविली नि नकार मिळाला तर तो टिळकांचा अपमान ठरेल असें गंगाधररावजी देशपांडे यांना वाटलें! साहेब आपल्याला भेटायला उत्सुक असतात; पण, भेटायची त्यांना भीति वाटते हें साहेबांचें मर्म टिळकांना माहीत होतें. म्हणून 'चिठी धाडाच' असें त्यांनीं देशपांडे यांना सांगितलें. साहेबानें टिळकांचें स्वागत करण्याची तत्परता दाखविली. 'आपण सर माझ्या जिल्ह्यांत युद्ध धुमाकूळ मांडला आहे' असें साहेब विनोदानें इंग्रजींत म्हणाला. टिळकांनीं हजरजबाबीपणानें उत्तर दिलें: जिल्हा तुम्हांला आंदण थोडाच दिला आहे! 'ओरायन' व 'आर्क्टिक होम' या ग्रंथांत माझी चांगलीशी गति होत नाहीं असें साहेबानें मोकळ्या मनानें सांगितलें.† 'जवळजवळ १२ वर्षांच्या श्रमाची हीं पुस्तकें आहेत. थोडेंबहुत संस्कृताचें, ज्योतिषाचें ज्ञान असल्याखेरीज हा विषय समजणें कठीण आहे' असें टिळक म्हणाले.

या सुमारास पुण्यास व मुंबईस पैसाफंड गोळा करण्याचें काम सुरू होतें. मुंबईस शांतारामाच्या चाळींत टिळकांनीं या विषयावर एक व्याख्यान दिलें. डॉ. भांडारकरांकडे पैसाफंडाचे स्वयंसेवक गेले असतांना, डॉक्टरमहाशयांनीं फंडावर कांहीं आक्षेप घेतले, असें टिळकांना समजलें. स्वतः भांडारकरांकडे जाऊन त्यांनीं फंडासाठीं वर्गणी मिळविली, खिशांतल्या पावतीपुस्तकांतली पावती फाडून दिली व अशा तऱ्हेनें पैसाफंडाच्या चोख कारभाराविषयीं त्यांनीं गुरुवर्यांची खात्री पटविली. या सुमारास—म्हणजे ऑक्टोबर महिन्यांत—

* आठवणी व आख्यायिका: खं. २: पृ. २०.
† आठवणी व आख्यायिका: खं. २: पृ. २१.

ग्लंडमधील मजूरपुढारी केरहार्डी हे पुण्यास आले होते. पुण्यांत त्यांचें आगत-स्वागत झाल्यावर टिळक व केळकर हे त्यांना घेऊन शिवापुरास गेले होते.

नागपुरास काँग्रेस भरविणें अशक्य आहे आणि तो भरविलीच व टिळकांना अध्यक्ष केलें नाहीं तर येथील तरुण मंडळी काय करतील याचा नेम नाहीं, असें पत्र नागपूरचे नेमस्ताग्रणी रा. ब. वामनरावजी कोल्हटकर यांनीं ऑक्टोबर महिन्यांत मेथांकडे रवाना केलें. काँग्रेसचें संकल्पित ठिकाण आपण आपल्या एकट्याच्याच अधिकारांत बदललें तर तें बरें दिसणार नाहीं हें ओळखून, मेथाजींनीं नागपूरच्या उभयपक्षीय प्रमुखांना मुंबईस बोलावून घेतलें व इतरहि ठिकाणच्या कांहीं पुढाऱ्यांना त्यांनीं मुंबईस बोलाविलें. दि. ७-८ नोव्हेंबरच्या सुमारास या मंडळींपैकीं पुष्कळांचा तळ त्या वेळीं सिताराम बिल्डिंगमध्यें असलेल्या सरदारगृहांत पडला. मेथांच्या निमंत्रणावरून टिळकहि मुंबईस गेले होते. मेथांनीं प्रथम नागपूरच्या मंडळींना बोलावून घेतलें. डॉ. मुंजे या सभेला निघाले तेव्हां टिळकांनीं त्यांना कोणता सल्ला दिला हें डॉक्टर-महाशयांच्या स्वतःच्याच शब्दांत सांगणें शक्य आहे. डॉक्टरसाहेब लिहितात :* टिळक म्हणाले, सांभाळा. मेहता मोठे युक्तिबाज आहेत व वादविवादांत प्रतिपक्षास झटकन् पकडतात. केव्हांकेव्हां दरडावून बोलून भेवडावण्याचाहि प्रयत्न करतात; तेव्हां तुम्ही आपलें म्हणणें थोडक्यांत व मुद्देसूद मांडून त्यांच्याशीं वाद करण्याचे मोहांत पडूं नका...वादाच्या जाळ्यांत सापडूं नका. थोडेंच बोला; पण मुद्दा सोडूं नका. मुंजे यांना असा उपदेश केल्यावर, मेथांनीं तडजोडीचें बोलणें सुरू केलें तर सुरेंद्रबाबूंचें नांव स्वीकारा असेंहि टिळकांनीं सांगितलें. मुंजे मेथांना भेटले तेव्हां त्यांनीं मुंजांना हरतऱ्हेनें अड-विण्याचा प्रयत्न केला. 'तुम्हांस टिळकच कां हवेत, रासबिहारी कां नकोत' या मेथांच्या प्रश्नाला मुंजांनीं 'ही आमची पसंती होय' असें तोकडें पण स्पष्ट उत्तर दिलें. यामुळें मेथा गरम झाले ! या प्रश्नाचा कमिटींत विचार करावा लागेल असें त्यांनीं मुंजांना सांगितलें व मुंजांची बोळवण केली.

दि. १०-११-१९०७ रोजीं मेथाजींच्या निवासस्थानीं कमिटीची सभा झाली. ही सभा नांवाचीच होती. काय घडवून आणावयाचें हें मेथांनीं

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ५०१.

'अध्यक्षपद मला नको' असें त्यांच्याच तोंडून वदविलें तर प्रतिपक्षाच्या तटबंदीचा एक मोठाच बुरूज ढासळल्यासारखा होईल, असें गोखले यांनीं मनांत ठरविलें! आणि त्यांचें भाग्य असें कीं, *लालाजींनीं त्यांच्या म्हणण्याला* मान्यता दिली! बरोबरीच्या इतर मंडळींना न विचारतां विनयशील लाला-जींनीं हा निर्णय घेतला हें टिळकांना रुचलें नाहीं. पण, गोष्ट होऊन गेली होती! तथापि, अखेरपर्यंत स्वस्थ बसावयाचें नाहीं असें टिळकांनीं ठरविलें! जेथें कॉंग्रेस व्हावयाची तेथील लोकांना आपल्याकडे वळवून घेतलें पाहिजे, दोन पक्षांतील मामुली लढ्याला आतां लढाईचेंच स्वरूप आलेलें असल्यामुळें प्रतिपक्षी आपली सर्व बाजूंनीं नाकेबंदी करूं पहातील तिचाहि बंदोबस्त केला पाहिजे, हें ओळखून टिळकांनीं आपले उद्योग सुरू केले, ठिकठिकाणच्या लोकांनीं जास्तींत जास्त संख्येनें सुरतेस यावें असें त्यांनीं आपल्या खात्रीच्या लोकांना कळविलें. पण, सहज रागावणाऱ्या आणि बेभान होणाऱ्या तरुणांना मात्र त्यांनीं सुरतेस जाण्याला प्रोत्साहन दिलें नाहीं. 'मी येऊं का' असा प्रश्न श्री. गणपतराव नामजोशी यांनीं टिळकांना विचारला तेव्हां टिळकांनीं त्यांना पुढील उत्तर* दिलें: **यंदांच्या कॉंग्रेसला तुझ्यासारख्यानें न येणेंच बरें. कारण तेथें मारामारी होण्याचा रंग दिसत आहे व तुझ्यासारख्यानें तेथें येणें म्हणजे मारामारीस प्रोत्साहन देण्या-सारखेंच आहे.**

श्री. दादासाहेब खापर्डे हे वृत्तीनें शांत, वाणीनें गोड व स्वभावानें विनोदी असल्यामुळें आणि गुजराथी भाषेंतहि वक्तृत्व गाजविण्याचें सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं असल्यामुळें, टिळकांनीं त्यांना कॉंग्रेसच्या सुरवातीपूर्वी कांहीं दिवस सुरतेस रवाना केलें. दि. १५-१२ रोजीं मुंबईस करीरोडभागांत टिळकांचें गिरणीमजुरांपुढें स्वदेशीवर व्याख्यान झालें. या सुमारास सुरत गाजूं लागलीच होती! उभयपक्षांचीं आघाडीचीं दळें तेथें जमूं लागलीं होतीं आणि आपापल्या परीनें प्रतिपक्षावर मात करण्याची सिद्धता तीं करीत होतीं!

कॉंग्रेसच्या मार्फत व्यक्त होणाऱ्या मताची तार किती खेंचली जावी या मुद्द्यासंबंधींचा लढा इकडे अशा रीतीनें रंगत होता; तर, आपल्या वैयक्तिक

* आठवणी व आख्यायिका : खं. १ : भा. १ : पृ. ८६.

जबाबदारीवर असल्या मार्गाचे उल्लंघन करून फार पलीकडे जाणारी तरुण मंडळी वेगळेच उद्योग करण्यांत गुंतली होती. युरोपमध्ये बाँबची विद्या शिकलेले हेमचंद्र दास हे यापूर्वीच बंगालमध्ये दाखल झाले होते. या मार्गाने चालणाऱ्या तरुणांचे पहिलेपहिले प्रयोग या सुमारास सुरू झाले होते. दि. ६-१२-१९०७ रोजी मिदनापूरजवळ बाँबचा उपयोग करण्यांत आल्यामुळे, ले. गव्हर्नरची गाडी रुळांवरून पडली होती. सुरतेच्या काँग्रेसचे अध्यक्षस्थान भूषविण्यासाठीं बंगालमधून निघालेले डॉ. रासबिहारी घोष हे वाट चालत होते तोंच-म्हणजे दि. २३-१२ रोजीं- डाका आणि कलकत्ता यांच्या दरम्यान, डाका येथील भूतपूर्व डि. मॅजिस्ट्रेट मि. अॅलन यांच्यावर पिस्तूल झाडण्यांत आले! भोंवताच्या हवेंत हे आवाज निघत होते अशा वेळीं राष्ट्रीय सभेंतील नवा पक्ष व जुना पक्ष हे युयुत्सुवृत्तीने सुरत येथे गोळा झाले होते!

## पर्व दहावें : : : सुरतेचा अपूर्व संग्राम

सुरतेची राष्ट्रीय सभा हें टिळक-भारतांतील एक महापर्व होय.

—न. चिं. केळकर

सुरतेची राष्ट्रीय सभा डिसेंबरच्या दि. २६ ला सुरू होईल व तिचें काम दि. २८ ला संपेल असें जाहीर झालें होतें. फ्रेंच गार्डन या जागीं सभेचा मंडप उभारण्याचें काम चाललें होतें. उभयपक्षांतील बहुत मंडळी या अधिवेशनाला येणार हें निश्चित असल्यामुळें, या जागेवर चांगला प्रशस्त मंडप उभारण्यांत येत होता. एकंदर ८-१० हजार लोक मावूं शकतील एवढा हा मंडप होता. मंडपाला शोभा यावी म्हणून सवय ती योजना केली जात होती. सुरतेची प्रमुख मंडळी व स्वागताध्यक्ष श्री. माळवी हे मेथापंथांतले असल्यामुळे, त्या पंथांतल्या लोकांची गैरसोय कांहींच होण्यासारखी नव्हती. राष्ट्रीय

पक्षाची नाकेबंदी करण्याचे या पक्षाचे उद्योग मात्र व्यवस्थित चालले होते. राष्ट्रीय पक्षाच्या मंडळींना निवासस्थान मिळू नये, मिळालें तर तें त्यांच्या हातीं राहू नये असे उद्योग या पक्षातल्या मंडळींनीं सुरू केले. राष्ट्रीय सभेची चौकशी करीत स्टेशनवर उतरलेला माणूस राष्ट्रीय पक्षाचा असेल अशी नुसती शंका आली तरी, स्टेशनवर ठेवण्यात आलेले स्वयंसेवक त्याला धड माहितीहि देत नसत स्वयंसेवकांच्या या अपूर्व सेवावृत्तीमुळें, मद्रास वगैरे कांहीं प्रांतांतल्या राष्ट्रीय वृत्तीच्या लोकांची फार गैरसोय झाली.

लढ्याला लढाईचें स्वरूप आल्यामुळें, चांगलींचांगलीं माणसेंहि Nothing is unfair in love and war (प्रेमकारण नि रणकारण या बाबतींत सूक्तासूक्त विचार वर्ज्य होय) या तत्त्वाप्रमाणें वागू लागलीं! टिळकांनीं लेखनांत वापरलेला 'मवाळ' हा शब्द विकृत करून मुंबईच्या कांहीं मंडळींनीं सुरतेंत असा प्रचार केला कीं, टिळक गुजराथी समाजाला गालिप्रदान करीत आहेत. शेजारशेजारच्या प्रांतांतून भिन्नभिन्न बोली असते व त्यामुळें एका भागांतली बोली दुसऱ्यांतली गाली सहज ठरू शकते! पण, लढाईचा आवेश अंगांत संचरला असल्यामुळें, हा विवेक करायला कोणाला सवडच नव्हती! सुरतेस आल्यावर पहिले एकदोन दिवस टिळकांना या विपर्यासाचें निराकरण करावें लागलें.

लाला लजपतराय हे दि २१ ला सध्याकाळीं मुंबईस पोंचले त्यापूर्वीच टिळक मुंबईस जाऊन राहिले होते नेमस्ताग्रणींनीं लालाजींचें स्वागत केलें नाहीं तरी, हें स्वागत अत्यंत थाटानें व्हावें अशी व्यवस्था टिळकांनीं केली होती व ती त्यांनीं स्वतःच्या देखरेखीखालीं पार पाडली. दि २२ ला रात्रीच्या गाडीनें लालाजी मुंबईहून निघाले एक दिवस अहमदाबादला राहून ते परत सुरतेस येणार होते. टिळक दि. २२ ला मुंबईहून निघाले नि दि २३ ला सकाळीं सुरतेस पोंचले बाबू अरविंद घोष हे याच दिवशीं सुरतेस पोंचले सुरत म्हणजे आपला बालेकिल्ला असें मेथांना वाटत असलें तरी, या बालेकिल्ल्यांतहि टिळकांचें अपूर्व स्वागत झालें सुरतेस आल्याबरोबर टिळकांनीं 'काय झालें, काय नाहीं' याचा तपास केला. नेमस्तातर्फे दि ब. अंबालाल साकरलाल आणि अली महंमद भिमजी यांचीं नि आपल्या पक्षातर्फे श्री. खापर्डे यांचीं अशीं दुतर्फी व्याख्यानें चालू असल्यामुळें सुरतेचें लोकमत जागृत झालें आहे.

असें त्यांना दिसलें. काँग्रेसपुढें येणाऱ्या ठरावांचा मसुदा तयार करण्याचा अधिकार स्वागत कमिटीकडून काढून गोखले यांनीं तो आपल्याकडे घेतला; पण, त्यांनीं हा मसुदा अद्याप प्रसिद्ध केला नाहीं हेंहि त्यांच्या लक्षांत आलें.

सुरतेस पोंचल्यावर त्याच दिवशीं संध्याकाळीं टिळकांनीं जाहीर व्याख्यान देण्याचें ठरविलें. बालाजीची टेकडी म्हणून एक ठिकाण सुरतेस आहे तेथील विस्तृत मैदानांत खापर्डे यांचीं व्याख्यानें यापूर्वी होत होतीं; तेथेंच व्याख्यान देण्याचें टिळकांनीं ठरविलें. आपल्या आग्रहामुळें काँग्रेस मोडावी असें टिळकांना मुळांतच वाटत नव्हतें; शिवाय, ते सुरतेस आले तत्पूर्वीच थोडे दिवस, त्यांना वेडरबर्नसाहेबांकडून एक पत्र आलें होतें. अशा वडील माणसांच्या उपदेशाचा योग्य तो मान टिळक ठेवीत असल्यामुळें, अखेरपर्यंत पूर्ण अदबदारीनें व शांतपणानें वागावयाचें असें त्यांनीं ठरविलें होतें. सुरत येथील पहिल्याच व्याख्यानांत टिळकांनीं राष्ट्रीय पक्ष कशासाठीं अवतरला आहे याचें विवेचन केलें. राष्ट्रीय सभेंत फूट न पडतां कलकत्त्याच्या ठरावांची पीछेहाट टाळण्याचा आपण शक्य तो प्रयत्न करणार असल्याचें त्यांनीं सांगितलें.

दि. २४ रोजीं सकाळीं लाला लजपतराय सुरतेस आले. स्टेशनवर त्यांचें मोठें थाटाचें स्वागत करण्यांत आलें. त्यांच्या गाडीचे घोडे सोडून ती स्वयंसेवकांनीं रस्त्यांतून ओढीत नेली. अंगावर हारांचा भार वहात, हात जोडून, लालाजींना उभें राहून सर्वांना दर्शन द्यावें लागत होतें. गोखले यांनीं मिरवणुकींत आपल्या गाडींत बरोबर असावें अशी लालाजींची इच्छा होती; पण सुरतेंतील सर्वसामान्य लोकमताची कल्पना गोखल्यांना आलेली होती. त्यामुळें ते या भानगडींत पडले नाहींत. भिन्नभिन्न प्रांतांतून आलेल्या ५००।६०० प्रतिनिधींच्या विचारांत आगाऊ ऐकमत्य निर्माण करणें अवश्य आहे; तसें केलें नाहीं तर मेथाजींच्या कडेकोट तयारीविरुद्ध आपला टिकाव लागणार नाहीं, ही गोष्ट राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांना चांगली अवगत होती. त्यामुळें, नव्या पक्षाच्या सर्व प्रतिनिधींनीं सभा दि. २४ रोजीं होणार असल्याचें आगाऊच जाहीर करण्यांत आलें होतें.

या सभेचें काम बाबू अरविंद घोष यांच्या अध्यक्षतेखालीं सुरू झालें. नेमस्त पक्षाशीं समेट करूं नये असें बंगालमधील कित्येक मंडळींचें म्हणणें होतें व महाराष्ट्रांतलीहि कांहीं मंडळी या मताचा पुरस्कार करूं लागली होती.

राष्ट्रीय पक्षानें मिथ्या 'मवाळां'चे नादीं न लागतां आपली स्वतःची, काँग्रेस काढावी, असें बाबू शामसुंदर चक्रवर्ती यांनीं जोरदार रीतीनें प्रतिपादिलें. या सर्व चर्चेनंतर टिळकांनीं I am after all a compromise-walla (कांहीं झालें तरी मी तडजोडवादी आहें,) असें सांगून, राष्ट्रीय पक्षानें काँग्रेसमध्येंच राहिलें पाहिजे, असें बजाविलें. बाबू अरविंद घोष हे स्वतंत्र काँग्रेसच्या कल्पनेचे पुरस्कर्ते होते. पण, टिळकांच्या शहाणपणावर त्यांचा पूर्ण विश्वास होता. म्हणून त्यांनीं आपलें मत बाजूस ठेविलें व नेमस्तांशीं वाटाघाटी करण्यांच्या टिळकांच्या कल्पनेला मान्यता दिली.* या चर्चेनंतर टिळक, खापर्डे, चिदंबरम् पिळे, डॉ. मुंजेप्रभृतींची एक समिति वाटाघाटी करण्यासाठीं नेमण्यांत आली. पुढील सर्व व्यवस्था व योजना पार पाडण्याचें काम कांहीं मंडळींकडे सोंपविण्यांत आलें.

या दिवशीं सायंकाळीं टिळकांनीं फिरून एक जाहीर व्याख्यान दिलें. टिळकांनीं केसरींत गुजराथी समाजाची बदनामी केली आहे, दोन वेळां सुरतेची लूट करणाऱ्या शिवाजीचें काम पूर्ण करण्यासाठींच टिळक सुरतेस आले आहेत, अशा आशयाचीं पत्रकें शहरांत वांटण्यांत आलीं होतीं. या आक्षेपांचें निरसन करून टिळक म्हणाले : लिहिणारांनीं गुन्हा माझ्या पदरांत सरी घालावा; नाहीं तर माफी तरी मागावी. टिळकांच्या व्याख्यानानंतर खापर्डे यांनीं गुजराथींत टिळकांचें म्हणणें स्पष्ट करून सांगितल्यामुळें, दुष्ट प्रचारामुळें बिथरलेलें लोकमन या दिवशीं बरेंच ठिकाणावर आलें.

काँग्रेस सुरू होण्याच्या आदल्या दिवशीं ठिकठिकाणचे सर्व प्रतिनिधि जागोजागीं येऊन राहिले होते. टिळक व त्यांचें अनुयायित्व स्वीकारणारे नागपूर-पुण्याकडचे प्रतिनिधि दंगेखोर आहेत असा भ्रम गांवभर करण्यांत आला होता. हातांत काठी घेण्याची या मंडळींची संवय नित्याचीच असूनहि, सुरतेच्या वातावरणांत या साध्या संवयीचा विपर्यास झाला. महाराष्ट्रीय मंडळींनीं सुरतेच्या बाजारांतल्या काठ्या महाग केल्या, असा बोभाटा करण्यांत आला. काँग्रेसच्या स्वागत समितीनें मंडपांत प्रतिनिधींची बसण्याची व्यवस्था ठरवितांनाहि, अगदीं बारीक लक्ष पुरविलें. नागपूर-वऱ्हाडकडची

---

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ३२१.

मंडळी व पुण्याकडील मंडळी यांचा संयोग होऊं नये आणि त्यांना मंडपांत पुढेंहि जागा मिळूं नये, म्हणून प्रतिनिधींच्या जागेंत मागच्या बाजूच्या दोन भिन्न कोपऱ्यांत या मंडळींना कोंडण्यांत आलें होतें.

समेटाच्या वाटाघाटी करण्यासाठीं नियुक्त झालेली टिळकप्रभृति मंडळी सर्व दिवसभर पायपिटी करीत, दुसऱ्या पक्षांतल्या प्रमुखांना भेटण्याची खटपट करीत होती; तर या पक्षांतील तालेवार मंडळी टिळकप्रभृतींना टोलवून लावीत होती! अध्यक्षाच्या निवडणुकीलाच विरोध करण्याचा हट्ट आपण धरून बसलों तर, अध्यक्ष बंगाली गृहस्थ असल्यामुळें, राष्ट्रीय पक्षांतली बंगाली मंडळी काय करतील याविषयींची शंका टिळकांना वाटूं लागली असावी. अशा प्रकारच्या मामल्यांत ठरलेल्या अध्यक्षाच्या नांवाला विरोध केला की अध्यक्षस्थानासाठीं दुसरें नांव सुचविण्याची जबाबदारी आपल्यावर येऊन पडते, हेंहि टिळक जाणून होते. लाला लजपतराय यांनीं तर आपला फेटा टिळकांच्या पायांवर ठेवून, "मला या संकटांत टाकूं नका" अशी विनंति केली होती! अशी परिस्थिति असल्यामुळें, कलकत्त्याचे ठराव टिकून राहत असतील तर अध्यक्षाच्या नांवाविषयींचा आग्रह सोडण्याचें टिळकांनीं मनांत ठरविलें असावें. समेटाची खटपट करणाऱ्या टिळकांची व सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांची बैठक झाली; तेव्हां सुरेंद्रबाबूंना टिळकांचें म्हणणें बहुतांशीं पटलें. "गोखल्यांना विचारून आखेरचें उत्तर कळवितों," असें त्यांनीं टिळकांना सांगितलें.

'धीरबाय-वाडी' या नांवाच्या प्रशस्त जागेंत राष्ट्रीय पक्षाची सर्व मंडळी तळ देऊन राहिली होती. रात्रीपर्यंत समेट झाल्याचें चिन्ह या मंडळींना दिसेना. त्यामुळें, समेट झाला नाहीं तर पुढें काय, असा प्रश्न उपस्थित झाला. रात्रभर ही मंडळी प्रायः याच प्रश्नाची चर्चा करीत होती. समेट झाला नाहीं तर अध्यक्षाच्या सूचनेला दुरुस्ती सुचवायची, असें बहुतेकांचें मत दिसूं लागलें. अशा आणीबाणीच्या वेळीं ही दुरुस्ती सुचवायला पुढें कोणी व्हावें, हाहि प्रश्न महत्त्वाचा होता. कोणा तरी सामान्य माणसानें हें काम केलें तर ती गोष्ट पोरकटपणाची दिसते; आणि, फार मोठा मनुष्य पुढें करावा तर मोहरे इरेस घातल्यासारखें होतें— अशी दुहेरी अडचण या मंडळींपुढें उभी राहिली. मंडळींची वाटाघाट चालली होती व टिळक ती लक्षपूर्वक ऐक

होते. दुरुस्ती सुचविण्याच्या बाबतींत बहुतेकांचें मत ठाम आहे आणि दुरुस्ती सुचविली तर जे कांहीं मलेबुरे परिणाम होतील ते सहन करण्याला पुष्कळशी तरुण मंडळी सिद्ध आहेत हें त्यांच्या लक्षांत आलें. तेव्हां त्यांनीं म्हटलें : दुरुस्ती सुचवावयाचीच तर ती सुचविण्याचें काम मलाच केलें पाहिजे.

दि. २६ रोजीं दुपारीं एक वाजतां कॉंग्रेसच्या अधिवेशनाला सुरवात व्हावयाची होती. सिंधमधून आलेल्या प्रतिनिधींपैकीं एकजण या दिवशीं मरण पावल्यामुळें, सुरवातीला थोडा विलंब होईल, असें दिसत होतें. सकाळीं मिळालेला वेळ टिळकप्रभृति मंडळींनीं समेटाची खटपट करण्यांतच घालविला. स्वागताध्यक्ष माळवी यांना भेटण्यासाठीं टिळक त्यांच्या निवासस्थानीं गेले; पण, या गृहस्थांची देवपूजा या दिवशीं फारच लांबल्यामुळें, टिळक शेवटीं नाइलाजानें तेथून निघाले. महाभारतांतलें कुलक्षयकारक युद्ध टळावें म्हणून श्रीकृष्णानें जशी अखेरपर्यंत शिष्टाई चालविली होती तशीच शिष्टाई टिळकांनीं या प्रसंगींहि चालविली. 'जास्त कांहीं नको; फक्त पांच गांव आम्हांला द्या' असें म्हणणाऱ्या पांडवांप्रमाणेंच, सर्व प्रकारचे आग्रह सोडून, 'माघार घेऊन राष्ट्राचा तेजोभंग करूं नका' इतकीच मागणी टिळकांनीं शिल्लक ठेविली होती. पण, सुईच्या अग्रावरील मृत्तिकाहि पांडवांना मिळणार नाहीं असें म्हणणाऱ्या कौरवश्रेष्ठानें

यावद्धि तीक्ष्णया सूच्या विध्येदग्रेण केशव।
तावदप्यपरित्याज्यं भूमेर्नः पाण्डवान्प्रति ।

हे शब्द उच्चारतांना जो चढेलपणा व्यक्त केला तोच नेमस्ताग्रणींनीं व्यक्त केल्यामुळें, परिणाम कांहींहि होवोत, अध्यक्षाच्या सूचनेला दुरुस्ती सुचवावयाची असें टिळकांनीं ठरविलें.

अडीच वाजतां कॉंग्रेसच्या अधिवेशनाला सुरवात होणार तत्पूर्वीच कांहीं वेळ कॉंग्रेसचा मंडप माणसांनीं गजबजून गेला होता. स्वागतसमितीनें बंदोबस्त अगदीं कडक ठेविला होता. सिंधच्या प्रतिनिधींसाठीं राखून ठेविलेल्या जागेंत मोकळी जागा पुष्कळच असल्यामुळें, कांहीं महाराष्ट्रीय सभासद त्या ठिकाणीं बसूं पहात होते; पण, त्यांना मज्जाव करण्यांत आला. अध्यक्षांच्या खुर्चीच्या मागें दुतर्फा चारपांचशें मंडळी बसली होती. गुजराथ व मुंबई

येथील स्वागतसमितीच्या सभासदांना ही जागा देण्यांत आली होती. अध्यक्षांच्या खुर्चीच्या भोंवती ज्या इतर खुर्च्या होत्या त्या फेरोजशहा मेथांच्या प्रभावळींत नांदणाऱ्या नेत्यांनी अडविल्या होत्या. टिळकांना या उच्चस्थानीं जागा देण्यांत आली नव्हती. नियोजित अध्यक्ष डॉ. रासबिहारी घोष हे मेथा-व गोखले यांच्या समवेत मंडपांत शिरले. त्या वेळीं अनेक प्रतिनिधींनी अधिक्षेपाचे निदर्शक आवाज काढले. कामाला सुरवात झाली. स्वागतसमिती-चे अध्यक्ष श्री माळवी यांनी आपले भाषण वाचण्याला सुरवात केली. हे चऱ्हाट ऐकतांऐकतां श्रोते कंटाळले; पण त्यांनी गडबड केली नाहीं!

अध्यक्षाची सूचना मांडण्यासाठी पहिले वक्ते उभे राहिले ते बेताचेच होते. त्यांचे भाषण संपले. सुरेंद्रबाबू या सूचनेला अनुमोदन देण्यासाठी पुढे आले. त्यांचे भाषण सुरू झाल्याबरोबर त्यांच्या बंगाली बंधूंनीच Midnapur Traitor (मिदनापूरला विश्वासघात करणारा) हे शब्द ओरडून उच्चारा-यला आणि गडबड करायला सुरवात केली. १५।२० दिवसांपूर्वीच मिदनापूर येथे झालेल्या जिल्हासभेच्या वेळीं सुरेंद्रबाबूंनी जे वर्तन केले होते त्याचा हा परिणाम होता! बंगाली लोकांनीच सुरू केलेल्या या गडबडीला इतरांनी मदत केली. गडबड वाढत चालली! आरडाओरड्यामुळे सुरेंद्रबाबूंचा खडा आवाजहि ऐकूं येईनासा झाला. बंगभंग झाल्यानंतर हिंदुस्थानच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत गर्जत गेलेला हा मान्यवर या ठिकाणीं कुंठित झाला! सुरेंद्रबाबू टेबलावर उभे राहिले, आवाज चढवून, हातवारे करून, ते लोकांना शांत रहाण्याची विनंति करूं लागले. अध्यक्षांच्या टेबलावर निमूटपणे पडलेली घंटा जोरजोराने वाजविण्याला मवाळांनी सुरवात केली. पण, कोणी ढोल वाजविला असता तरीहि सुरेंद्रबाबूंचे भाषण ऐकण्याच्या वृत्तींत श्रोते या वेळीं नव्हते! सुरेंद्रबाबूंचा उपाय हरला! शेवटीं माळवी उभे राहिले आणि "सभा उद्यापर्यंत तहकूब झाली आहे" असें त्यांनी सांगून टाकलें!

समेट व्हावा अशी मनापासून इच्छा करणाऱ्या टिळकप्रभृति मंडळींना 'वेळ मिळाला' ही गोष्ट इष्टच वाटली. फिरून सभेविषयी चर्चा सुरू झाली. रात्रभर जागून लोकांनी या एकाच विषयाचा पिच्छा पुरविला. आतां सभेच्या कामीं पुढाकार घेऊन टिळकांनी आपला व आपल्या पक्षाचा पाणउतारा करून घेऊं नये, असें म्हणणारी मंडळीहि त्यांच्या अनुयायीवर्गांत होती. त्यांच्या

भावनाची तीव्रता टिळकाना पटत होती, पण, समेट झाला तर तीच गोष्ट हितावह आहे असें त्यांचें ठाम मत असल्यामुळें, व्यक्तीच्या मानापमानाचा प्रश्न या कामीं पुढें आणावयाचा नाहीं, असें त्यांनीं ठरविलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळींहि समेटाची बोलणीं करण्यासाठीं टिळकांनीं पुष्कळ यातायात केली; पण, पहिल्या दिवशींच्या गडबडीमुळें मेथापक्षातील लोक जास्तच घट्ट बनले होते! काय होणार असेल तें आता मडपात होईल असें मनाशीं ठरवून, मडपात येणाऱ्या लोकाचा बदोबस्त करण्याच्या उद्योगाला ते लागले होते स्वयसेवकापैकीं कित्येकजण असावे तितके बेडर नाहींत, असा सशय त्याना पहिल्या दिवशींच्या प्रकारामुळें आला होता. अशा मऊ स्वयसेवकाना रजा देण्यात येऊन, रातोरात नव्या स्वयसेवकाची भरती करण्यात आली. हे भरताड वस्तुतः स्वयसेवकाचें नव्हतें. गुडगिरी हाच ज्याचा धदा असे काहीं खलाशी व इतर लोक, पैसे देऊन नेमून घेण्यात आले होते. या भाडोत्री लोकाच्या जिवावर आपले काम निर्वेध पार पाडण्याची मेथाकपूची महत्त्वाकाक्षा होती.

तद्कूब झालेलें कौंग्रेसचें अधिवेशन दि. २७ रोजीं दुपारीं पुढें सुरू झालें. थांदल्या दिवशीं तरुण मडळींनीं सुरेंद्रबाबूच्या भापणाचे वेळीं आरडाओरडा केला, ही गोष्ट टिळकाना आवडली नव्हती. रात्रीं तरुण मडळी भेटली तेव्हा त्यानीं त्याची समजूत घातली होती. कोणी अगावर हात टाकीत नाहीं तोंवर दगडासारखे स्वस्थ रहा, असें त्यानीं सर्वांना बजाविलें होतें. टिळकाच्या इच्छेप्रमाणें वागण्याचें सर्वांनीं ठरविलेंहि होतें. नागपूरकडील मडळींना जी जागा नेमून देण्यात आली होती त्या जागेभोंवतीं काठ्या घेतलेले खलाशी व गुड प्रामुख्यानें उभे राहिलेले असल्यामुळें, या मडळींच्या म्होरक्यानें स्वयसेवकप्रमुखाकडे तक्रार केली. हें प्रकरण पुष्कळशा सामोपचारानें मिटलें.

मेथा मालवीप्रभृति जबाबदार मडळींना भेटून काहीं नडजोड निघते कीं काय हें टिळक शेवटपर्यंत पहात होते, पण, या मडळींची व त्यांची भेटच होऊ शकली नाहीं. शेवटीं, मालवीप्रभृति मडळी मडपात शिरू लागली तेव्हा टिळकानीं त्याना गाठलें व मालवींच्या हातात एक कागद दिला. अध्यक्षाच्या निवडणुकीच्या ठरावानतर आपण सभातहकुबीचा ठराव माडणार आहों, असें टिळकांनीं या चिट्ठींत लिहिलें होतें. अखेरीस असा काहीं प्रसग

क्रांतिकारक विचारांचा लोंढा आटवून टाकण्यासाठीं दडपशाहीच्या मार्गांचा अवलंब करण्याकडे सरकारची प्रवृत्ति होत होती. जिवंत विचारांचा लोट अशा मार्गांनीं आटत नसतो, हें सरकारला कळत नव्हतें. हा लोट उपकारक ठरावयाचा असेल तर, भगवान् शंकरानें भागीरथीच्या लोंढ्याला आपल्या जटाजूटांतून वाट काढून दिली त्याप्रमाणें, राष्ट्रधुरीणांनीं त्याला डोक्यावर झेलले पाहिजे, हें सुचविण्यासाठीं टिळक धडपडत आहेत, या गोष्टीचें आकलन त्यांना करतां आलें नाहीं!

शिष्टाई व लढाई हीं भिन्न कामें व्यवस्थितपणें पार पडावीं म्हणून व्यास-महर्षींनीं आपल्या महाभारत काव्यांत श्रीकृष्ण व अर्जुन या दोन भूमिका निर्मिल्या. टिळकांच्या महाभारतप्राय कृतिकाव्याचा विशेष असा कीं, या दोन्ही भूमिका त्यांनीं एकट्यानींच उत्तम प्रकारें वठविल्या! शिष्टाई सफल व्हावी म्हणून टिळकांनीं प्रयत्नांची पराकाष्ठा केली. लढाईशिवाय गत्यंतर नाहीं असें ठरल्यावर, प्रतिपक्षी वयोवृद्ध आहेत कीं ज्ञानवृद्ध आहेत याचा विचार न करतां, ते धनुर्धारी अर्जुनाप्रमाणें समरोत्सुक झाले! रासबिहारी घोष यांच्या दरडावणीला न भितां, आपली घट्ट मूठ एकदां टेबलावर आपटून, दोन्ही हात छातीवर आडवे एकांत एक घालून, निश्चयीपणानें व निर्भय-पणानें टिळक बोलूं लागले, तेव्हां त्यांच्याकडे पाहणाऱ्या कित्येकांना 'गंगाव-तरण' चित्रांतल्या भगवान् शंकरांचें किंवा कुरुक्षेत्रावर बाणवृष्टि करणाऱ्या पार्थाचें स्मरण झालें असेल!

'मी येथून हलणार नाहीं; हिंमत असेल तर मला येथून हलवा' असें बजा-वून टिळक निश्चितपणें व निश्चलपणानें उभे राहिले. इतक्यांत मागें बसलेल्या स्वागतसमितीच्या सभासदांपैकीं कोणी तरी त्यांच्याकडे छत्री फेंकली. टिळकांना छत्री लागली नाहीं! व्यासपीठावर हा प्रकार सुरू होतांच, प्रतिनिधींमध्यें गडबड सुरू झाली व जिकडेतिकडे मारामारी सुरू झाली! स्वयंसेवक म्हणून मिरवणा-ऱ्या गुंडांनीं कांहीं जागीं मारामारीला प्रारंभ केला! इतक्यांत एका गुजराथी माणसानें टिळक उभे होते त्या दिशेनें एक खुर्ची भिरकाविली! गडबड सुरू झाल्याबरोबर पंजाबमधील प्रतिनिधि डॉ. मधुसूदन भगत हे आपल्या जागेवरून उठून व्यासपीठावर गेले होते! त्यांनीं ही खुर्ची वरच्यावर झेलली! जवळच गोखले उभे होते. 'केलें काय नि झालें काय' हा प्रश्न त्यांच्या हळव्या मनात

दि. २८ रोजीं नेमस्तांनीं निवडक लोकांची एक सभा करून काँग्रेसचें काम पुढें चालविण्यासाठीं 'कन्व्हेन्शन'ची स्थापना केली. या दिवशीं सायंकाळीं नि दुसऱ्या दिवशीं राष्ट्रीय पक्षांतल्या लोकांचीहि सभा झाली. सुरतेच्या कांग्रेसपूर्वी उभय पक्षांत समेट न झाल्यामुळें कांग्रेस मोडली असली तरी, समेटाचा रस्ता अजीबात बुजून जावा हें टिळकांना श्रेयस्कर वाटत नव्हतें. सुरत सोडून जाण्यापूर्वी टिळकांनीं ज्या घटना घडविल्या त्यांत या हेतूला त्यांनीं प्राधान्य दिलें होतें. टिळक पुण्यास परत आल्यानंतरहि कांहीं दिवस हें सुरत-प्रकरण धुमसत राहिलें. सुरतेस निर्माण झालेल्या प्रश्नांत अध्यक्षाच्या निवडणुकीची पद्धत व अध्यक्षाचे अधिकार हे प्रश्न टिकाऊ महत्त्वाचे असल्यामुळें, २१-१-०८ च्या नि २८-१-०८ च्या केसरींत त्यांनीं 'अध्यक्षाचे अधिकार' हा मथळा देऊन दोन विद्वत्ताप्रचुर लेख लिहिले. कॉंग्रेस मोडली हें बरें झालें नाहीं असें टिळकांना मनःपूर्वक वाटत असल्यामुळें, फेब्रुवारीच्या प्रारंभापासून त्यांनीं नेमस्त व राष्ट्रीय या पक्षांचें ऐक्य होण्याच्या मार्गांत अडचणी कोणत्या आहेत नि त्या अडचणींचा परिहार कसा होईल या प्रश्नांची चर्चा सुरू केली. या वर्षी पुढें कांहीं दिवसांनीं धुळें येथें प्रांतिक परिषद झाली. या सभेंतहि राष्ट्रांतील पक्षैक्याच्या प्रश्नाला प्राधान्य देण्यांत आलें होतें.

सुरतेहून निघाल्यावर बंगालचे पुढारी बाबू अरविंद घोष हे पुण्यास आले. टिळकांनीं त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांचें स्वागत केलें. बंगालमध्यें पसरत चाललेला बाँबसंप्रदाय महाराष्ट्रांतहि अवतरला आहे हें अरविंदबाबूंना या भेटींत समजलें. कारण, इंडिया हाउसमधून सुटलेली, बाँबची कृति समजून सांगणारीं पत्रकें या सुमारास महाराष्ट्रांत पोंचलीं होतीं. राष्ट्रीय पक्षाच्या मतप्रचारासाठीं मुंबईस 'राष्ट्रमत' या नांवाचें दैनिक सुरू करण्याची योजना, पैसाफंडाच्या निधींतून तळेगांव येथें कांचशाळा सुरू करण्याची योजना, 'समर्थ विद्यालय' ही राष्ट्रीय शिक्षणाची संस्था सुरू करण्याची योजना, अशा अनेक योजनांत टिळकांचें लक्ष या सुमारास गुंतलें होतें. मार्च महिन्यांत पुणें नगरपालिकेची निवडणूक झाली तिच्यांतहि त्यांना लक्ष घालावें लागलें. अधिकारविभागणी कमिशनपुढें साक्ष देण्यासाठीं निमंत्रण आलें; म्हणून, त्या प्रश्नाचाहि सांगोपांग अभ्यास करून त्यांनीं दि ९-३-०८ रोजीं साक्ष दिली. इतक्या मानगडींत टिळक गुंतले होते तरी, लंडनहून आलेल्या लाला

हरदयाळजींसारख्या तरुणांना भेटण्याला, लंडनमध्यें तरुण मंडळी काय काय उलाढाली करीत आहेत याची माहिती मिळविण्याला नि पंजाबमध्यें त्यांनीं कोणत्या पद्धतीनें काम करावें हे त्यांना सांगण्यास टिळकांना सवड होतीच!

सुरतेच्या काँग्रेसनंतर दडपशाही सुरू होईल हे भाकीत टिळकांनी वर्तविलेच होतें. मद्रासप्रांतांत श्री. चिदंबरम् पिल्लेप्रभृति मंडळींवर खटले भरले गेले त्यामुळें हें भाकीत खरेंहि ठरलें. पण, हे खटले भरण्यांत आल्यावर लोक दबून गेले नाहींत, त्यांनीं काहीं प्रतिकार केला ही गोष्ट टिळकांना आधादायक वाटली. दि. २०-३-०८ रोजीं झालेल्या पुणें जिल्हापरिषदेंत टिळकांनीं मद्यपाननिषेधाच्या ठरावावर खूप आवेशयुक्त भाषण केलें. या परिषदेच्या पाठोपाठ पुण्यांत गुत्त्यांवर निरोधन करण्याची चळवळ सुरू झाली. 'सरकार, दारू आणि लोक,'* 'दारू आणि सरकारची अडचण'† हे लेख या चळवळीच्या समर्थनार्थ नि पुरस्कारार्थ लिहिलेले आहेत. ही चळवळ अत्यंत नेटानें पण व्यवस्थितपणें चाललेली पाहून टेम्परन्स असोसिएशनचे उपाध्यक्ष रे. डॉ. मॅकुनिकल यांनीं ओळखलें, कीं या चळवळीचीं सूत्रें टिळकांच्या हातीं असलीं पाहिजेत. मॅकुनिकलसाहेबांनीं या चळवळीला उद्देशून व टिळकांना उद्देशून दे. भ. भाऊसाहेब लवाटे यांच्याजवळ पुढील उद्गार‡ काढल्याचें प्रसिद्ध झालें आहे: Oh Mr. Lawate! Who is supporting this gigantic movement and doing all this? Is it that great man? (अहो लवाटे, या प्रचंड चळवळीचा पाठपुरावा करून हें सगळें चालवतो आहे तरी कोण? तो महात्मा तर हें सगळें करीत नाहीं ना?)

मॅकुनिकलसाहेब टिळकांविषयीं असे गौरवाचे उद्गार काढीत होते त्याच सुमारास सरकारी चित्रगुप्ताच्या चोपडींत टिळकांच्या पापपुण्याचा हिशोब वेगळ्याच तऱ्हेनें लिहिला जात होता. Mr. Tilak ruled over Poona

* केसरी: दि. १४-४-१९०८.
† केसरी: दि. २८-४-१९०८.
‡ आठवणी व आख्यायिका: खं. १: भा. १: पृ. २१५.

for the last two weeks (गेल्या पंधरवड्यांत पुण्यावर टिळकांचें अधिराज्य गाजत आहे) असा शेरा मारून अबकारी खात्यानें टिळकांच्या चळवळीच्या प्रभावीपणाची पावती दिली. सवतीमत्सर हा दोष कांहीं केवळ बायकांच्याच ठिकाणीं नसतो; सरकारच्याहि ठिकाणीं तो दोष असतो! अधिराज्य गाजायचें तें फक्त आपलें गाजलें पाहिजे, असें सरकारला सतत वाटतें! पुण्यासारख्या शहरांत पंधरवडाभर टिळकांचें अधिराज्य गाजत राहतें; त्या अर्थी टिळकांचा बंदोबस्त केलाच पाहिजे, असे विचार सरकारच्या मनांत घोळूं लागले!

बॉंबच्या विद्येंत निष्णात झालेले बंगाली तरुण या सुमारास या विद्येचे प्रात्यक्षिक प्रयोग करूं लागले होते. बरेच दिवस या तरुणांच्या दृष्टीनें हे प्रयोग यशस्वी झाले नाहींत. शेवटीं, दि. ३०-४-०८ रोजीं खुदिराम बसू व प्रफुल्लचंद्र चाकी यांच्या प्रयत्नामुळें, मुझफरपूर येथें मिसेस् केनेडी व त्यांची मुलगी यांचें प्राणोत्क्रमण झालें. वृत्तपत्रकार या नात्यानें टिळकांना या प्रकाराचा परामर्ष घेणें प्राप्तच होतें. १२-५-०८ च्या 'केसरी'च्या अंकांत टिळकांनीं या प्रकरणावर 'देशाचें दुर्दैव' हा लेख लिहिला. १५-५-०८ च्या 'काळ' पत्रांत प्रा. शि. म. परांजपे यांनींहि या विषयाची चर्चा केली. पुण्यांतल्या आपल्या अधिराज्याला प्रतिस्पर्धी उत्पन्न झाले असें सरकारला वाटत होतें. या प्रतिस्पर्ध्यांना उचलण्याची संधि सरकारला मिळाली! ११-६-०८ रोजीं प्रा. परांजपे यांना सरकारनें अटक केली. हें चक्र एवढ्यावर थांबणें शक्य नाहीं, हें टिळक ओळखून होते.

परांजपे यांना मुंबई सरकारनें अटक केली. आतां लवकरच आपल्याकडेहि सरकार-ची कृपादृष्टि वळणार हें टिळकांनीं ओळखलें. आपल्या घराची व कार्यालयाची-हि कदाचित् झडती घेण्यांत येईल, असा टिळकांना संशय आला. त्या दृष्टीनें जी कांहीं तजवीज करावयाची ती करण्याचा उद्योग त्यांनीं सुरू केला. डेक्कन कॉलेजमधल्या एका इंग्रज प्राध्यापकानें पंडित टिळकांना धाडिलेलीं कांहीं पत्रें टिळकांच्या घरीं होतीं. झडतींत हीं पत्रें सांपडलीं तर या प्रोफेसराला उगीचच त्रास होईल, हा विचार टिळकांच्या मनांत आला. त्यांनीं तीं पत्रें त्या प्राध्यापकाकडे परत पाठवून दिलीं. 'काळ'कर्ते परांजपे यांची जामिनावर मोकळीक होत नव्हती. त्या बाबतींत खटपट करण्यासाठीं, त्यांच्या खटल्याच्या कामांत त्यांना मदत करण्यासाठीं व वडीलकीच्या नात्यानें त्यांना धीर देण्यासाठीं आपल्याला मुंबईस गेलें पाहिजे हें ओळखून टिळक पुण्याहून निघाले.

टिळकांनीं घर सोडलें होतें; पण, पुणें स्टेशन सोडलें नव्हतें, तोंच त्यांना बातमी कळली कीं, सरकार आपल्याला मुंबईहून परत येऊं देणार नाहीं. 'तुम्हांला अटक होणार हें निश्चित; त्या दृष्टीनें कांहीं तजवीज करावयाची असेल तर करून मग जा,' असें एका हितचिंतकानें टिळकांना सुचविलें. कसलाहि आणीबाणीचा प्रसंग आला तरी त्याला तोंड देण्याला सदैव सिद्ध असणाऱ्या टिळकांना 'विशेष' व्यवस्था अशी कांहीं करावयाचीच नव्हती. ते तडक मुंबईस गेले; अनेक इष्टमित्रांना भेटले व 'काळ'कर्त्यांना जामिनावर मुक्त करण्याच्या कामीं त्यांनीं यशहि मिळविलें.

दि. २४ जून रोजीं सकाळीं टिळक कांहीं कामानिमित्त सरदारगृहाबाहेर गेले होते. बॅरिस्टर बॅप्टिस्टांशीं परांजपे यांजवरील खटल्याची चर्चा करीत बसल्यामुळें, दुपारपर्यंत ते बाहेरच होते. इतक्यांत त्यांचा कोणी हितचिंतक सरदारगृहांत आला. "अर्ध्या तासापूर्वीं प्रे. मॅजिस्ट्रेटची स्वाक्षरी टिळकांना पकडण्याविषयींच्या वॉरंटवर झाली आहे," अशी माहिती टिळकांच्या परिवारांतल्या एका गृहस्थाला सांगून तो आपल्या उद्योगाकडे वळला. परत सरदारगृहांत आल्याबरोबर टिळकांना ही वार्ता कळली. "ज्या दुर्बळ राष्ट्राला प्रतिकार करण्याचें सामर्थ्य नाहीं त्या राष्ट्राच्या पुढाऱ्यास असली बातमी अगोदर कळून तरी उपयोग काय!" अशा आशयाचे उद्गार काढून ते स्वस्थ

ह्याच दिवशीं सकाळीं ११ वाजतां चीफ प्रे. मॅजिस्ट्रेट मि. ॲस्टन यांच्यापुढें टिळकांना उभे करण्यांत आलें. १२।५।०८ च्या केसरींतला 'देशाचें दुर्दैव' हा लेख व त्याचें सरकारी इंग्रजी भाषांतर कोर्टांत दाखल झालें. इं. पि. कोडाचीं १२४–अ व १५३–अ या दोन कलमांन्वयें टिळकावर आरोप ठेवण्यांत आला. दि. २९ पर्यंत टिळकांवरील खटल्याचें काम स्थगित केल्याचें मॅजिस्ट्रेटनें जाहीर केलें. पाहिजे तेवढ्या मोठ्या रकमेचा जामीन घेऊन मॅजिस्ट्रेटनें टिळकांना मुक्त करावें, अशी विनंति दिनशा दावर यांचे चिरंजीव बॅ. दावर यांनीं केली; पण, ती अमान्य झाली. या दिवशीं संध्याकाळीं टिळकांना पोलीसचौकींतून काढून डोंगरीच्या तुरुंगांत नेण्यांत आलें. टिळकांना आपल्या वकील-मित्रांना भेटतां यावें म्हणून दि. २७ जून रोजीं दुपारीं त्यांना पोलीसचौकींत नेण्यांत आलें व भेट होतांच त्याना फिरून तुरुंगांत रवाना करण्यांत आलें. ९-६-०८ च्या केसरींत प्रसिद्ध झालेला 'हे उपाय टिकाऊ नाहींत' हा लेखहि आक्षेपार्ह ठरवून सरकारनें टिळकांविरुद्ध दुसरें वॉरंट काढलें. २९-६-०८ रोजीं सकाळीं तुरुंगांतच हें वॉरंट टिळकांवर बजावण्यांत आलें. पहिल्या वॉरंटांत ज्या प्रकारचे आरोप सुचविले होते त्याच प्रकारचे आरोप याहि वॉरंटांत सुचविले होते.

दि. २९ जूनला सकाळीं ११ वाजतांच टिळकांवरील अभियोगाचें काम न्यायालयांत सुरू होईल, अशी लोकांची अटकळ असल्यामुळें न्यायालयाशेजारीं लोकांची मनस्वी गर्दी झाली होती व उत्तरोत्तर ही गर्दी वाढतच गेली. जवळच्या एका विहिरीशेजारीं उभा राहून एक हिंदु संन्यासी मोठें आवेशयुक्त भाषण करीत होता. प्रक्षुब्ध झालेल्या लोकसमाजाला दाबण्यासाठीं पोलीस पुढें सरले; पण, त्यामुळें लोकसमुद्र जास्तच खवळला. शेवटीं हत्यारबंद घोडेस्वार जमावावर घालण्यांत आले. लोकांनीं दगडफेक केली त्यांत कांहीं पोलिसांना लागलें व एका युरोपियन अधिकाऱ्याच्या गालाचें हाड बाहेर पडलें. गर्दींतल्या सहाजणांवर बेकायदा जमाव केल्याच्या आरोपावरून खटलाहि भरण्यांत आला. दुपारीं ३॥ वाजतां खटल्याला सुरवात झाली तेव्हां बाहेरची गडबड कांहींशी कमी झाली.

ॲडव्होकेट ऑफ इंडिया, बॉंबे गॅझेट व टाइम्स या मुंबईच्या पत्रांनीं टिळकांवरील खटल्याची माहिती प्रसिद्ध करतांना स्वतःची अक्कल चालविली

होती व त्यामुळे कोर्टाची बेअदबी होत होती. टिळकांतर्फे काम पाहणारे बॅ. दावर यांनी ही गोष्ट मॅजिस्ट्रेटच्या निदर्शनास आणली. वृत्तपत्रांनी निर्मळ हकीकत देण्यापलीकडे कांहीं करूं नये असा इषारा मॅजिस्ट्रेटने दिला. टिळकांवरील दोन खटल्यांची चौकशी एकदम व्हावी कीं पृथक्पणे व्हावी असा प्रश्न उपस्थित झाला. आपण पृथक् चौकशी करणार असल्याचें मॅजिस्ट्रेटनें सांगितलें. केसरीकार्यालयाच्या झडतींत सांपडलेले एक पोस्ट कार्ड या दिवशीं पुराव्यात दाखल करण्यांत आलें. या कार्डाच्या एका बाजूला ज्वालाग्राही पदार्थांची माहिती देणाऱ्या कांहीं ग्रंथांचीं नांवें लिहिलेलीं होतीं. या दिवशीं खालच्या कोर्टातलें खटल्याचें काम संपून खटला सेशनकमिट करण्यांत आला.

टिळकांना जामिनावर सोडण्यात यावें या आशयाचा अर्ज हायकोर्टाकडे करण्यांत आला होता. त्याचा ऊहापोह गुरुवार दि. २-७-०८ रोजीं सुरू झाला. बॅ. जिना यांनीं या दिवशीं टिळकांतर्फे काम चालविलें. न्यायमूर्ति दिनशा दावर यांनीं जामीनअर्ज नामंजूर केला. या खटल्यांत ज्यूरी कोणती असावी—स्पेशल ज्यूरी असावी कीं नेहमींची साधी ज्यूरी असावी—या प्रश्नाची वाटाघाट न्यायमूर्ति दावर यांच्यापुढे दि. ३-७-०८ रोजीं सुरु झाली. बॅ. बॅप्टिस्टा हे या दिवशीं टिळकांतर्फे काम पहात होते. टिळकांना न्याय मिळण्याच्या दृष्टीनें आम्हांला स्पेशल ज्यूरी नको असें त्यांनीं परोपरीनें पटवून दिलें! तरीहि, न्यायमूर्तींनीं स्पेशल ज्यूरी आरोपीवर लादली! टिळकांवरील खटल्याचें काम दावर यांच्यापुढें १३-७-०८ रोजीं सुरु होईल, असें जाहीर झालें.

खटला सुरू होण्याच्या दिवशीं किंवा तत्पूर्वी मुंबई शहरांत कांहीं दंगाधोपा होईल, अशी भीति सरकारला वाटत होती. दि. १२-१३ या दोन दिवशीं पुष्कळ गिरण्या बंद होत्या. बंदोबस्ताची व्यवस्था नीट रहावी म्हणून सरकारनें ठिकठिकाणचें लष्कर मुंबईस गोळा केलें होतें. त्यांतलें कांहीं लष्कर दि. १२ पासून गिरणगांवांत ठेवण्यांत आलें होतें. खटल्याचे वेळीं टिळकांना तुरुंगांतून हायकोर्टांत आणतांना व त्यांना कोर्टातल्या कामानंतर तुरुंगांत पाठवितांना कांहीं भानगड होण्याचा संभव आहे असें सरकारला वाटल्यावरून, सरकारनें दि. १२ लाच टिळकांना हायकोर्टाच्या इमारतींत आणून ठेविलें होतें. हायकोर्टाच्या इमारतीच्या ज्या मजल्यावर टिळकांचा खटला चालावयाचा होता त्याच्या वरच्या मजल्यावर टॉवरमध्यें टिळकांना ठेवण्यांत आलें होतें. एक

गोरा सार्जंट त्यांच्यावर नेहमीं पहारेकरी म्हणून असे. हायकोर्टशेजारच्या मुंबई विद्यापीठाच्या इमारतींत एक गोरी पलटण सज्ज ठेवण्यांत आली होती.

दि. १३-७-०८ रोजीं दुपारीं ११॥ वाजतां न्यायमूर्ति दावर यांच्यापुढें बादशहा विरुद्ध बाळ गंगाधर टिळक या खटल्याचें काम सुरू झालें. सरकारतर्फे ॲडव्होकेट जनरल मि. ब्रॅन्सन हे काम चालवीत होते व तीन इंग्लिश कायदेपंडित त्याना मदत करीत होते. टिळक स्वतःच खटल्याचें काम चालवीत होते व दादासाहेब खापर्डे, दादासाहेब करंदीकर, बॅ. बॅप्टिस्टा, श्री. न. चिं. केळकर, मांधवराव बोडस, बापूसाहेब गांधी वगैरे मंडळी त्यांना मदत करीत होती. खटले एकत्र चालूं शकतील का या प्रश्नाचा प्रथम ऊहापोह झाला. दोन लेखांसंबंधींचे मिळून जे चार आरोप ठेवण्यांत आले होते त्यांतला एक आरोप काढून टाकण्यांत आला व तीन आरोपांसंबंधींचा खटला एकत्र चालावा, असें ठरलें. या तीनहि आरोपांबद्दल मी निर्दोषी आहें असें टिळकांनीं सांगितल्यावर, ज्यूरींतल्या सभ्य गृहस्थांची निवड झाली. ज्यूरींतल्या नऊ गृहस्थांपैकीं सहाजण युरोपियन होते, एक ज्यू होता व दोघे पारशी होते.

सोमवार दि. १३ जूनला सुरू झालेला हा खटला बुधवार दि. २२ जूनला अपरात्रीं संपला. मध्यंतरीं शनिवार व रविवार या दोन दिवशीं खटल्याचें काम चालू नव्हतें आणि ज्यूरींतील सभ्य गृहस्थांच्या सोईसाठीं शुक्रवारीं २॥ वाजतांच कोर्टाचें काम थांबलें. म्हणजे खटल्याचें प्रत्यक्ष काम ७॥ दिवस चालू होतें. या साडेसात दिवसांतला दीड दिवस टिळक स्वतः सरकारी साक्षीदारांची उलटतपासणी घेत होते. सरकारतर्फे करण्यांत आलेलीं केसरींतल्या लेखांचीं भाषांतरें पदोपदीं चुकलेलीं व गैरसमज उत्पन्न करणारीं आहेत हें सिद्ध करण्यासाठीं टिळकांनीं सरकारी भाषांतरकार श्री. भास्कर विष्णु जोशी यांची कसून उलटतपासणी केली. श्री. जोशी हे न्यू इंग्लिश स्कूलचे विद्यार्थी म्हणजे टिळकांचे एके काळचे शिष्य होते. आपल्याच केवळ नव्हे तर राष्ट्राच्याहि गुरुस्थानीं असणाऱ्या या पुण्यपुरुषाच्या विरुद्ध साक्षीदार म्हणून उभें रहाण्याचा प्रसंग आपल्यावर 'परमगहन सेवाधर्मा'मुळें आला या जाणिवेनेंच श्री. जोशी यांचें अर्धेअधिक धैर्य गळलें असेल! टिळकांकडून विचारल्या जाणाऱ्या प्रश्नांचा भडिमार व मधूनमधून न्यायमूर्तींकडून होणारी कानउघाडणी या दोहोंच्या कात्रींत श्री. जोशी यांची

स्थिति किती अनुकंपनीय झाली असेल हे पुढील प्रश्नोत्तरांवरून सहज ध्यानांत येण्यासारखें आहे :

**टिळक :** Coercive शब्दाचें भाषांतर काय कराल?

**जोशी :** तो शब्द कोठें आला आहे? इंग्रजी शब्दांची परीक्षा देण्याची माझी इच्छा नाहीं.

**न्या. दावर :** 'कोअर्सिव्ह' शब्दाचा मराठी अर्थ तुम्हाला येत नाहीं काय?

**जोशी :** होय. मला त्या शब्दाचा अर्थ माहीत आहे.

**न्या. दावर :** मग सांगा तर तो!

'मला संस्कृत येत नाहीं' असें जोशी यांनी म्हटल्याबरोबर 'आणि तुम्ही जगन्नाथ शंकरशेटची संस्कृत स्कॉलरशिप मिळविली!' असें टिळक गरजले! Despotic, tyrannical वगैरे शब्दांचे अर्थ साक्षीदाराच्या तोंडून काढतां-काढतां टिळकांनी A despotic rule need not be necessarily tyrannical या वाक्याचें भाषांतर करण्याच्या प्रसंगांत जोशी यांना पकडलें! जुलमी राज्यपद्धति जुलमाचीच असली पाहिजे असें नाहीं, असें भाषांतर मी करीन हे शब्द जोशी यांच्या तोंडून निघाल्याबरोबर, कोर्टांत हंशा कसा पिकला असेल, हें सांगावयाला नको!

स्वतःच्या बचावाचें भाषण टिळकांनी केलें तें जवळजवळ साडेचार दिवस चाललें होतें. इंग्लंडांतील राजद्रोहाचा कायदा व त्या देशांत निकालांत निघालेले राजद्रोहाचे महत्त्वाचे खटले, ज्यूरीच्या अधिकाराचें विस्तृत क्षेत्र, मुद्रण-स्वातंत्र्याचा इतिहास, तत्संबंधींचा कायदा व त्याचें महत्त्व, देशी भाषेंत वृत्तपत्रें चालवून देशाची राजकीय प्रगति घडवून आणणाऱ्या संपादकांची परिस्थिति, इत्यादि मुद्द्यांचें टिळकांनीं या प्रसंगीं केलेलें पांडित्यपूर्ण विवेचन ऐकून न्यायालयांत उपस्थित असलेल्या कायदेपंडितांनींहि माना डोलविल्या! आपल्या या बचावाच्या भाषणाची तयारी टिळकांनी किती कसोशीनें केली होती हें पुढील अवतरणावरून* स्पष्ट होत आहे :

**१९०८ सालच्या खटल्यांत 'डिफेन्स' सुरू होण्याचे आदल्या रात्रीं लोकमान्य आपल्या कोठडीमध्यें भाषणाची तयारी करीत होते.**

---

* आठवणी व आख्यायिका : खं. १ : पृ २१२.

खोलीमध्यें एका टेबलावर भाराभर पुस्तकें होतीं व जवळच कांहीं कागदाच्या चिठ्या होत्या. खोलीच्या बाहेर युरोपियन सार्जंटाचा पहारा होता. रात्रीं नऊसाडेनऊ वाजतां लोकमान्यांनीं आपणाच्या तयारीस सुरवात केली...मंद पावलानें व विचार करीतकरीत खोली-मध्यें इकडून तिकडे दोनतीन खेपा करावयाच्या, त्या ढिगामधून एक पुस्तक उचलावयाचें, त्याचें एक पान काढून त्या ठिकाणीं एक कागदाची चिठ्ठी खूण म्हणून ठेवावयाची, पुस्तक मिटावयाचें व दुसऱ्या एका टेबलावर ठेवून द्यावयाचें–पुनः विचार करीत दोनतीन खेपा, पुस्तक उचलणें, खूण घालणें, पुस्तक ठेवून देणें–पुनः तसेंच; पुनः तसेंच!...एक वाजला, दीड वाजला! पुनः तसेंच! त्या सार्जंटाला झोंप येऊं लागली. तेव्हां तो लोकमान्यांना म्हणाला[1] : **It's now getting rather late, Sir! Don't you think you should have some rest now?** लोकमान्य : **Why? Are you feeling sleepy? You may sleep if you like. I won't abscond!** सार्जंट झोंपीं गेला. दोन वाजले, तीन वाजले, चार वाजले! लोकमान्यां-चा तोच कार्यक्रम. पांच वाजतां त्या ढिगांतील शेवटचें पुस्तक, खूण घालून, लोकमान्यांनीं खालीं ठेवलें! झोंपीं गेलेल्या सार्जंटाला लोकमान्यांनीं हांक मारून उठविलें व त्यास सांगितलें[2] : **I have finished my reading! I will now have some rest. Have you had enough rest?** सार्जंट डोळे चोळीत व आपला युनिफॉर्म सांवरीत म्हणाला : **Thank you**

---

१ भाषांतर : 'महाशय! आता बरीच रात्र झाली, नाहीं का? थोडी विश्रांति घ्यावी असें नाहीं वाटत आपल्याला?'

'कां? तुला झोंप आली वाटतं! झोंप हवा तर! मी कांहीं फरारी होणार नाहीं!'

२ 'संपलें माझें वाचन! पडतों आतां जरा वेळ! तुला भरपूर झोंप मिळाली ना?'

**very much, sir! सार्जंट उठून पहारा करूं लागला व सव्वापांच वाजतां लोकमान्य झोंपी जाऊन घोरूं लागले.**

टिळकांनी या प्रसंगी ज्यूरीला उद्देशून केलेल्या भाषणाचें बडे सरकारी अधिकारी पुढें कसें कौतुक करीत असत हे सांगणारा पुढील संवाद* संस्मरणीय आहे :

...१९०८ सालच्या खटल्याचा उल्लेख करून एक ऑफिसर दुसऱ्यास म्हणतो : मि. टिळकांनी आपला डिफेन्स देतांना ज्यूरीला उद्देशून जें भाषण केलें तें मी कधींहि विसरणार नाहीं. त्यांचें तें भाषण प्रत्येक ज्यूररानें नेहमीं लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ज्यूररांचा दर्जा काय, त्यांचीं कर्तव्यें काय, याबद्दलचा तो एक वस्तुपाठच आहे. मला आश्चर्य असें वाटतें कीं, स्वतः वकिलीचा धंदा करीत नसतां टिळकांना या सर्व गोष्टी सांगतां आल्या कशा? (दुसरा ऑफिसर): ...तुम्हांला काय वाटतें? ही आश्चर्य करण्यासारखीच गोष्ट आहे नाहीं? त्यांत आश्चर्य कसलें? अहो, **प्रत्यक्ष हायकोर्ट व ज्यूरीची पद्धत निर्माण करण्याची ज्याची शक्ति आहे त्यानें ज्यूरीचीं कर्तव्यें समजावून सांगितलीं यांत काय मोठें नवल झालें?**

बुधवार दि. २२ जुलै रोजीं १२॥-१ च्या दरम्यान टिळकांचें भाषण संपलें. चार-साडेचार दिवसपर्यंत चाललेल्या टिळकांच्या पांडित्यपूर्ण नि उदात्त वक्तृत्वानें निर्माण झालेलें गांभीर्य तरी थें. जनरल ब्रॅन्सन आपल्या भाषणांमुळे बिघडूं देणार नाहींत अशी लोकांची अपेक्षा होती; पण, तीहि फोल ठरली. 'टिळकांनी सर्पटपंजरी चालविली', 'टिळकांचें भाषण व्यवहारशून्य आहे', 'टिळकांनीं ज्यूरीच्या डोळ्यांत धूळ फेंकली' असलीं मुक्ताफळें उधळण्याला या कायदेपंडिताला काडीचाहि संकोच वाटला नाहीं. ब्रॅन्सनसाहेबांचें भाषण चालू असतांनाच न्यायालयाच्या कामाची नेहमींची वेळ संपून गेली होती, पण, कितीहि उशीर झाला तरी खटल्याचा निकाल आज सांगावयाचा असें न्यायमूर्ति दावर यांनीं ठरविलें होतें. ज्यूरींतल्या सभ्य गृहस्थांची उशिरामुळे उपासमार होऊं नये यासाठीं, त्यांच्या यजीच्या खाण्यापिण्याचीहि सोय हायकोर्टांत दूरदर्शीपणानें करून ठेवलेली होती. न्यायमूर्ति दावर यांनीं

* आठवणी व आख्यायिका : खं. ३ : पृ. ३११-१२.

तासदीडतास भाषण करून ज्यूरीला खटला समजावून दिला. आपसांत विचारविनिमय करून निर्णय ठरविण्यासाठीं ज्यूरींतले सभ्य गृहस्थ बाजूला जाऊन बसले त्या वेळीं नुकतेच आठ वाजले होते.

खटल्याचें स्वरूप, न्यायमूर्तींची वृत्ति, ज्यूरीची निवड इत्यादि प्रकारावरून, खटल्याचा निकाल काय होणार याविषयींची शंका कोणाच्याच मनांत नव्हती. आपले भाचे धोंडोपंत विद्वांस यांना आपल्याला झालेली शिक्षा ऐकून असह्य वेदना होतील, ते रडूं लागतील व त्यांचें दुःख पाहून आपलेंहि मन द्रवेल हें आगाऊ ओळखून टिळकांनीं या दिवशीं धोंडोपंतांनीं पुण्यास निघून जावें, असें सुचविलें होतें. मी सर्व गोष्टी धैर्यानें सहन करीन असें धोंडोपंतांनीं आश्वासनपूर्वक सांगितल्यामुळें, टिळकांनीं त्यांना आपल्याजवळ राहूं दिलें होतें. बावनाव्या वर्षीं आपल्याला लांब मुदतीची शिक्षा होणार, शिक्षा भोगीत असतांनाच कदाचित् आपल्याला परलोकचें पाचारण येईल, आपलीं मुलेंलेंकरें व आपलीं वृत्तपत्रें यांची व्यवस्था आपण कांहींच करूं शकलों नाहीं इत्यादि विचार या दिवशीं टिळकांच्या मनांत ओझरता येऊन गेला असेल! आपण कदाचित् जिवंत परत येणार नाहीं हा विचार टिळकांच्या मनांत निश्चित घोळत होता. निर्णयापूर्वींची वाटाघाट करीत ज्यूरींतले सभ्यगृहस्थ एकांतांत बसले होते व न्यायमूर्ति दावरहि आपल्या विश्रामस्थानीं जाऊन बसले होते त्या वेळीं टिळक, खापर्डे, केळकरप्रभृति मंडळी एकत्र बसून चहा घेत होती. चहा घेतांघेतां टिळक दादासाहेब खापर्ड्यांना म्हणाले*: **दादासाहेब! आजचा रंग कांहीं निराळाच दिसतो. बहुतेक काळ्या पाण्याची तयारी दिसते. हा आजचा आपला बहुतेक शेवटचाच चहा समजा!**

विचारविनिमय संपवून नि निर्णयाचें स्वरूप ठरवून ज्यूरींतले सभ्य गृहस्थ न्यायालयांतल्या आपल्या स्थानावर येऊन पोंचले तेव्हां ९ वाजून २० मिनिटें झालीं होतीं. खटल्याचा निकाल आज लागत नाहीं अशा कल्पनेनें सायंकाळीं घरोघर निघून गेलेल्या लोकांपैकीं कित्येकांना न्यायमूर्ति दावरांच्या त्याचदिवशीं. खटला आटोपण्याबद्दलच्या निर्धाराची वार्ता मध्यंतरीं कर्णोपकर्णी

---

* आठवणी व आख्यायिका : खं. १ : भा. १ : पृ. २१७.

भरली होती व त्यामुळे, सभोवतालचा अंधार व डोक्यावर कोसळणारा पाऊस यांच्याकडे दुर्लक्ष करूनहि, कित्येक लोक हायकोर्टाच्या सभोंवती गोळा झाले होते. शिक्षा सांगितल्यावर टिळकांना नेणार कोठें याविषयींचीहि चिंता लोकांना वाटावी अशी व्यवस्था सरकारी अधिकाऱ्यांनी करून ठेविली होती. समुद्रांत एक आगबोट मुद्दाम तयार ठेवण्यांत आली असल्याची वार्ता प्रसृत झाल्याकारणानें, टिळकांना अंदमानला धाडणार की काय, अशी भीति लोकांना व्यग्र करीत होती. बोरीबंदरवरहि आगगाडीचे खास डबे तयार ठेवण्यांत आले असल्यामुळें लोकांना वाटे कीं, जरा दूर का होईना, टिळक या हिंदुस्थानांतच कोठें तरी ठेवण्यांत येणार आहे!

न्यायमूर्ति दावर स्वस्थानीं विराजमान झाले. ज्यूरीचा निकाल एकमताचा आहे की काय, एकमताचा नसला तर मतभिन्नतेचें प्रमाण काय आहे वगैरे प्रश्न ज्यूरीचे मुख्य मि. अडरसन यांना विचारण्यात आले. ज्यूरींतल्या नऊ गृहस्थांपैकीं सात गृहस्थांच्या मतें आरोपी सर्व आरोपांखालीं दोषी असून, उरलेल्या दोघांच्या मतें आरोपी कोणत्याच आरोपाखालीं दोषी नाहीं, असें मि अडरसन यांनीं सांगितलें आरोपीला शिक्षा सांगितल्याशिवाय आता आपल्याला गत्यंतर नाहीं असें म्हणून, शिक्षा सांगण्यापूर्वी आरोपीला काहीं सांगावयाचें असेल तर त्यानें तें सांगावें असें न्यायमूर्तींनीं सुचविलें

तर्कांच्या दोरीशुद्ध पद्धतीनें विचार करणाऱ्या न्यायमूर्तींना व सरकारतर्फे काम करणाऱ्या कायदेपंडितांना असें वाटलें असेल कीं, शिक्षा होणार या कल्पनेनें खचून जाऊन हा वयातीत आरोपी गयावया तरी करील किंवा मूकभाव तरी धारण करील! कठोर शिक्षा ऐकण्याचा प्रसंग आला कीं सामान्य धैर्याचीं माणसें कशीं खचून जातात, हें त्यांना अवगत होतें. 'समोरच्या या खांबांत तुझा देव आहे का!' असा प्रश्न विचारला तर सामान्य भक्त गोंधळून जातात हें जसें हिरण्यकशिपूला व त्याच्या परिवारांतल्या असुरांना माहीत होतें तद्वतच न्यायमूर्ति दावरप्रभृतींची स्थिति होती. प्रचंड वृक्षांना जमिनीवर लोळविणारा झंजावात पर्वतशिखराशीं झुंज खेळून पराभूतच होतो हें ज्ञान त्यांना नव्हतें. प्रल्हादासारखा भक्त श्रद्धेनें होकारार्थी उत्तर देण्याला सिद्ध झाला कीं, राजवाड्याच्या सजीव व भक्कम खांबामधून उग्र व गंभीर असें नृसिंहरूप प्रगट होतें, हा अनुभव त्यांच्या परिचयाचा नव्हता.

त्या अनुभवाचा परिचय त्यांना होण्याची वेळ आली होती. न्यायालयाच्या कोठडींतल्या अंधाराला अधिकच भेसूरपणा आणून देणाऱ्या तेथील मंद प्रकाशाच्या मदतीनें न्यायाधिशासकट सर्व मंडळी टिळकांच्या तोंडाकडे पाहूं लागली. करारीपणा, निःस्वार्थीपणा, निर्भयपणा, ध्येयनिष्ठा इत्यादि-सद्गुणांची दीर्घकाल उपासना करीत राहिल्यामुळें त्यांच्या नेत्रांत जें एक प्रकारच्या अलौकिक तपश्चर्येचें तेज खेळत असे तें तेज फांकूं लागलें. त्यांच्या तोंडून निघणाऱ्या वेंचक नि गंभीर शब्दांचें श्रवण करतां यावें म्हणून पर्जन्य, वायु, विद्युत् इत्यादि भौतिक शक्तींनींहि आपला संचार कुंठित केला. स्फूर्तिसंपन्न कविश्रेष्ठ तेजस्वी उद्गार काढूं लागला कीं, त्यांच्या मागोमाग धांवतांधांवतां अर्थाची जशी पुरेवाट होऊन जाते त्याप्रमाणें, टिळकांच्या सहजस्फूर्त उदात्त वाक्यांच्या अर्थाचें आकलन करतांकरतां भोंवतालच्या मंडळींची पुरेवाट होऊन गेली. काळोख्या रात्रीं आकाशांत कड्कड् आवाज होऊन विद्युल्लता चमकली, कीं तिच्या पृथ्वीगत प्रकाशांत पायाभोंवतालच्या क्षुद्र वस्तु जशा अधिकच क्षुद्र दिसतात त्याप्रमाणें टिळकांचा चढता आवाज व त्यांच्या शब्दांतली दीप्ति यांच्या प्रभावामुळें दावरबिवर सारे क्षुद्र दिसूं लागले ! ज्यूरीला आपलें म्हणणें समजून सांगतांना, आपल्या भाषणाच्या शेवटीं, परमेश्वराचें स्मरण जागत ठेवा असें टिळकांनीं बजावलें होतें. ज्यूरींतल्या अवघ्या दोनच गृहस्थांनीं—आणि हे दोघेहि गृहस्थ हिंदी होते—हें स्मरण ठेविलें होतें. बाकीच्यांनीं परमेश्वराचें स्मरण ठेविलें नसल्यामुळें आपण या न्यायालयांत दोषी ठरत असलों तरी, आपला हृदयस्थ नारायण आपल्याला वेगळेंच कांहीं सांगत आहे असें जगाला बजावण्यासाठीं टिळक म्हणाले :

'All I wish to say is that in spite of the verdict of the Jury, I maintain that I am innocent. There are higher Powers that rule the destinies of things; and it may be the will of Providence that the cause which I represent may prosper more by my sufferings than by my remaining free.

टिळकांच्या या उदात्त उद्गारानंतर न्यायमूर्ति दावर हे शिक्षा सांगण्याचें

काम करू लागले. 'पातितोऽपि कराघातैरुत्पतत्येव कन्दुकः' या वचनाचा मूर्तिमंत अनुभव आणून देणारे टिळकांचे शब्द ऐकून त्यांचा अपेक्षाभंग झाला असावा. त्यांच्या भाषणात टिळकांचा अधिक्षेप करण्यांत आला राजद्रोहाच्या दोन आरोपांपैकी प्रत्येक आरोपासाठी तीन वर्षे मिळून एकंदर सहा वर्षे काळ्यापाण्याची शिक्षा त्यांनी ठोठावली व तिसऱ्या आरोपाबद्दल त्यांनी टिळकांना एक सहस्र रुपये दंड सांगितला. ज्यूरींतल्या सभ्य गृहस्थाना १०।१२ दिवस फार ताण पडला या जाणिवेने असो अगर ज्यूरीने दिलेल्या निर्णयाचें कौतुक करण्याच्या भावनेने असो, न्यायमूर्ति दावर यांनी अशी विशेष सूचना लिहून ठेविली की, पुढील तीन वर्षेंपर्यंत ज्यूरींतल्या या महाशयांना फिरून ज्यूरीच्या कामासाठीं बोलावण्यात येऊ नये!

रात्रीचे दहा वाजून गेले होते. टिळकांना कोठें तरी नेण्यासाठीं त्यांना रस्त्यावर आणण्यात येईल, त्या वेळीं आपण त्यांचे दर्शन घेऊ; कदाचित् ते इतःपर आपल्याला दिसणार नाहींत, म्हणून आपण त्यांच्या गळ्यात पुष्पहार घालूं- अशा आतुरतेनें पुष्कळ मंडळी चिखल तुडवीत नि पावसात भिजत हायकोर्टच्या गल्लीत व शेजारच्या राजरस्त्यांत उभी होती. टिळकांना या मंडळींचा स्पर्श पोंचू नये अशी सरकारी अधिकाऱ्यांची इच्छा होती. म्हणून त्यांनीं हायकोर्टाच्या मागल्या निमुळत्या जिन्याने टिळकांना खालीं नेण्याचे ठरविले. पहारेकऱ्यांसमवेत टिळक खालीं उतरत होते त्या वेळीं घडलेला एक प्रसंग लक्षांत ठेवण्याजोगा आहे. अपरात्र झाली तरी आपले न्यायमूर्ति वडील घरीं परत कां आले नाहींत या चिंतेनें बॅ. दावर गडबडीनें हायकोर्टात आले होते. त्यांची व टिळकांची या जिन्यात कशी भेट झाली व भेटींत काय घडलें याचें वृत्त पुढील शब्दांत* प्रसिद्ध झालेलें आहे :

...आपल्या वडिलांस घरीं नेण्यास इतका उशीर कां लागला म्हणून आतुरतेनें चौकशी करण्यासाठी बॅ. दावर हायकोर्टात येतात इतक्यात शिक्षा झालेले टिळक पहाऱ्यामधून हायकोर्टाचे जिन्यावरून खालीं उतरत होते... लोकमान्यांवर आलेला प्रसंग पाहून बॅरिस्टर दावर यांना खेद वाटणें स्वाभाविक होतें. त्यामुळें अशा स्थितींत लोकमान्यांची दृष्टि चुकविण्याचे उद्देशानें

* आठवणी व आख्यायिका : ख. २ : पृ. १३७.

त्यांनीं एका बाजूस होण्याचा प्रयत्न केला. त्यांची ती मनाची स्थिति ओळखून, आपल्यावरील प्रसंगाची गुमान न करितां, उलट त्यांचेंच शांतवन करण्याचे हेतूनें टिळकांनीं पहारेकऱ्यांना बॅ. दावर ह्यांच्याशीं बोलण्याची परवानगी विचारली. त्याप्रमाणें ती मिळतांच बॅरिस्टरांकडे वळून टिळक म्हणाले: **अहो! आपण असें मनाला कां लावून घेतां? परीक्षेसाठींच मनुष्यावर अनेक प्रसंग येत असतात. त्यांस न जुमानण्यांतच पुरुषार्थ आहे. तुम्ही पूर्वीच्या खटल्यांत मला किती मदत केली, याची मला पूर्ण जाणीव आहे. आतां या खटल्यांत तुम्ही मला मदत कां करूं शकलां नाहीं, याला तसेंच योग्य कारण आहे. तुम्ही त्याबद्दल कष्टी होऊं नका. मनांतलें सर्व टाकून पूर्वीप्रमाणें माझ्यावर लोभ असूं द्या. सहा वर्षें हां हां म्हणतां जातील व पुनः तुमची व माझी गांठ पडेल.**

टिळक व त्यांचे पहारेकरी जिना उतरून खालीं आले. पूर्वींच तयार ठेवण्यांत आलेल्या मोटारगाडींत टिळकांना बसविण्यांत आलें. बी. बी. सी. आय्.च्या एका स्टेशनानजीक बाजूला एक गाडी कांहीं तासांपूर्वीं मुद्दाम आणून ठेवण्यांत आली होती. या गाडींत टिळकांना बसविण्यांत आलें. गाडी चालू झाली व थोड्याच वेळांत टिळकांना गाढ झोंपहि लागली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं सात वाजण्याच्या सुमारास गाडी अहमदाबादच्या जवळ साबरमती स्टेशनजवळ तुरुंगाच्या समोर उभी करण्यांत आली. अधिकाऱ्यानें टिळकाना गाडींतून उतरून घेतलें व तुरुंगांतल्या युरोपियन वॉर्डमधील एका कोठडींत त्यांना नेऊन ठेविलें. हा दिवस २३ जुलै १९०८ हा होता तो टिळकांचा ५२ वा वाढदिवस होता.

टिळक साबरमतीच्या तुरुंगांत पोंचले तत्पूर्वींच त्याना झालेल्या कठोर शिक्षेची वार्ता चौफेर फैलावली होती. या शिक्षेबद्दलची नापसंती जशी वृत्तपत्रांमधून व्यक्त होत होती, त्याप्रमाणेंच आपापले व्यवहार बंद ठेवून गावोगांवचे लहानथोर लोकहि ही नापसंती व्यक्त करीत होते. मुंबईच्या गिरण्यांतून काम करणाऱ्या मजूरवर्गानें आपल्या मनांतला असंतोष व्यक्त करणाचा एक ठसठशीत मार्ग शोधून काढला. टिळकांना देण्यांत आलेल्या शिक्षेंतली सहा ही संख्या त्यांनीं लक्षांत ठेविली व सहा दिवसपर्यंत काम

बॅ. बॅप्टिस्टा यांनी त्यांना खुर्चीवर बसण्याची विनंति केली. शेवटीं जमिनीवर बसूनच दोघे बोलूं लागले. 'सरकार मला सहा वर्षें डांबून ठेवूं पहात आहे; पण, बहुतांशीं मी तत्पूर्वीच त्याच्या हातावर तुरी देईन; त्याहि उप्पर जिवत राहिलों तर, माझ्या हातून कांहीं अधिक ऐहिक कार्य व्हावें अशी ईश्वरी इच्छा आहे असें मानीन,' असें टिळक या भेटींत म्हणाले.

टिळकांना काळ्या पाण्याची शिक्षा सांगण्यांत आली असल्यामुळें, सरकार त्यांना फार दिवस साबरमती कारागृहांत ठेवणार नाहीं, हें स्पष्ट होतें. देशाबाहेर त्यांना कोठें ठेवावयाचें हें ठरवून सरकारनें त्यांना १३।९।०८ ला रात्रीं या तुरुंगांतून बाहेर काढलें. आपल्याला कोठें नेत आहेत याची कल्पना टिळकांना नव्हती; पण, एक गुजराथी ब्राह्मण कैदी स्वयंपाकी म्हणून त्यांच्याबरोबर रवाना होत असल्यामुळें, त्यांनीं असें ओळखलें कीं, कोठें तरी दूरच्या ठिकाणीं आपली पाठवणी होत आहे. तुरुंगाबाहेर काढतांना टिळकांना त्यांचा नेहमींचा पोषाख देण्यांत आला. तुरुंगाच्या आवारालगतच गाडी उभी होती. टिळकांना घेऊन तिचा प्रवास अंधारातून सुरू झाला. टिळकांच्या डब्याचीं खिडक्या-दारें बंद होतीं. गाडींत टिळक आहेत हें कोणाला कळूं नये यासाठीं व गाडींतले टिळक लोकांना दिसू नयेत यासाठीं सरकारी व्यवस्थापक इतकी दक्षता घेत होते; तरी, मधूनमधून कांहीं स्टेशनांवर 'टिळक महाराज की जय' हा घोष दुमदुमतच होता.

मुंबईच्या पोलीस-अधिकाऱ्यांनीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं टिळकांना गाडींतून उतरून घेतलें व थेट बोटीच्या बंदराकडे नेलें. त्यांना एका स्टीमलाँचमध्यें बसवून हे अधिकारी एका मोठ्या बोटीच्या रोखानें जाऊं लागले. या बोटीचें नांव 'हार्डिंज' हें असून तिचा लष्करी वाहतुकीच्या कामासाठीं उपयोग केला जातो, हें टिळकांना मागाहून कळलें. या बोटीच्या तळमजल्यांत लहानलहान खोल्या होत्या. त्यापैकीं एका खोलींत टिळकांना कोंडून ठेवण्यांत आलें व दुसऱ्या खोलींत त्यांच्याबरोबरच्या गुजराथी आचाऱ्याला कोंडून टाकण्यांत आलें. या खोलींत रात्रंदिवस एकसारखें मनस्वी उकडत असे. दिवसांतून एक तास टिळकांना फिरण्यासाठीं वर डेकवर नेण्यांत येत असे व त्या वेळीं त्यांच्याबरोबर एक गोरा इन्स्पेक्टर असे. बोटीचा प्रवास सुरू झाला तरी बोट कोठें जाणार आहे याची कल्पना कोणालाच नव्हती.

कप्तानाच्या हातीं एक सीलबंद लखोटा देण्यांत आला होता. बोट सुरू करून त्यानें तो उघडून पाहिला. बोट घेऊन आपल्याला रंगूनला जावयाचें आहे, हें त्याच्या लक्षांत आलें.

नऊ दिवसांच्या प्रवासानंतर दि. २२-९-०८ ला दुपारीं ही बोट रंगून बंदरांत पोंचली. बोटींतून टिळक येत आहेत ही बातमी गुप्त राहूं शकली नव्हती; त्यामुळें, टिळक बंदरावर उतरले तत्पूर्वीच हजार दोन हजार लोक त्यांच्या दर्शनासाठीं गोळा झाले होते. बंदरालगतच आगगाडी तयार ठेवण्यात आली होती. तिच्यामध्यें टिळकांना व त्यांच्या परिवाराला बसविण्यांत आलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठ वाजतां ही गाडी मंडाले स्टेशनवर पोंचली. बरोबरच्या पोलीसअधिकाऱ्यांनीं टिळक व त्यांच्याबरोबरचा आचारी यांना अशी पोलिसांच्या हवालीं केलें. या पोलिसांच्या पहाऱ्यांत टिळकांनीं मंडालेच्या तुरुंगांत प्रवेश केला. तुरुंगाच्या मुख्य अधिकाऱ्याला टिळक येत आहेत ही बातमी होतीच! त्यानें तुरुंगांतली टिळकांची जागा ठरवून ठेविली होती. जेलरला बरोबर देऊन या अधिकाऱ्यानें टिळकांची त्या जागेकडे रवानगी केली!

* मैं यहां रहतेरहते बूढा होगया, लेकिन् ऐसा कैदी मेरे देखने में इतनी उमरतक नही आया! देखिये जनाब! ये दरख्त जो आप सामने देख रहे हैं ये सब आज मुरझाये दीखते हैं! उनको पानी डालते हैं। और सब तरहकी उनकी निगाह की जाती है! लेकिन् उनपर तजेलाहि आता नही। वे अवलिया यहां आने के पेशतर भी ये झाडों का यही हाल था। लेकिन् जब वे महात्मा यहां आये तो एक महिनेमें ये सब झाड ताजेताजे दीखने लगे और फूल और फलोंसेभी भर गये। ऐसा हाल जबतक ये महात्मा यहां थे तबतक हमेषा चला रहा। लेकिन् जबसे वे यहांसे चले गये तबसे ये झाडोंको ना फूल और ना फल आता है। और सबके सब जैसा कोई उनका रिस्तेदार मर गया हो.ऐसे दिखाई देते हैं। सब बिचारे मुरझा गये हैं।

टिळकांना मंडालेच्या कारागृहाच्या ज्या भागांत ठेवण्यांत आलें होतें त्या भागाचा पहारेकरी म्हणून काम करतांकरतां वृद्ध झालेल्या एका भाविक मुसलमानाचे हे उद्‌गार आहेत. या उद्‌गारांवर 'भोळसट' असा शेरा मारण्याची प्रवृत्ति कित्येकांच्या ठिकाणीं असेल, हें शक्य आहे. टिळकांच्या अनुपस्थितीमुळें भारतीय राजकारणावरील तजेला कमी झाला. भरपाईचा न्याय ( Law of Compensation ) निसर्गांत अनिरुद्धपणें आपला प्रभाव गाजवीत असतो. राजकारणावरील तजेला हरपला, मंडालेच्या तुरुंगांत टिळकांच्या नजरेसमोर असलेल्या झाडाझुडपांवर तो विलसूं लागला नि अशा रीतीनें निसर्गांतील हा सनातन न्याय खरा ठरला, असें विचारवंतांनीं

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ३८३

मानलें तरी हरकत नाहीं. 'वृक्षवेली आम्हां सोयरीं वनचरें' असे म्हणणाऱ्या संत तुकोबारायाच्या भोंवतालची झाडेझुडपें नि पशुपक्षी जसे त्यांना उत्साही सोबत्यांप्रमाणें भासत, तद्वतच टिळकांनाहि स्वतःभोंवतालचे जीवजात सोबत्यांप्रमाणें वाटलें असलें, तर नवल नाहीं! आणि टिळकांची सोबत ज्यांना लाभली ते तजेलदार नि टवटवीत झाले नाहींत, तरच नवल!

मंडाले तुरुंगातल्या भद्रालू पहारेकऱ्याने टिळकांविषयी बोलतांना 'अवलिया', 'महात्मा' हे शब्द वापरले आहेत. हे शब्द अत्यंत अन्वर्थक आहेत. 'यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः' हें साधुपुरुषाला लावण्यात येणारे वर्णन मंडालेच्या कारावासांत रहात असलेल्या टिळकांना तंतोतंत लागू पडतें. टिळकांच्या दिमतीस देण्यात आलेला आचारी श्री. वासुदेव रामराव कुलकर्णी यानें लिहिलेल्या आठवणींवरून हें अगदीं स्पष्ट होत आहे. टिळकांसाठीं उंची शिधा सरकारकडून देण्यात येत असे. कुलकर्णी यांच्यासाठीं साधारण प्रतीचा शिधा दिला जाई. आपले सोबती कुलकर्णी व आपण यांच्या अन्नामध्यें कसलाहि फरक असतां कामा नये असें टिळकांना वाटत असल्यामुळें, टिळकांच्यासाठीं येणाऱ्या शिध्यांतच उभयतांचें जेवण होऊं लागलें. त्यामुळें कुलकर्ण्यांसाठीं येणारा शिधा शिल्लक राही. टिळक हा शिधा तुरुंगाच्या आवारांत जमणाऱ्या चिमण्यांना घालूं लागल्यामुळें काय मौज झाली हें श्री. कुलकर्णी यांनीं पुढील शब्दांत* सांगितलें आहे :

कित्येक दिवसांच्या या परिपाठामुळें तेथील चिमण्या फार धीट झाल्या; इतक्या कीं, त्या खोलींत येत, खुर्चीटेबलावर बसत व महाराज जेवण्यास बसले म्हणजे ताटाच्या सभोंवतीं जमत. फार काय पण चिवचिव करीत माझ्याप्रमाणें त्या त्यांच्या अंगावरहि बसत......एकदां चिमण्यांचा थवा महाराजांचे मांडीजवळ जमला असतां तितक्यांत अचानक सुपरिंटेंडेंट तेथें आले. त्यांस तो प्रकार पाहून अति आश्चर्य वाटलें. त्यांनीं महाराजांस विचारलें : हा हो काय चमत्कार! तेव्हां महाराज म्हणाले, आम्ही त्यांस मारीत नाहीं, भीति दाखवीत नाहीं; उलट, क्वचित् त्यांसच आम्ही खावयास

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ४१-४२

घालतों, म्हणून त्या येथें निर्भय असतात. फार काय, विषारी प्राण्यांबद्दलहि आमचें मन निर्वैर असल्यामुळें, तेहि आम्हांस भीत नाहींत.

मंडालेच्या कारागृहांत टिळकांना ज्या कोठडींत ठेवण्यांत आलें होतें ती कोठडी दुसऱ्या मजल्यावर असून दोन खणी होती. एका आठ खणांच्या मोठ्या बराकीच्या मध्यें लांकडी भिंत घालून ही कोठडी वेगळी काढण्यांत आलेली होती. सभोंवतीं जें आवार होतें त्याला विटांच्या भिंती घातलेल्या होत्या. हें आवार सुमारें १२० फूट लांब व ५० फूट रुंद होतें. या आवारांतच फिरण्याला टिळकांना मोकळीक होती. शिक्षेचीं बरींच वर्षें निघून गेल्यावर, संध्याकाळीं एक तासभर शेजारच्या मोठ्या आवारांत हिंडण्याची मोकळीक टिळकांना देण्यात आली होती. आवाराच्या दरवाजाला अहोरात्र कुलूप घातलेलें असे. रात्रीं टिळकांच्या कोठडीलाहि कुलूप ठोकण्यांत येई. जेलर बरोबर असल्याशिवाय या आवारांत कोणाचाहि प्रवेश मिळत नसे. टिळकांच्या कोठडींत एक टेबल, एकदोन खुर्च्या, एक कापडी आरामखुर्ची, एक लोखंडी खाट व पुस्तकांसाठीं दोन कपाटें इतकें सामान होतें. टिळकांना स्वतःचाच पोषाख घालण्याला सवड देण्यांत आली होती. टिळकांच्या जेवण-खाण्याची व्यवस्था स्वतंत्रपणें व्हावी ही गोष्ट सरकारनें हळूहळू मान्य केल्यावर, दुसऱ्या मजल्यावरील या खोलीच्या खालीं असलेल्या खोलींत स्वयंपाकघर थाटण्यात आलें. स्वयंपाकघरांत लागणाऱ्या बारीकसारीक सर्व वस्तु टिळकांनीं स्वतःच्या खर्चानें मागवून घेतल्या होत्या.

बाहेर असतांना सकाळीं किंचित् उशिरां उठणारे टिळक या कारागृहांत बरेच लवकर उठत असत. उठल्याबरोबर चूळ भरून टाकावयाची व सहज आठवलेले कांहीं संस्कृत श्लोक वगैरे पुटपुटत रहावयाचें असा त्यांचा क्रम असे. यानंतर तासन्‌तास ते ध्यानस्थ बसत असत. प्रातर्विधि आटोपल्यावर चहा घेऊन ते आपल्या खोलींत जात व लेखनवाचनांत दंग होत असत. ९-९॥ वाजेपर्यंत हा कार्यक्रम झाला कीं ते स्नानासाठीं खालीं येत. पुण्यांत सवडच मिळत नसल्यामुळें, टिळक तेथें संध्यावंदन करीत नसत. पण, या मंडालेच्या तपोधामांत मोकळा वेळ भरपूरच असल्यामुळें, ते स्नानानंतर अर्घ्यप्रदान करीत व गायत्रीमंत्राचा जपहि करीत. भोजन आटोपून खोलींत

गेल्यावर शतपावली करून ते फिरून लेखन-वाचनाच्या व्यवसायाकडे वळत असत. सुमारें दीड वाजेपर्यंत हें काम एकाग्रतेनें केल्यावर, टिळक तास-पाऊण तास विश्रांति घेत. सरबत, दूध वगैरे कांहीं तरी घेऊन ते या वेळांत आचाऱ्याशीं मोकळेपणानें गप्पागोष्टी करीत असत. फिरून दोनअडीच तास लेखन-वाचन करून टिळक आपल्या खोलींतून खालीं येत. कारण, कारागृहातील नियमाप्रमाणें संध्याकाळीं पांच वाजण्याचे सुमारास जेवणखाण उरकावें लागे व शतपावली वगैरे सारें उरकून सहाच्या ठोक्याला कोठडींत बंद होऊन पडावें लागे. कोठडींत बंद होऊन पडल्यावर ते आपल्या सोबत्याला धार्मिक, ऐतिहासिक अशा विविध प्रकारच्या गोष्टी सांगत. झोंपीं जाण्यापूर्वी तासभर ध्यानस्थ बसण्याचा टिळकांचा क्रम असे.

या सहा वर्षांच्या शिक्षेच्या अवधींत टिळकांची प्रकृति एकंदरींत चांगली टिकली. तीन-चार प्रसंगीं कांहीं किरकोळ आजारानें ते आजारी पडले, पण, त्यांतून ते लवकरच बरे झाले. ब्रह्मदेशांतला उन्हाळा त्यांना तापदायक वाटे. उन्हाळ्याच्या दिवसांत ते दररोज दोनदां थंड पाण्यानें स्नान करीत. तरीहि, त्यांना उन्हाळा असह्य वाटे. त्यांच्या डोक्यावर फोड येत व कित्येक वेळां जीव घाबरा होई. या उन्हाळ्यांत कोंडून पडण्यापेक्षां अंदमानांत राहणें बरें असें वाटून त्यांनीं सरकारकडे त्या आशयाचा अर्जहि धाडिला; पण, तो अर्ज सरकारनें फेटाळून लावला. त्या वेळीं थोडे अस्वस्थ होऊन टिळक म्हणाले, "ठीक आहे. मी येथेंच मरावें अशी भगवंताची इच्छा दिसते!" ब्रह्मदेशांतला उन्हाळा टिळकांना किती त्रासदायक वाटत असला पाहिजे हें त्यांच्या पत्रांतल्या एका बारीकशा वाक्यावरूनहि सिद्ध होत आहे. १९१४ सालच्या एप्रिलमध्यें लिहिलेल्या पत्रांत 'हें शेवटचें अभिवादन मी करीत आहें' असे उद्गार टिळकांनीं काढिले आहेत.

पहिलीं दोन-अडीच वर्षें टिळकांची मधुमेहाची व्यथा त्यांना विशेषशी तापदायक वाटली नाहीं. पण, या सुमारास त्यांना या व्याधीचा मनस्वी त्रास होऊं लागला. सामान्य औषधांनीं हा त्रास हटेना. अशक्तता तर वाढत चालली. तेव्हां शेवटीं टिळकांनीं स्वतःच विचारानें व प्रयोगानें शोधून काढलेला या व्याधीवरील उपाय फिरून करून पहाण्याचें ठरविलें. तांदूळ, गहूं, डाळ वगैरे पदार्थ वर्ज्य करून त्यांनीं केवळ लाह्या या एकाच धान्याचा उपयोग

करण्याचें ठरविलें व कारागृहावरील अधिकाऱ्यांच्या संमतीनें त्यांनीं ही उपाय-योजना सुरूहि केली. या उपायांचा परिणाम इष्ट असाच होत असल्याचें अधिकाऱ्यांच्या लक्षांत आल्यामुळें, त्यांनीं यानंतरच्या काळात टिळकांचें पथ्य तसेंच चालू दिलें. या पथ्याला पूरक म्हणून अवश्य असणारे दही, दूध, फळें वगैरे पदार्थहि अधिकाऱ्यांच्या संमतीनें टिळकांना मिळूं लागले.

मंडाले येथील वास्तव्यांत टिळकांचा जीवनक्रम एखाद्या तपस्व्याच्या जीवन-क्रमाप्रमाणेंच होता. 'वार्धके मुनिवृत्तीनाम्' या वर्णनाच्या कसोटीला त्यांचें वर्तन तंतोतंत उतरत असे. राजकारणाची उपाधि त्यांच्यापर्यंत पोंचूं नये या-विषयीं सरकार अत्यंत दक्ष असल्यामुळें, या विवंचनेपासून त्यांचें मन मुक्तच झालें होतें. पुण्याहून येणारें मासिक पत्र, त्यांच्याकडून पुण्यास जाणारें मासिक पत्र व वर्षांतून तीन-चार वेळां त्यांना भेटावयास येणारे त्यांचे भाचे श्री. धोंडोपंत विद्वांस अशा तुरळक प्रसंगांनीं तुरुंगाबाहेरचें सांसारिक जग टिळकां-च्या अध्ययन-समाधीचा व तपस्वीवृत्तीचा काय भंग करीत असेल तेवढाच!

आणि, हा भंग झाला आणि टिळकांचें मन बहिर्मुख होऊन सांसारिक गोष्टींचा विचार करूं लागलें म्हणजे, तेवढ्यापुरतें तरी, तें अगदीं बारीक-सारीक तपशिलांतहि शिरल्यावांचून रहात नसे. त्यांना झालेल्या शिक्षेचा फेर-विचार व्हावा म्हणून त्यांच्या स्नेह्यांनीं जे प्रयत्न चालविले होते व या प्रयत्नांना जें अपयश सतत येत होतें त्याच्याकडे अशा प्रसंगीं टिळकांचें लक्ष वळत असे. आपल्याबरोबरीचे कोणी स्नेहीसोबती वा सहकारी इहलोक सोडून गेले असले तर त्यांचा योटक्यांत परामर्श घेण्याच्या कर्तव्याकडे त्यांचें मन अशा प्रसंगीं प्रवृत्त होत असे. सरकारनें टिळकांना लोकांपासून दूर केलें होतें तरीहि टिळक अगदीं अडाणी लोकांच्याहि मनात कायमचें स्थान करून बसलेले होते! यवतमाळ जिल्ह्यासारख्या दूरच्या जिल्ह्यांतल्या एखाद्या खेड्यांतला अनोळखी धनगर भाऊबंदकीच्या भांडणांत आपल्याला टिळकांचा सल्ला मिळावा म्हणून आपले कागदपत्र मंडालेस पाठवीतच होता. अशाहि निमित्तानें टिळकांच्या मनावर बाह्य जगाच्या बारीकसारीक व्यवहारांकडे वळण्याचा प्रसंग येत असे.

टिळकांनीं मंडालेहून लिहिलेलीं पत्रें बारकाईनें वाचलीं म्हणजे इतक्या दुरूनहि त्यांच्या मनाला कोणत्या गोष्टींची विशेष विवंचना वाटत होती, हें

ग्रंथसंग्रहाला टिळक कसे प्राणापलीकडे जपत असत हेंहि त्यांनी या काळांत लिहिलेल्या पत्रांवरून सिद्ध होत आहे.

अशा प्रसंगीं आपल्या मनावर व बुद्धीवर घडका मारणाऱ्या सांसारिक जगाला एरवीं पूर्ण मज्जाव करून टिळकांनीं मंडालेच्या या तपोधामांत अध्ययन चालविलें. गीतेंतल्या तत्त्वज्ञानाचा अर्थ स्वतंत्रपणें लावतां येण्यासारखा आहे ही कल्पना त्यांच्या मनांत यापूर्वी अनेक वर्षे घोळत होती. ती कल्पना तपासून पहाण्यासाठीं व सिद्ध करून दाखविण्यासाठीं त्यांनीं ग्रंथवाचनाचा धडाका सुरू केला. गीता, महाभारत, वेदान्त, ऋग्वेद इत्यादींचा अभ्यास करूं पहाणाऱ्या विद्यार्थ्यानें जर्मन पंडितांनें या विषयांवरील संशोधन मुळांतच वाचलें पाहिजे, असें टिळकांच्या मनानें घेतलें असावें. म्हणून, जर्मन भाषेवरील पुस्तकें मागवून त्यांनीं ती भाषा शिकण्याला सुरवात केली. ही भाषा हस्तगत होऊन जर्मन ग्रंथ वाचतां येऊं लागल्यामुळें, टिळकांना जो अपूर्व आनंद वाटूं लागला त्याची चमक दि. २-९-१० ला त्यांनीं लिहिलेल्या पत्रांतल्या पुढील उताऱ्यांत* स्पष्टपणें दिसत आहे:

**वेबरचा ग्रंथ वाचला. तो जर्मन भाषेंत आहे. दर तासास पांच पानें याप्रमाणें मला तो लावूनलावून वाचतां आला. त्याचा किती आनंद झाला हें काय सांगूं? मला वाटलें कीं, माझ्या बंदिवासापैकीं कांहीं भाग खराच सत्कारणीं लागला!**

जर्मन भाषेप्रमाणेंच टिळकांनीं या काळांत फ्रेंच भाषेचाहि अभ्यास केला. मंडालेच्या जेल सुपरिंटेंडेंटकडूनच, ह्यूगोचें बालबोध फ्रेंच व्याकरण मिळवून, १९०९ च्या ऑगस्ट महिन्यापूर्वीच टिळकांनीं हा उपक्रम सुरू केला होता. बौद्धसंप्रदायाचें तत्त्वज्ञान अवगत व्हावें म्हणून त्यांनीं या अवधींत कित्येक पाली ग्रंथहि वाचले. 'पाली म्हणजे विकृत संस्कृत' असें म्हणणाऱ्या टिळकांना या भाषेचें प्रावीण्य मिळविण्यासाठीं मोठेसे कष्ट पडले असतील, हें शक्यच नाहीं. गीतेवरील ग्रंथाशिवाय अन्य ग्रंथ लिहिण्याचेंहि टिळकांनीं या काळांत योजिलें होतें. शून्यलब्धिगणितासंबंधींची कांहीं स्वतंत्र उपपत्ति ते या काळांत

---

* लो. टिळक यांचें चरित्रः खं. २ : भा. ९ : पृ. २४.

घालवीत होते. राजकारणशास्त्र, हिंदुधर्म इत्यादि विषयांवरील विविध ग्रंथ ते ठिकठिकाणांहून मागवून घेत होते व अभ्यासीतहि होते.

टिळकांना मंडालेच्या कारागृहांत ग्रंथवाचनाची व लेखनाची संधि मिळाली तिचें महत्त्व काय व तिच्या मर्यादा काय होत्या हें मुक्ततेनंतर स्वतः टिळकांनींच सांगितलेल्या हकीकतींतल्या पुढील अवतरणावरून* स्पष्ट होत आहे :

> मला ग्रंथ वाळगण्याची परवानगी मिळाली नसती तर हे दिवस जाणें अत्यंत दुर्घट होतें. कारण,...बाहेरील जग आम्हांस शून्य झालें होतें...ग्रंथांसंबंधींहि तीनदां तीन हुकूम झाले. पहिल्यानें मीं जितकीं बुकें मागितलीं तेवढीं, त्यांतील विषय काय आहे हें तपासून, माझ्या ताब्यांत दिलीं. वर्तमानकालीन (current) पॉलिटिक्स या विषयावरील कोणतेंहि बुक ठेवण्याची परवानगी नव्हती व तें मिळतहि नसे. तसेंच वर्तमानपत्रें व मासिक पुस्तकें...सर्व बंद केलेलीं होतीं...हीं पुस्तकें सर्व माझ्याजवळ ठेवण्याचें कांहीं दिवसांनीं बंद होऊन, फक्त चार पुस्तकेंच मजजवळ एका वेळीं ठेवावीं, असा हुकूम झाला. त्यावर पुन्हां सरकारकडे मीं अर्ज केल्यानंतर, ग्रंथलेखनासाठीं म्हणून सर्व पुस्तकें पुनः मजजवळ ठेवावीं, असा हुकूम झाला. तथापि, प्रत्येक पुस्तकांत पानें किती आहेत तीं तपासून व त्यांची संख्या मुखपृष्ठावर लिहून त्याच्याखालीं सुपरिंटेंडंटची सही होऊन तीं पास व्हावीं लागत...पुस्तकांची संख्या मी तेथून निघालों तेव्हां सुमारें ३॥ शें पासून ४ शें पर्यंत झालेली होती. ग्रंथलेखनासाठीं जे कागद देत तेहि सुटे न देतां बांधलेलीं बुकें— यांतील पानें मोजून—देत असत व लिहिण्याकरितां शाई न देतां फक्त शिसपेन्सलीच—व त्यादि करून—देत असत. कारण, जेलचे नियमाप्रमाणें चाकू बाळगण्याची कैद्यास परवानगी नाहीं. फक्त घरीं दर महिन्यास जें पत्र मी लिहीत असें तेवढ्यापुरता मात्र सुटा कागद, शाई व पेन मिळत असे.

ग्रंथलेखनाची तयारी करण्यांत टिळक मंडालेच्या कारागृहांत राहून जेथे

* लो. टिळक-चरित्र : खं. २ : भा. १ : पृ. ५४.

होते त्या अवधींत बाहेरचें हिंदी राजकारण पुष्कळच विस्कळित नि निर्जीव झालें होतें. कॉंग्रेसमधून टिळकांच्या अनुयायांनीं अंग काढून घेतल्यामुळें ती संस्था निष्प्रभ बनली होती. क्रांतिकारकांच्या साहसी कृत्यांची चुणूक मधून-मधून मिळत असली तरी, बंगाल, पंजाब, महाराष्ट्र वगैरे भागांत झालेल्या दडपशाहीमुळें हा पक्षदेखील दबल्यासारखाच झाला होता. टिळकांच्या मुक्ततेच्या खटपटी मात्र टिळकांच्या स्नेह्यासोबत्यांनीं अव्याहत चालविल्या होत्या इंग्लंडमधल्या आपल्या दीर्घकालीन वास्तव्यांत श्री. दादासाहेब खापर्डे यांनीं या दिशेनें करावयाच्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली होती, पण, तिचा त्या वेळी कांहीं उपयोग झाला नाहीं.

या खटपटी निष्फल होत आहेत असें बाह्यात्कारी दिसत असलें– आणि प्रत्यक्ष फळाच्या दृष्टीनें त्या शेवटीं निष्फलच ठरल्या हेंहि खरें असलें– तरी त्यांचा अल्पस्वल्प परिणाम होत होता, असें दिसतें टिळकांना मंडाले कारागृहांत नेऊन ठेवल्यापासून वर्षाभराच्या आंतच त्या तुरुंगांत एकाएकीं पटकीचा आजार सुरू झाला, म्हणून टिळकांना मंडालेहून हलवून ब्रम्हदेशांतच मेक्टिला येथील कारागृहांत ठेवण्यांत आलें टिळकांना कांहीं शर्तींवर सोडण्याला सरकार या सुमारास तयार झालें होतें, पण, टिळकांनीं शर्ती मान्य करण्याला स्पष्ट नकार दिल्यामुळें,* या वेळीं कांहींच घडलें नाहीं

बाहेरचें राजकारण कळून टिळकांच्या मनाला त्रास होऊ नये यासाठीं सरकार पराकाष्ठेची दक्षता घेत होतें हें खरें, पण, सहा वर्षांच्या या दीर्घकाळांत एक दिवस असा आलाच कीं त्या दिवशीं राजकारण टिळकांच्या कानावर पडलेंच! इंग्लंडहून परत आलेले श्री. दादासाहेब खापर्डे १९१० च्या ऑक्टोबर महिन्यांत टिळकांना भेटण्यासाठीं मंडाले येथें गेले. कॅप्टन तारापूर या नांवाचे पारशी गृहस्थ या वेळीं मंडाले येथील कारागृहाचे पर्यवेक्षक होते. वासुदेवराव विजापूरकर, गोडबोले व शिरोळकर या त्रिवर्गासह दादासाहेब दि. २१।१०।१० ला तारापूरमहाशयांना भेटले. 'टिळकांना आज भेटाल तर फक्त एकदाच भेटतां येईल, उद्यां भेटाल तर सकाळीं व संध्याकाळीं दोन वेळा भेटतां येईल' असें तारापूरमहाशयांनीं सांगितल्यावर, दि. २२।१०।१० ला

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ५४६ व खं. ३ : पृ. ३५०

सकाळीं पहिल्या भेटीची वेळ ठरली. तायपूरसाहेब सहानुभूतिशून्य नाहींत हें दादासाहेबांना बरोबरच्या मंडळींनीं सांगितलें असावें; नि कोणी सांगितलें नसलें तरी, हें कळण्याइतकी मनुष्यस्वभावाची पारख दादासाहेबांना होतीच! मध्यंतरींचें सारें राजकारण, टिळकांच्या सुटकेसाठीं झालेल्या खटपटी वगैरे सर्व हकीकत टिळकांना कळावी ही तर दादासाहेबांची इच्छा व ही हकीकत सरळ टिळकांना सांगण्याची तर नियमांमुळें चोरी! तायपूरसाहेबांनाच श्रोता करून दादासाहेबांनीं रसाळपणें सर्व हकीकत सांगितली! दादासाहेबांच्या रसवंतीच्या प्रवाहांत निमज्जन करणाऱ्या तायपूरमहाशयांनीं ती सर्व ऐकून घेतली! दोन्ही वेळच्या भेटींच्या वेळीं दादासाहेब नि टिळक एकमेकांना कडकडून भेटले! डोळे आर्द्र होऊं नयेत म्हणून दादासाहेबांनीं मनस्वी धडपड केली; पण, शेवटीं त्यांचें मित्रप्रेम एकदोन अश्रुबिंदूंच्या रूपानें नेत्रांत अवतरलेंच! टिळकांच्या निवासामुळें पुनीत झालेली कोठडी पाहण्याची दादासाहेबांना अनिवार इच्छा होती! नियमांप्रमाणें ती पुरवणें होण्यासारखी नव्हती! ही अडचणसुद्धां तायपूरमहाशयांच्या युक्तिचातुर्यामुळें व धोरणा-मुळें नाहींशी झाली! तायपूरमहाशयांच्या कार्यालयावर [illegible] मजला होता. सर्व कागदपत्रांवर देखरेख ठेवण्याची सोय व्हावी या हेतूनेंच हा मजला चढविलेला होता. पाहुण्यांना तेथें नेण्यांत तायपूरसाहेबांच्या हातून कसलाच नियमभंग होत नव्हता. सर्वांना घेऊन तायपूरमहाशय या ठिकाणीं गेले! तासभर पावलें टाकीत आपल्या बोर्डकडे चाललेली टिळकांची मूर्ती दादा-साहेबांनीं डोळे भरून पाहिली. मंडालें कारागृहांतल्या त्या तपोधामाकडे पाहतांना दादासाहेबांच्या मनांत विचारसागर उचंबळून आला असला पाहिजे! खापर्ड्यांच्या या भेटीचा टिळकांच्या मनावर काय परिणाम झाला हें टिळकांच्या-च शब्दांत* सांगणें अवश्य आहे :

खापर्ड्यांची ही भेट म्हणजे या कंटाळवाण्या वनवासांतील पर्वणी गोड स्वप्नाप्रमाणें वाटली. पण, स्वप्नासारखीच ती टिकली. दोन वर्षें राहून, नियमांचे धडधाकट धक्के सोसल्यामुळें खापर्ड्यांचे घरचे केस पांढरे झालेले दिसले. त्यांच्या आगमनानंतर मेहमांचा उल्हास व विनोद थोडा कमीच दिसला.

* लो. टिळक यांचें चरित्र : ख. २ : भा. १ : पृ. २६.

बादशहा पंचम जॉर्ज यांच्या राज्यारोहणानिमित्त दिल्लीस दरबार भरला त्या-वेळीं– म्हणजे १९११ च्या डिसेंबर महिन्यांत– टिळकांच्या मुक्ततेच्या प्रश्नाला बरीच चालना मिळाली होती. राज्यारोहणानिमित्त जाहीर होणाऱ्या सवलतींच्या सट्टयांत कदाचित् आपली मुक्तता होऊन जाईल, अशी अंधुक आशा टिळकांना वाटत असावी असें दि. २।११।११ या त्यांनीं लिहिलेल्या पत्रांतल्या 'या सट्टयांत सुटलों तर बरेंच' या वाक्यावरून* दिसतें. दिल्लीदरबारानंतर बादशहांची स्वारी कलकत्त्यास गेली तेव्हां टिळकमुक्ततेचा प्रश्न त्यांच्यापुढें आला होता. टिळकांच्या मुक्ततेमुळें महाराष्ट्रीय लोकमत संतुष्ट होईल अशी खात्री असल्या-मुळें, टिळकांना सोडण्यांत यावें अशी शिफारस सर गंगाधरराव चिटणवीस यांच्यासारख्या सल्लागारांनीं केली होती† व स्वतः बादशहा नि गव्हर्नर जनरल लॉर्ड हार्डिंज यांची या शिफारशीप्रमाणें वागण्याची सिद्धताहि होती, असें म्हणतात. सरकारी गोटांत शिजत असलेल्या या वाटाघाटींचा वास घेणाऱ्या उत्सुक लोकमताच्या कल्पनेच्या उड्डाणानें टिळकांना साबरमतीच्या तुरुंगांत आणून ठेवलेंहि होतें, असें म्हणतात. पण, शेवटीं मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड सिडनहॅम यांचीच दुराग्रही पुण्याई सबळ ठरली! याहि वेळीं टिळकांची मुक्तता झाली नाहींच!

१९१० च्या हिंवाळ्यांत टिळकांनीं गीतेवरील आपला ग्रंथ लिहिण्याला प्रारंभ केला व या ग्रंथाच्या लेखनाचें काम १९११ च्या फेब्रुवारींत पुरें झालें. गीतेच्या श्लोकांचें भाषांतर करण्याचें काम पुढें सुमारें दोन महिने चाललें होतें. म्हणजे विशेष असा कीं, या विद्वन्मान्य ग्रंथाचें पहिलें हस्तलिखित सरासरी सहा महिन्यांत सिद्ध झालें. या वेळपर्यंत टिळकांची प्रकृति चांगली टिकली होती व त्यामुळेंच त्यांना या ग्रंथासाठीं करावयाचें वाचन व या ग्रंथाचें प्रत्यक्ष लेखन या गोष्टी इतक्या उत्साहानें करतां आल्या. पुढेंपुढें प्रकृति क्षीण होऊं लागल्यामुळें, टिळकांच्या आवडीच्या वाचन-लेखनकार्यावर कसा अनिष्ट परिणाम झाला याचा पुरावा टिळकांनीं १।२।१९१४ ला लिहिलेल्या पत्रांत आढळतो. टिळक म्हणतात‡ :

* लो. टिळक यांचें चरित्र : खं. २ : भा. ९ : पृ. ३४.

† आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ५४६.

‡ लो. टिळक यांचें चरित्र : खं. २ : भा. ९ : पृ. ४९.

अपील करणार मते व ते नामंजूर करणार मते' हे वाक्य* टिळकांनी १।७।१२ च्या पत्रांतच लिहून ठेविले होते.

टिळक मंडाले येथें होते त्या अवधींतहि त्यांच्या पांडित्यामुळे व देशभक्तीमुळे आकृष्ट झालेले अन्यदेशीय विद्वान् पुण्यास त्यांच्या निवासस्थानी येत असत. मि. मायरन फेल्प्स या नांवाचे एक जिज्ञासु अमेरिकन गृहस्थ १९११च्या ऑगस्ट महिन्यांत गायकवाडवाड्यांत येऊन राहिले होते. पुण्यांतले काम उरकून त्यांनी जाण्याची तयारी चालविली तेव्हां त्यांचे छायाचित्र घेण्याची गायकवाड-वाड्यांत तयारी करण्यांत आली. छायाचित्रासाठी बसतांना व स्वतः टिळक नाहीत तर निदान त्यांच्या छायाचित्राच्या सन्निध तरी बसण्याचा मान आपल्याला मिळावा ही भावना व्यक्त करतांना हे गृहस्थ म्हणाले† :

*I could be more glad if I were photoed along with my host, Mr. Tilak; in whose sad absence I was hospitably entertained. However, I shall be pleased to be taken in even without his person, with his mere photo.*

( मी त्यांच्या घरीं उतरलो त्या टिळकांच्या समवेत माझें छायाचित्र निघालें असतें तर मला विशेष आनंद वाटला असता. टिळकांच्या दुःखदायक गैरहजेरींतहि माझें आदरातिथ्य अपरिमितपणें झालें. पण टिळक तर नाहींतच; म्हणून, त्यांच्या छायाचित्रासमवेतच स्वतःचें छायाचित्र घेऊन मी समाधान मानतों. )

टिळकांच्याबद्दल या गृहस्थाला काय वाटत असे हें त्याने या मुक्कामांत काढिलेल्या पुढील उद्गारांवरून स्पष्ट होत आहे :

That great man's world wide fame and his antiquarianism brought me here, especially to this part of the country. Your holy land has ever produced great men among whom we reckon Mr. Tilak. Men like Tilak are born for the world's progress and not merely for their

* लो. टिळक यांचे चरित्र : खं. ३ : भा. ५, पृ. ३८.

† आठवणी व आख्यायिका : खं. १ भा. १, पृ. ५९२

own land. ( टिळकांची त्रिखंडव्यापी कीर्ति आणि प्राचीन-संशोधन क्षेत्रांतला त्यांचा अधिकार यांच्यावर लुब्ध होऊन मी या देशांत आलें. विशेषतः मी या मराठी मुलुखाकडे वळलें तो केवळ या आकर्षणामुळेंच! तुमच्या या पावन भरतभूमींत विभूतिजन्माची परंपरा सतत चालत आली आहे. आम्ही टिळकांची गणना या विभूतिपरंपरेंत करतों. केवळ स्वदेशाची प्रगति हा टिळकांसारख्या विभूतींच्या जन्माचा हेतु नसतो; त्यांचा अवतार जगाच्या प्रगतीसाठींच झालेला असतो. )

रात्र कितीहि लांब असली— अगदीं ध्रुवप्रदेशाजवळची रात्र असली— तरी तिचा समाप्तिसमय हळूहळू येतोच येतो. १९१४ च्या जुलैच्या अखेरीस आपल्या शिक्षेचीं सहा वर्षें पुरीं होत असल्यामुळें, आतां लवकरच आपल्याला येथून हलविण्यांत येईल हें टिळकांनीं या वर्षाच्या मे महिन्याच्या सुमारास ओळखलेंच होतें. पूर्वीच्या खटल्यांत न भोगलेली सहा महिन्यांची शिक्षा आपल्याला आतां भोगावयाला लागेल, असें टिळकांना वाटत नव्हतें. मंडालेंत त्यांनीं जो ग्रंथसंग्रह जमविला होता तो बंदोबस्तानें परत पाठविण्याची व्यवस्था टिळकांनीं १९१४ च्या मे महिन्यांतच करून टाकिली होती.

दि. ८ जून १९०८ ला सकाळीं टिळक आपल्या कोठडींत बसले असतांना कारागृहाच्या पर्यवेक्षकाची स्वारी तेथे आली. सामानाची बांधाबांध करण्याची सूचना त्यानें टिळकांना दिली तेव्हां तिचा अर्थ टिळकांनीं ओळखला. टिळकांच्या सुटकेची बातमी अगदीं गुप्त रहावी अशी सरकारची तीव्र इच्छा असली पाहिजे. मंडाले किल्ल्यांत रेल्वेचा एक फांटा जातो तेथें एक डबा व एंजिन आणवून त्यांत टिळकांना दुपारीं बसविण्यांत आलें. हा डबा पुढें मेलला जोडण्यांत आला. टिळकांची पगडी त्यांच्याजवळ होती; पण, या प्रवासांत त्यांनीं ती घालूं नये असें फर्माविण्यांत आलें होतें. रंगूनपर्यंत टिळकांनीं टोपी घातली; पुढें त्यांना रुमाल बांधावा लागला. वाटेंत प्रत्येक स्टेशनवर टिळकांच्या डब्याचीं दारें लावून घेण्यांत येत होतीं. दि. ९।६।१४ ला सकाळीं रंगून बंदरांत उभ्या असलेल्या मेयो बोटीवर टिळकांना चढविण्यांत आलें. त्या वेळींहि त्यांना कोणी ओळखिलें नसावें.

ही बोट मद्रासकडे चालली होती तरी, मद्रासबंदर येईपर्यंत आपण कोणीकडे चाललों आहों हें टिळकांना कळूं शकलें नाहीं. बोट मद्रासेस केव्हां

कडे वळतात की काय, इकडे टिळकांचें लक्ष होतें. तो रस्ता सोडून मोटारी गांवच्या रस्त्याला वळल्या तेव्हां टिळकांना स्वतःच्या सुटकेविषयीं खात्री वाटूं लागली. पुढच्या मोटारींतले पोलीसअधिकारी टिळकांना पोंचवावयाला गायकवाडवाड्यापर्यंत गेले नाहींत. मागच्या मोटारींत टिळकांच्याबरोबर गायडरसाहेब व सदावर्ते होते. ही मोटार गायकवाडवाड्याच्या दरवाजासमोर येऊन पोंचली तेव्हां मध्यान्ह उलटून तास तरी झाला होता. टिळकांना गाडींतून उतरावयास सांगतांना गायडरसाहेबांनीं त्यांना एक शुभवार्ता सांगितली. उरलेल्या मुदतीची शिक्षा—म्हणजे जेमतेम महिनासव्वा महिन्याची शिक्षा— सरकारनें कृपाळूपणानें विनशर्त माफ केली आहे असें गायडरसाहेबानें म्हटल्यावरोबर, 'याबद्दल सरकारला माझे आभार कळवा' असें उत्तर टिळकांनीं दिलें. वाड्यांत शिरण्यासाठीं टिळक दिंडीदरवाजापाशीं गेले.

आपल्या किल्ले-कोटांच्या संरक्षणाचें नि बंदोबस्ताचें काम गडकरी-मेटकऱ्यांकडून कसोशीनें केलें जात आहे कीं नाहीं याची पारख करण्यासाठीं श्रीछत्रपति शिवाजीमहाराज रात्रीच्या वेळीं वेषांतर करून मुद्दाम किल्ल्यांवर जात असत. स्वतःच्या किल्ल्याच्या दरवाजासमोर किल्ल्याच्या धन्याला ताटकळत, हुजत घालीत उभें रहावें लागत आहे, हें दृश्य अशा प्रसंगीं पहावयाला सापडत असे. तशाच प्रकारचें दृश्य या प्रसंगीं गायकवाडवाड्याच्या दिंडीदरवाजानें पाहिलें. बाबासाहेब विद्वांस यांची तशी सक्त ताकीद असल्यामुळें, देवडीवर पहाऱ्यासाठीं नेमण्यांत आलेला भय्या तशा अपरात्रीं दरवाजा उघडीना. शेवटीं त्याला काय वाटलें कोणाला ठाऊक—आपल्यासमोर कदाचित् टिळकच स्वतः उभे आहेत असें त्याला टिळकांच्या आविर्भावावरून वाटलें असेल— त्यानें आंत जाऊन बाबांना उठवून दरवाजापाशीं आणलें. मामांना अचानकपणें पाहतांच बाबांना आनंदाचें केवढें भरतें आलें असेल नि बाबा कसे गहिंवरून गेले असतील हें, याचाच्या रागीट बोलण्यामागचें कोंवळें मन ज्यांच्या परिचयाचें असेल त्यांनाच बरोबर समजूं शकेल!

बंदोबस्त कडक रहावा म्हणून वाजवीपेक्षां जास्त कांटेकोरपणानें वागणाऱ्या आपल्या दुर्गरक्षकांना शिवाजीमहाराज धन्यवादच देत असत! टिळकांनीं आपल्या दुर्गरक्षक 'धोंडू'चें कौतुक नेमक्या कोणत्या शब्दांनीं केलें

असा क्रम पहाटे चार वाजेपर्यंत चालला. मग टिळकांनी मंडळींचा निरोप घेतला नि ते झोंपी गेले.

दुसऱ्या दिवशीं टिळक सुटल्याची वार्ता गांवांत व देशांत पसरली. दर्शनोत्सुक माणसांची नि आनंदप्रदर्शक तारापत्रांची गर्दी होऊं लागली! देशांत सगळीकडे आनंदीआनंद झाला. कोणी पेढे वाटूं लागले, कोणी आपल्या व्रतांचीं उद्यापनें करण्याच्या उद्योगाला लागले तर कोणी नवस फेडूं लागले सहा वर्षांनंतर टिळक आपल्या पूर्वपरिचित सहकाऱ्यांकडे नि संस्थांकडे पाहूं लागले. कोणी कशीबशी धुगधुगी धरून राहिले आहेत, कोणी देशोधडीला लागले आहेत, कोणी भीतिग्रस्त झाले आहेत नि राजकारणाला थंड गोळ्याची अवस्था प्राप्त झाली आहे, असें त्यांना आढळून आलें! हळूहळू बाहेरगांवचे इष्टमित्र, पुढारी नि अनुयायी टिळकांच्या भेटीला येऊं लागले. दि. २१-७-१४ रोजीं सायंकाळीं महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांच्या अध्यक्षतेखालीं गायकवाडवाड्यांत सभा होऊन, पानसुपारीच्या निमित्तानें टिळकांचें जाहीर स्वागत करण्यांत आलें. **'सहा वर्षांपूर्वी मी आपल्याशीं ज्या तऱ्हेनें वागलों त्याच तऱ्हेनें, त्याच नात्यानें व त्याच पेशानें मी यापुढेंहि वागेन'** असें जाहीर आश्वासन टिळकांनीं या सभेंत दिलें.

टिळकांचा जुना खाक्या फिरून सुरू होणार असें पाहून सरकारनें दि. २९ ला एक विचित्र हुकूम काढला. अशा हुकुमानें लोक टिळकांच्या भेटीला वा दर्शनाला जायचे थांबतील, असें सरकारला वाटत होतें. टिळकांकडे जाणाऱ्या लोकांना भय वाटावें म्हणून वाड्यासमोर पोलीस-पहारा ठेवण्यांत आला; तरी येणारे लोक येतच होते. टिळकांनीं तुरुंगांत गीतेवर ग्रंथ लिहिला आहे ही गोष्ट लोकांना माहीत असल्यामुळें, ग्रंथाविषयींची चौकशी पुष्कळ लोक करीत; पण, टिळक सुटून आले तरी त्यांनीं लिहिलेल्या ग्रंथाचें 'हस्तलिखित' अजून सुटून आलें नव्हतें. त्यांतहि कांहीं तरी भयंकर असेल असें सरकारला वाटलें. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांच्याकडे हें हस्तलिखित गुपचूप धाडण्यांत आलें. हस्तलिखितांतल्या मजकुराची बारकाईनें तपासणी करण्याची अप्रिय कामगिरी बिचाऱ्या शास्त्रीबुवांवर सोंपविण्यांत आली! टिळक सुटून महिना होत आला तरी सरकारकडून हस्तलिखित परत येईना! त्यामुळें कांहीं मित्रमंडळी अस्वस्थ होऊं लागली. 'सरकार हस्तलिखित दाबून टाकील' अशा भीति कोणी व्यक्त

असें दिसतें. दि. १४–१५ डिसेंबरच्या सुमारास गोखले यांनीं मद्रास कॉंग्रेसचे नियोजित अध्यक्ष भूपेंद्रनाथ बसू यांना एक गुप्त पत्र लिहिलें. टिळक हे सरकारवर बहिष्कार घालावा अशा मताचे आहेत व आयरिश पद्धतीच्या चळवळीचा पुरस्कार करणारे आहेत, अशा आशयाचा मजकूर या पत्रांत होता. हें पत्र रवाना केल्यावर दोनचार दिवसांत गोखले परतभेट म्हणून गायकवाडवाड्यांत आले नि त्यांनीं टिळकांशीं चर्चा केली. या चर्चेचा प्रसिद्ध झालेला गोषवारा पुढीलप्रमाणें आहे* :

**( गोखले निघून गेल्यावर टिळक वर आले तेव्हां ) खाडिलकरांनीं त्यांस विचारलें, "काय म्हणतात गोखले?" यावर "गोखले म्हणतात तुम्ही कॉंग्रेसमध्यें येऊं नका, कॉन्स्टिटयूशनचें व त्याजच्या कॉंग्रेसमधील मंडळींचें व तुमचें पटणार नाहीं" असें टिळकांनीं उत्तर दिलें. यावर तुम्ही काय उत्तर दिलें असें खाडिलकर यांनीं विचारल्यावरून टिळक म्हणाले, "मी गोखल्यांस असें स्वच्छ सांगितलें कीं, कॉंग्रेस सर्वांची आहे; ती कांहीं कोणत्याहि एका पक्षाला आंदण दिली नाहीं. मी प्रथम 'कंट्री' तयार करणार, कॉंग्रेसमध्यें येणार व कॉंग्रेस काबीज करणार आहें."**

'राष्ट्रीय पक्षाचा कॉंग्रेसप्रवेश' हा विषय या सुमारास प्राधान्य पावला असल्यामुळें, टिळकांनीं दि. २२।१२।१४ च्या केसरींत 'राष्ट्रीय पक्ष व मद्रासची कॉंग्रेस' हा लेख लिहिला. ऐक्य प्रस्थापनेचें महत्त्व ओळखून बिझांटबाई त्या दिशेनें खटपटीला लागल्या याबद्दल त्यांना धन्यवाद देतांना टिळक लिहितात :

हल्लींच्या लढाईनंतर हिंदुस्थानास जी राजकीय परिस्थिति प्राप्त होईल त्यांत या ऐक्याची किती जरूरी व महत्त्व आहे वगैरे गोष्टींचा कळकळीनें आणि जोरानें ऊहापोह करण्यास आतां मिसेस बिझांटबाई कारण झाल्या असून त्याबद्दल त्यांचें उभयपक्षांनीं अभिनंदन करणें जरूर आहे.

कॉंग्रेसप्रवेशाबाबत राष्ट्रीय पक्षाची तक्रार नेमकी कोणती आहे याचें स्पष्टीकरण करतांना टिळक या लेखांत लिहितात :

सन १९११ व १९१२ सालीं मुखत्यारांच्या निवडणुकीसंबंधाचें कन्व्हेन्शनचें

---

* आठवणी व आख्यायिका : खं. १ : भा. १ : पृ. २७–२८.

लेखाला त्यांनीं मजुरी दिली असेल कीं नाहीं, याची शंकाच आहे पण, 'शिष्यापराधे गुरोर्दंड' या न्यायानें सर्व्हंटाकरिता ना गोपाळराव गोखले यासहि त्याचें प्रायश्चित्त भोगावें लागल्यास त्यात काहीं नवल नाहीं

याच लेखात टिळकानीं स्वत च्या व गोखल्याच्याहि 'गोंवऱ्या ओंकारेश्वरावर गेल्या' असल्याचें लिहिलें, आणि, दुर्दैवानें यानतर दहाच दिवसानीं—म्हणजे १९ २ १९१५ रोजीं—गोखले मरण पावले! त्यामुळें टिळकाच्या लिहिण्याचा फार बभ्रा झाला!

गोखले मरण पावले त्या वेळीं टिळक सिंहगडावर होते 'गीतारहस्य' ग्रंथ छापण्याला सुरवात करण्याच्या पूर्वी त्याचें हस्तलिखित पक्कें करण्याच्या उद्योगात ते गढून गेले होते गोखल्याच्या मृत्यूची वार्ता त्याना गडावर कळविण्यात आली गोखले व टिळक यांच्यामध्यें राजकीय मतभेद तीव्र स्वरूपाचे आहेत येवढेंच वरवर पहाणाऱ्या कित्येक टिळकभक्ताना माहीत होतें, पण, या दोन व्यक्तींच्या अत करणात परस्पराविषयीं किती आदर होता, याची कल्पना त्याना नव्हती गोखल्याना जन्मभर शिव्या देणाऱ्या टिळकाना अशा प्रसगीं मुद्दाम बोलावण्यात काहीं अर्थ नाहीं, असें यापैकीं काहींना वाटलें औपचारिक रीतीनें टिळक गडावरून आले असले तरी, ते गोखल्याच्या प्रेतयात्रेबरोबर अखेरपर्यंत जाणार नाहींत, असें दुसऱ्या कित्येकाना वाटलें! स्वत च्या अनुयायापैकीं या दोन्हि प्रवृत्तींच्या लोकाची टिळकानीं निराशा केली! गोखल्याच्या प्रेतयात्रेनतर टिळकानीं ओंकारेश्वरावर जें भाषण केलें तें सर्वांच्या कल्पनेहून भिन्न ठरलें! गोखल्याच्या देशभक्तीचा गौरव आणि त्याच्या अकालीं मृत्यूमुळें देशाची झालेली अपरिमित हानि या मुद्दयाचें टिळकानीं केलेलें विवेचन ऐकताना प्रेतयात्रेला गेलेले लोक गहिंवरून गेले.

दि २३ २ १९१५ च्या केसरींत टिळकानीं गोखल्याच्या गुणगौरवपर लेख लिहिला गोखल्याच्या चरित्राचें मर्म उकलून सागताना टिळकानीं पुढील वाक्य लिहिलें

एका गरीब ब्राह्मणाच्या मुलानें शाळेंत अभ्यास करून परीक्षा पास झाल्यानतर काहीं थोड्या वर्षांतच, हत्ती, घोडे, सपत्ति, सत्ता किंवा अशाच प्रकारचीं दुसरीं बाह्य साधनें जवळ नसता, वयाच्या पन्नासाव्या वर्षापूर्वीच सर्व देशात आपलें नाव आबालवृद्धाचे तोंडीं ठेवून जावें हे काहीं लहानसहान

काम नव्हे, आणि, हें काम कोणासहि आपल्या बुद्धिमत्तेनें, दीर्घोद्योगानें, सतत उच्च ध्येय मनापुढें ठेवून केवळ आपल्या कर्तबगारीनें करतां येतें, हें गोपाळरावजींच्या चरित्रांतील मुख्य मर्म होय.

गोखले व टिळक यांच्यांत भेद कितीहि असले तरी, त्यांच्या दोघांच्याहि जीवनात एका बाबतींत साम्य होतें. तें साम्य वर्णिताना टिळक लिहितात : बाल्यपणीं अभ्यास व तरुणपणीं संसार यथास्थित करून, मद्यावलेल्या कायिक व मानसिक शक्ति इतर कर्तव्याभावीं लोकोपयोगास वाहणारे पुरुष कोठें आढळून आल्यास त्याबद्दल विशेषशी आदरबुद्धि मनात उत्पन्न होत नाहीं. पण, इंद्रियशक्ति शाबूत आहे, शरीर स्वार्थासाठीं उद्योग करण्यास समर्थ आहे, वार्धक्य अजून दूर राहिलें आहे आणि संसारांतील सुखाचें स्वरूप अद्याप मनोहर असून तिकडे चित्ताची प्रवृत्ति होणें साहजिक आहे; अशा वेळीं, आणि विशेषेंकरून या दिशेनें गेले असतां आपणास यश मिळण्याचा इतरांपेक्षां काकणभर अधिक संभव आहे अशी मनास खात्री वाटत असताहि, या सर्व मनोहर देखाव्यावरून दृष्टि मागें ओढून, यथाशक्ति आपल्यास देशकार्यास वाहून घेणें, त्यांत आलेलीं संकटें सोसण्यास मधून असणें, किंबहुना त्यातच आनंद मानून त्यासाठीं सतत परिश्रम करण्यास तयार होणें याला एक प्रकारच्या दल्कट मनोनिग्रह लागत असतो. आणि, तो मनोनिग्रह ज्यानें दाखविला, दाखविलाच नव्हे तर आमरणांत कायम ठेविला, तोच पुरुष धन्य होय.

गोखल्यांच्या मृत्यूमुळें महाराष्ट्राची फार मोठी हानि झाली असें टिळकांना मनोमन वाटलें. देशाच्या राजकारणात प्रामाणिक मतभेदावर अधिष्ठित झालेले वेगवेगळे पक्ष असणें यात गैर काहींच नाहीं. प्रत्येक पक्षाची विचारसरणी व कार्यप्रणाली ही राष्ट्राच्या एकात्मते एकेक आघाडीच होय. या प्रत्येक आघाडीवर एकएक झुंजार वीर ठाम उभा असला आणि सर्व आघाड्यांवरील वीरांचें मनोमन ऐक्य असलें, म्हणजे त्यांच्या उक्तींत वा कृतींत बाह्यत कितीहि भिन्नता दिसली तरी, त्यांच्या कार्याचा एकत्र परिणाम राष्ट्राला हितकारक व प्रतिपक्षाला हानिकारकच होत असतो. टिळक व गोखले हे दोन झुंजार वीर अशा तऱ्हेचेच होते. गोखल्यांच्या मृत्यूनंतर टिळकांनी आपल्या राजकीय धोरणाला किंचित् मुरड घातली असा त्यांच्या निकटवर्ती

अनुयायांनीं त्या वेळीं बोभाटा केला होता. नेमस्त आघाडीवर लढणारा, गोखल्यांची जागा भरून काढणारा दुसरा खंदा वीर दिसेनासा झाल्यामुळें, नेमस्त राजनीतींतलें उपकारक अंग आत्मसात् करण्याचा प्रयत्न टिळकांनीं केला व तो सरधोपट राजकारणाला सरावलेल्या त्यांच्या अनुयायांना रुचला नाहीं किंवा कळला नाहीं, अशी या सर्व प्रकारची मीमांसा करणें शक्य आहे. गोखल्यांच्या मृत्यूनंतर थोडक्याच दिवसांनीं टिळकांनीं त्यांच्या दृष्टीसमोर असणाऱ्या पुण्यांतल्या कांहीं होतकरू तरुणाना चर्चेसाठीं बोलाविलें होतें. या प्रसंगीं टिळक कोणत्या विवंचनेनें ग्रस्त झाले होते व या निमंत्रित तरुणांना ते काय म्हणाले याविषयींचें वर्णन पुढील शब्दांत* करण्यांत आलेलें आहे :

ना. गोखले यांचे निधनानंतर आपली व आपल्यानंतरचीहि पिढी नाहींशी झाल्यासारखें वाटून, आतां आजवर पुण्यास दोन्ही पक्षांत अग्रस्थान होतें तें सांभाळलें कसें जाईल या विवंचनेनें कांहीं दिवस टिळकांचें मन ग्रासलें होतेंसें दिसतें. या स्थितींत केळकरांकडून त्यांनीं काहीं १२-१५ नूतन पदवीधरांस एके रात्रीं वादविवादासाठीं बोलाविलें. त्या वेळीं वादविवाद सुमारें २-२॥ तास अति मोकळेपणानें झाला. **"माझीं भांडणें तुम्हीं भांडत राहावींत अगर माझेंच धोरण पुढें चालवावें म्हणून सांगण्यासाठीं तुम्हांस बोलाविलें नाहीं; तर, राष्ट्रकार्यकर्ते व्हा; आजवर पुण्याकडे Lead होती ती घालवूं नका; तुम्ही जो उद्योग आरंभाल त्यांत मागाल तें साहाय्य करीन."**

या सुमारास महायुद्धाविषयीं ज्या घडामोडी चालल्या होत्या त्यांच्याकडेहि स्वदेशहिताच्या दृष्टीनें टिळकांचें लक्ष होतें. महायुद्ध सुरू झाल्यानंतर दोनतीन महिन्यांत जर्मनीच्या 'एम्‌डेन' जहाजानें हिंदुस्थानच्या किनाऱ्याच्या आसपास बराच धुमाकूळ घातला. लाला हरदयाळ, देवी सरोजिनी नायडूंचे बंधु वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय, स्वामी विवेकानंदाचे बंधु भूपेंद्रदत्त, चंपकरमण पिल्लेप्रभृति क्रांतिकारक जर्मनींत जाऊन राहिले आहेत, महायुद्धाची पर्वणी साधून भारताचें स्वातंत्र्य सिद्ध करण्याचा प्रयत्न करीत आहेत आणि त्या प्रयत्नांचा एक भाग म्हणूनच 'एम्‌डेन'च्या या हालचाली चालू आहेत, ही माहिती टिळकांना

---

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ४९३.

मिळालेली होती. या क्रान्तिकारकांनीं ठरविलेल्या योजना पार पाडण्याच्या कामीं कोणत्या अडचणी आहेत याचाहि त्यांनीं आपल्या मनाशीं विचार केलेला होता. राष्ट्रीय पक्षांतील मद्रासचे अध्वर्यु श्री. चिदंबरं पिळे हे या सुमारास टिळकांकडे आले होते. एके दिवशीं पहांटेच उठून टिळक पिळे यांच्याशीं गोष्टी बोलत बसले. या गोष्टी कशासंबंधींच्या होत्या याचें वर्णन * श्री. पिळे यांनींच पुढील प्रकारें केलें आहे : चालू असलेलें युरोपियन युद्ध आणि जर्मनींत असलेल्या हिंदी देशभक्तांकडून त्यांच्याकडे आलेला संदेश यांच्याविषयीं टिळक मजपाशीं बोलूं लागले. युद्धकाळांत कांहीं विविक्षित प्रकारचे प्रसंग निर्माण होतील आणि त्या प्रसंगीं भारतीयांनीं अमुकअमुक गोष्टी कराव्या, अशा आशयाचा हा संदेश होता. संदेशाप्रमाणें वागणें इष्ट आहे का, शक्य आहे का, आणि तसें वागल्याचे परिणाम काय होतील, याविषयींची चर्चा आम्ही दोनतीन दिवस चालविली होती. युद्धाच्या पायरींत युरोपांतच कित्येक गुंतागुंती असल्यामुळें, संदेश देणाऱ्यांनीं ज्या प्रकारच्या प्रसंगांचा उल्लेख केला आहे त्या प्रकारचे प्रसंग उद्‌भवणार नाहींत, असें भविष्य माझ्या या गुरूनें वर्तविलें.

या सुमारास टिळक गीतारहस्याच्या छपाईच्या कामांत सर्वस्वी गढून गेले होते. छपाईच्या कामांतील प्रत्येक बारीकसारीक गोष्टीकडे त्यांचें लक्ष असे. ग्रंथ स्वदेशी कागदावरच छापून निघाला पाहिजे हा आग्रह पुरा करण्यासाठीं त्यांनीं किती तरी आटापिटा केला. ग्रंथछपाईचें काम ज्या छापखान्यांत चाले, तेथें दररोज एक हेलपाटा मारल्यावांचून त्यांना चैन पडत नसे. हें काम चालू असतांनाच, टिळकांचें मन एका नव्या भानगडीकडे वळलें होतें. आपल्या पुस्तकांत अत्याचारी चळवळींचें वर्णन करतांना, सिरोलनें असा चळवळींत आपल्याला गोवलें ही गोष्ट टिळकांना रुचली नाहीं. चिरोलवर व त्याच्या पुस्तकाच्या आणि लेखांच्या प्रकाशकांवर अब्रुनुकसानीची फिर्याद लावण्याचा विचार सुरू आरंभापासूनच त्यांच्या मनांत घोळत होता. या कामीं पुढें पाऊल टाकण्यापूर्वी जो बहुविध विचार करावयाचा तो करून,

* आठवणी व आख्यायिका : ख. ३ : इंग्रजी विभाग पृ. १३६.

इंग्लंडमधील एखाद्या कायदेपंडिताकडून चिरोलप्रभृतींना नोटीस द्यावयाची, असें टिळकांनीं या सुमारास ठरविलें.

राष्ट्रीय सभेंत प्रवेश करावयाचा तो राष्ट्रीय पक्ष बाहेर सबळ व सघटित करून मगच करायचा असें टिळकांनीं ठरविलें. आपल्या पक्षाचें बळ लोकांच्या मनावर ठसविण्याचा आणि आपल्या पक्षाची संघटना दृढतर करण्याचा एक मार्ग म्हणून टिळकांनीं या वर्षीच्या उन्हाळ्यांत पुणें येथेंच राष्ट्रीय पक्षाची परिषद भरविण्याचें ठरविलें. दि. २०।४।१९१५ रोजीं सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत सभा होऊन या परिषदेची स्वागतसमिति बनविण्यांत आली व महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांची या समितीच्या अध्यक्षस्थानीं योजना करण्यांत आली. परिषदेचें अध्यक्षपद मुंबईचे बॅ. बॅप्टिस्टा यांना द्यावयाचें असें ठरलें. ही परिषद दि ८ मे पासून किर्लोस्कर नाट्यगृहांत मोठ्या यशस्वी रीतीनें पार पडली. बॅ. बॅप्टिस्टा यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत 'होमरूल' लीगची स्थापना व युद्धकाळांत विलायतेंत चळवळ करण्याचें महत्त्व या मुद्द्यांना प्राधान्य दिलें. टिळकांनीं या परिषदेंत महायुद्धासंबंधींच्या ठरावावर व ना. गोखले यांच्या निधनाविषयीं दुःख व्यक्त करणाऱ्या ठरावावर भाषणें केलीं. या परिषदेंत बरीच चर्चा होऊन, राष्ट्रीय पक्षाचा कॉंग्रेसप्रवेश सुकर व्हावा म्हणून वाटाघाटी करण्यासाठीं टिळक, बॅप्टिस्टा व बेळगांवचे श्री. बेळवी या तिघांची समिति नेमण्यांत आली. राष्ट्रीय पक्षाची ही परिषद चांगलीच यशस्वी झाल्यामुळें, दिपून गेलेल्या नेमस्तांनीं पुण्यांतच आपली परिषद भरविण्याचा घाट घातला. ही परिषद जुलै महिन्यात भरली; पण, पहिल्या परिषदेच्या मानानें ती अगदींच फिकी ठरली.

टिळक मंडाले येथें होते तेव्हांहि त्यांना दत्तविधानप्रकरण त्रास देतच होतें. पुणें येथील फर्स्ट क्लास कोर्टानें या प्रकरणाचा निकाल सर्वस्वी टिळकांच्या बाजूनें दिल्यावर, विरुद्धपक्षानें या निकालाविरुद्ध हायकोर्टाकडे अपील केलें होतें. टिळक मंडाले येथें असतांना या अपिलाचा निकाल सांगण्यात आला होता. न्यायमूर्तींनीं निकाल तर टिळकांविरुद्ध दिलाच होता. पण निकाल लिहितांना त्यांनीं टिळकांना कमीपणा येईल अशीं आगंतुक विधानेंहि केलीं होतीं. या निकालाविरुद्ध प्रिव्ही कौन्सिलपर्यंत जाणें टिळकांना भाग होतें. मंडाले येथील कोठडींत बसून ते बाहेरच्या मंडळींना या बाबतींतल्या

चर्चा ऐकून व तिच्यावर नीट विचार करून टिळकांनीं या वर्षीच्या गणेशोत्सवांत स्वतःच्या ग्रंथावर अनेक प्रवचनें केलीं.

'गीतारहस्य' हा ग्रंथ अनेक दृष्टींनीं अपूर्व आहे. मूळ गीता हा ग्रंथच एका दृष्टीनें अलौकिक आहे. आपल्या साध्या भाषासरणीनें बालांनाहि मोहविणारा, आपल्या व्यवहारोपयोगी शिकवणीनें संसारी माणसांनाहि मार्गदर्शन करणारा आणि आपल्या तत्त्वज्ञानानें विचारवंतांना थक्क करून सोडणारा इतका सुटसुटीत ग्रंथ जगांत दुसरा नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. अलौकिक ग्रंथांचा विशेष हा असतो कीं, त्यांचें स्वारस्य व प्रयोजन कालानें मर्यादित झालेलें नसतें. रमणीयतेच्या रूपाचें वर्णन करतांना कवीनें 'क्षणेक्षणे यन्नवतामुपैति तदेव रूपं रमणीयतायाः।' हे चरण लिहिले. जिवंत वाङ्मयाच्या रूपाचें वर्णन करूं पहाणाऱ्या माणसाला या चरणांत फारसा फरक करावा लागणार नाहीं. **'युगेयुगे यन्नवतामुपैति। तदेवरूपं स्थितवाङ्मयस्य'।** हें लक्षण स्वीकारलें तर गीताग्रंथाला तें तंतोतंत लागू पडतें. प्रत्येक युगाच्या जरुरीप्रमाणें समाजाचें योग्य मार्गदर्शन व्हावें म्हणून ज्या विचाराला प्राधान्य देणें अवश्य ठरेल तो विचार गीतेच्या मुरलींतून उमटवून दाखवितां येईल, अशीच गीतेची थोरवी आहे.

समाजाच्या कल्याणाचा विचार करणाऱ्या कर्तृत्ववान् पुरुषांनीं गीताग्रंथाचा उपयोग या तऱ्हेनेंच केला आहे. श्रीमच्छंकराचार्यांनीं त्या वेळच्या समाजस्थितींत वैदिकधर्म प्रस्थापित करण्यासाठीं गीतेचा अर्थ संन्यासपर लाविला. तेराव्या शकाच्या प्रारंभीं श्रीज्ञानेश्वरमहाराजांना भोंवतालच्या समाजाला कांहीं विशिष्ट शिकवण देणें अवश्य वाटलें. म्हणून आपल्या ज्ञानदेवींत त्यांनीं गीतेचा एक विशिष्ट अर्थ बसविला. समाजाचें हित व समाजाचें मार्गदर्शन हें ध्येय नजरेसमोर ठेवून, कर्तृत्ववान् माणसांनीं केलेलें गीताग्रंथाचें विवरणच टिकाऊ ठरलें आहे. गीतेवर संस्कृत भाषेत भाष्यें लिहिणारे अनेक आचार्य श्रीमच्छंकराचार्यांच्या मागून झाले; पण, शंकराचार्यांची प्रेषितपणाची तळमळ त्यांच्या ठिकाणीं नसल्यामुळें, हे अन्य आचार्य विद्वत्तेंत कमी नसूनहि, त्यांचीं भाष्यें शांकरभाष्याच्या मानानें कमी महत्त्वाचीं मानिलीं गेलीं. शांकरभाष्य हा मूळ ग्रंथ आणि इतर भाष्यें हीं त्याचीं शुद्धिपत्रें, असेंहि कोणी कुत्सितपणानें म्हणूं शकेल!

मिळण्याची आशा अल्पच असल्यामुळें, टिळकांच्याहि मनाला केव्हां तरी निराशा पछाडीत असेच! या निराशेला हांकलून, शुद्ध ज्ञानवताच्या आनंदाचा मोह झिडकारून, व्यक्तिस्वार्थाच्या दृष्टीनें वृत्ति पूर्ण वैराग्यशील बनवून, टिळक तीसपस्तीस कोटी देशबांधवांच्या उद्धारासाठीं शेवटच्या क्षणापर्यंत झगडत राहिले. टिळकांच्या चरित्राचें सार या दहापांच ओळींत सांगतां आलें. याच आशयाच्या विस्तृत, पांडित्यपूर्ण व तत्त्वज्ञानप्रधान स्वरूप देऊन त्यांनीं 'गीतारहस्य' लिहिलें असें म्हणणें वावगें ठरणार नाहीं. ज्ञानी माणसालाहि कर्म सोडतां येत नाहीं—किंबहुना, ज्ञानी माणसानें तर कर्म सोडतांच कामा नये—हा गीतारहस्यांतील मध्यवर्ती सिद्धात आहे. या सिद्धांताचें प्रत्यक्ष सृष्टींत अवतरलेलें उदाहरण म्हणून, आधुनिक काळांत तरी, एकट्या टिळकांचेंच नांव सांगता येईल.

'गीतारहस्यात' टिळकांनीं शंकराचार्यांवर टीका केली कीं काय, केली असल्यास ती बरोबर आहे कीं नाहीं, वगैरे वाद पंडितांनीं खुशाल घालीत बसावें! स्वतः शंकराचार्य १८५६ सालीं हिंदुस्थानांत जन्मले असते आणि गीतेवर भाष्य लिहिण्याचा प्रसंग त्यांना सांपडता आला असता तर, त्यांनीं गीतारहस्यातला सिद्धांतच मांडला असता. उलटपक्षीं, टिळक १८५६ सालीं जन्माला न येता, शंकराचार्यांच्या काळीं जन्माला आले असते तर, भोंवतालच्या समाजाच्या धारणेसाठीं अवश्य म्हणून, त्यांनीं 'शांकरभाष्यातील' सिद्धांतच आवेशानें मांडला असता! क्रियावान् पंडित समाजविमुख नसतात. शब्दपंडित नि ग्रंथपंडित मात्र त्यांची समाजसन्मुखता लक्षात न घेतां त्यांच्या कार्यांचें व लेखनाचें मूल्यमापन करीत असतात, ही दुर्दैवाची गोष्ट होय!

गीतारहस्य ग्रंथाच्या अवतारामुळें मुमूर्षु हिंदुसमाजाला कायमचें संजीवन मिळालें आहे. समाजाकडे पाठमोरा होईल तो संन्यासी आणि समाजाची पर्वा न करितां शब्दपांडित्यांत तल्लीन होईल तो ज्ञानी, या वेडगळ कल्पनांच्या नादीं लागून, मोक्षामार्गें पळत सुटलेल्या आत्मवंचक हिंदुसमाजाला अत्यंत बलवत्तर अशी विचाराची मात्रा हवीच होती! ती देण्याला टिळकांसारखा अधिकारी पुरुष मिळाला, हें हिंदुसमाजाचें भाग्य होय. ही संजीवनी मिळाली असूनहि, तिची उपेक्षा करणारे लोक टिळकभक्त म्हणून समाजांत मिरवत असतात, याहून अधिक मोठें दुर्भाग्य असूंच शकणार नाहीं! 'तुमचे अनुयायी

गीतारहस्य घेतात आणि त्याची देव्हाऱ्यांत पूजा करतात' असें टिळकांना कोणी तरी म्हणाला होता 'माझ्या प्रत्येक अनुयायानें गीतारहस्य समजून वाचलें पाहिजे' असें उत्तर टिळकांनीं या माणसाला दिलें होतें. राष्ट्रकार्यासाठीं यथाशक्ति झटणारा प्रत्येक मनुष्य टिळकभक्तच आहे, आणि म्हणून, गीता-रहस्य ग्रंथ समजून वाचण्याची व त्या ग्रंथांतील शिकवणीप्रमाणें वागण्याची जबाबदारी अशा प्रत्येक माणसावर पडत आहे टिळकांना गीतारहस्य ग्रंथ लिहून केवळ पांडित्य गाजवावयाचें असतें तर स्यांनीं तो ग्रंथ इंग्रजींत लिहिला असता. ग्रंथाचा विषय, ग्रंथलेखनासाठीं टिळकांनीं वाचलेले ग्रंथ, परिभाषेची अडचण, या सगळ्याचा विचार केला तर, हा ग्रंथ इंग्रजींत लिहिणेंच टिळकांना अधिक सोपें गेलें असतें. टिळकांचें संस्कृतभाषेवरील प्रभुत्वहि दांडगें होतें. मंडाले येथें असून त्यांनीं जसा फ्रेंच व जर्मन भाषांचा अभ्यास केला तसाच शाकटायनाच्या पद्धतीची संस्कृतभाषा लिहिण्याचा सराव करून, 'टिळकभाष्य' म्हणून संस्कृत ग्रंथ लिहिणें त्यांना साधरे नसतें, असें नाहीं पण, जनतेसाठीं ग्रंथ लिहावयाचा आहे, तो जनतेच्या भाषेंतच लिहिला पाहिजे, अशा जाणिवेनें त्यांनीं हा ग्रंथ मराठींत लिहिला. गीतेसारखा रसाळ व स्फूर्तिदायक ग्रंथ स्त्रीशूद्रादिकांना उपलब्ध नाहीं या जाणिवेनें तळमळणाऱ्या श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं ज्या कारणासाठीं आपली 'ज्ञानेश्वरी' टीका मराठींतच लिहिली त्याच कारणासाठीं टिळकांनींहि आपला हा 'ग्रंथराज' मराठींत लिहिला. ग्रंथ इंग्रजींत लिहून त्याचें मराठी भाषांतर करून घेणेंहि टिळकांना साधण्यासारखें होतें, पण, आपल्या बांधवांना मार्गदर्शन व्हावें म्हणून ग्रंथ लिहावयाचा तर, त्या ग्रंथाची भाषा स्वतःच्या चित्ताहून स्फुरलेलीच असली पाहिजे, अशा हेतूनें टिळकांनीं ग्रंथ मराठींत लिहिला कृत्रिम दांत बसविले तर त्या दांतांनींहि चर्वण करतां येतें, पण, त्यांच्या चर्वणाचा आनंद आपल्या दातांचा उपयोग केल्यामुळेंच वाटतो हें व्यावहारिक सत्य भाषाव्यवहारा-लाहि लागू पडणारें आहे!

गीतारहस्य ग्रंथामुळें मराठी भाषा समृद्ध झाली, तत्त्वज्ञानावर परभाषेंत निर्माण झालेल्या ग्रंथांतला प्रत्येक घेऊन त्याचें भाषांतर करून जो विचार मराठींत एका झटक्यांत येऊं शकला नसता तो टिळकांच्या या एका ग्रंथानें मराठींत अल्पकाळांत अवतरला. तत्त्वज्ञानाची परिभाषा निर्माण करण्यासाठीं एक

डझन समित्या नेमल्या गेल्या असत्या आणि त्यांनी एक तप डोकेफोड केली असती तरी जी परिभाषा सिद्ध होऊ शकली नसती, ती टिळकांच्या या अचाट उद्योगामुळें सहज निर्माण झाली. गीताग्रंथ प्राचीन व श्रेष्ठ खरा, पण, त्याच्या अध्ययनाला चालना देण्यासाठीं कोणी तरी सिद्ध पुरुषच पुढें यावयाला पाहिजे होता ! टिळकांच्या रूपानें हा सिद्ध पुरुष समाजाला लाभला व त्यामुळें गीताग्रंथाच्या अध्ययनाची गोडी समाजात वाढली. अशा अनेक दृष्टींनी विचार केला तर, गीतारहस्याच्या प्रकाशनापासून पुढील दहा वर्षांचा महाराष्ट्रवाङ्मयाचा जो काळ आहे त्याला 'गीतारहस्य युग' असें नाव देण्याला कोणतीच हरकत नाहीं 'महाराष्ट्रगीत' या आपल्या सुप्रसिद्ध कवनात कविवर्य गडकरी यांनीं महाराष्ट्राच्या अभिमानविषयाचें रसाळपणानें वर्णन केलें आहे. ज्ञानेश्वरीच्या बरोबर गीतारहस्याचा उल्लेख करताना त्यांनीं

देवी ज्ञानेश्वरी करि जियें भक्तीचा खेळ।
तिथेंच गीतारहस्य वसवी बुद्धीचा मेळ।

या ओळी यथार्थपणें लिहिल्या आहेत गीतेवर भाष्यें लिहिणाऱ्या शंकराचार्यादि आचार्यांना आपण जो मान देतों तोच मान टिळकानाहि देणें अवश्य आहे. लोक टिळकाना 'लोकमान्य' या संज्ञेनें गौरवीत असत हें खरें असलें तरी, 'गीतारहस्य' ग्रंथाचे निर्माते म्हणून त्याना कोणी 'आचार्य' म्हटलें असतें तर त्याना तो शब्द अधिक सार्थक व स्वीकारार्ह वाटला असता, असें समजण्याला हरकत नाहीं.

# पर्व चौदावें : 'लक्‌नाऊ' अर्थात् राष्ट्राचा भाग्योदय

संकटांना न जुमानतां शक्तिसर्वस्व खर्चून कार्य करणें याचेंच नांव टिळक-तत्त्व.

—गंगाधरराव देशपांडे

राष्ट्रीय पक्षाची परिषद पुण्यास झाली त्याच्या पूर्वीच होमरूल लीगसारखी एकादी संस्था काढण्याची कल्पना टिळकांच्या मनांत घोळत होती. परिषदेचें पुढील अधिवेशन कोठें भरावें हा प्रश्न पुण्याच निघाला तेव्हांच टिळकांनीं बेळगांवचे श्री. बेळवी यांना 'पुढील परिषदेच्या वेळीं स्वराज्यसंघ स्थापावयाचा आहे' असा इशारा देऊन ठेविला. १९१५ च्या सप्टेंबरमध्यें मिसेस बेझंट यांनीं त्यांच्या मनांत घोळत असलेल्या होमरूल लीगच्या कल्पनेची घोषणा केली. त्यामुळें टिळकांच्या अनुयायांतहि या विषयाची चर्चा जोरजोरानें होऊं लागली. या विषयाची चर्चा सगळीकडे झाल्यावेरीज स्वराज्याच्या कल्पनेला निश्चयात्मक स्वरूप येणार नाहीं हें ओळखून, टिळकांनीं स्वतःच केसरींत लेख लिहून या चर्चेला चालना दिली. नोव्हेंबर महिन्याच्या शेवटीं एक व डिसेंबरांत तीन असे एकूण चार लेख टिळकांनीं 'हिंदी स्वराज्यसंघ' या विषयावर लिहिले.

होमरूल लीगची चळवळ नि स्वराज्याच्या स्वरूपाविषयींची चर्चा हे दोन्ही उपक्रम करण्यांत टिळकांचे अनेक हेतु होते. आपण मागत असलेलें स्वराज्य साम्राज्यांतर्गत स्वराज्य आहे नि तें सनदशीर मार्गानींच मिळविण्याचा आपला निर्धार आहे हें वारंवार जाहीर करून, त्यांना आपला पक्ष त्याप्रमाणें संघटित करावयाचा होता त्याप्रमाणेंच या मार्गानें त्यांना देशांतल्या सर्व पक्षांमध्यें जास्तींत जास्त ऐक्यहि निर्माण करावयाचें होतें. महायुद्धकालीन परिस्थितीच्या तापल्या तव्यावर हिंदुस्थानच्या राजकीय अधिकारांची पोळी भाजून घेण्याला हें ऐक्य अवश्य आहे, असें त्यांना वाटत होतें. मागणीचें स्वरूप मर्यादित व निश्चित केल्याशिवाय आणि देशांतील राष्ट्रीय वृत्तीच्या लोकांचें जास्तींत जास्त ऐक्य निर्माण केल्याशिवाय, महायुद्धकालीन संधीचा हिंदुस्थानला फायदा

घेतां येणार नाहीं, हें त्यांनीं ओळखलें होतें. बिझांटबाईंची 'होमरूल' लीगची घोषणा, राष्ट्रीय पक्षाला कॉंग्रेसमध्यें येऊं देण्याबद्दल नेमस्तांमध्यें दिसत असलेली वाढती उत्सुकता नि मुस्लीम लीगमधील कित्येक प्रमुखांचें इष्ट मत-परिवर्तन हे सर्व प्रवाह अनुकूल आहेत हें ओळखून, टिळकांनीं एका बाजूला होमरूल लीगची स्थापना करण्याचा उद्योग सुरु केला आणि दुसऱ्या बाजूला कॉंग्रेसच्या घटनेंत योग्य ती दुरुस्ती व्हावी, असा आग्रह धरिला.

राष्ट्रीय पक्षाला कॉंग्रेसमध्यें येऊं देण्याला ज्या प्रमुख मंडळींचा आग्रहाचा विरोध होता त्यांत सर फेरोजशहा मेथा हे अग्रगण्य होते. १९१५ च्या डिसेंबर महिन्याच्या शेवटीं कॉंग्रेस मुंबईसच व्हावयाची होती. या कॉंग्रेसच्या अधिवेशनापूर्वी सुमारें दीड महिना फेरोजशहा मेथा मरण पावले. टिळक व फेरोजशहा मेथा यांचीं राजकीय मतें पुष्कळच भिन्न होतीं. महाराष्ट्राच्या भूमींत टिळकांच्या मनोभूमीची मशागत झालेली असल्यामुळें, त्यांच्या वृत्तींत जो परकी राज्याविषयींचा तिटकारा होता तो व्यापारी परंपरेंत वाढलेल्या पारशी समाजांतल्या मेथासाहेबांना रुचण्यासारखा नव्हता. देशसेवेसाठीं अहर्निश झटणारे टिळक आणि देशसेवा हें फावल्या वेळेचें, मोठेपणाचें काम असें समजणारे मेथा यांचें राजकीय ध्येय अगर धोरण यांच्या बाबतींत सहमत होणें शक्य नव्हतें. असें असलें तरी, मेथा व टिळक यांच्यामध्यें एक गोष्ट सारखी होती, दोघेहि 'पुरुषसिंह' होते. दि. १६-११-१५च्या केसरींत टिळकांनीं फेरोजशहा मेथा यांच्या मृत्यूसंबंधीं लेख लिहिला आहे; त्यात मेथांना उद्देशून **'मुंबईचा पुरुषसिंह'** हे सार्थ शब्द वापरलेले आहेत. मागच्या पिढींतील मुंबईच्या पुढाऱ्यात मंडलीक यांच्या अंगीं जे लोकोत्तर गुण होते तेच मेथा यांच्या अंगीं असल्याचें कबूल करून, टिळकांनीं मेथांचा गुणगौरव केला आहे.

मुंबईची कॉंग्रेस सर सच्चिदानंद सिंह यांच्या अध्यक्षतेखालीं सुरू झाली त्या सुमारासच टिळकांनीं आपल्या पक्षाची अनेक मंडळी पुण्यास बोलाविली. या गोष्टीचा दुहेरी उपयोग झाला. राष्ट्रीय पक्षांतहि जी कित्येक उभयान्वयी मंडळी होती ती कॉंग्रेसला न गेल्यामुळें, कॉंग्रेस अगदींच रोडकी झाली. आपली मंडळी जमवून टिळक निश्चित स्वरूपाच्या उद्योगाला लागले हें सिद्ध झाल्यामुळें, घटनेंत दुरुस्ती करून राष्ट्रीय पक्षाला कॉंग्रेसमध्यें घेण्याची आवश्यकता मुंबईस जमलेल्या मंडळींना तीव्रतेनें पटली. पुण्याला जमलेल्या

मंडळींशीं टिळकांनीं वाटाघाटी केल्या आणि पंधरा लोकांची एक समिति नेमून, 'हिंदी स्वराज्यसंघ' स्थापन करण्याच्या कल्पनेला प्रत्यक्ष चालना दिली. मुंबईची काँग्रेस इतर अनेक दृष्टींनीं निरर्थक ठरली तरी, तिनें एक चांगली गोष्ट केली. स्वराज्यासाठीं सनदशीर चळवळ करणाऱ्या, पण काँग्रेससभेला न जोडलेल्या, अशा, निदान दोन वर्षें पूर्वीं अस्तित्वांत असलेल्या संस्थांना आपले पंधरा प्रतिनिधि काँग्रेसला पाठवितां येतील, अशी सवलत राष्ट्रीय पक्षाला देण्याचें काँग्रेसनें ठरविलें. बळीनें तीन पावलें भूमि देण्याचें उदक सोडल्याबरोबर, स्वतःच्या सामर्थ्याचा प्रत्यय असणाऱ्या वामनाला जें समाधान वाटलें तेंच समाधान ही सवलत मिळाल्याबरोबर टिळकांना वाटलें. वामनानें तीन पावलांचा विस्तार करून त्रिभुवन व्यापलें आणि हातावर उदक सोडणाऱ्या बळीला पाताळांत दडपिलें; त्याप्रमाणेंच आपल्यालाहि वागतां येईल हें टिळकांनी ओळखिलें व 'मिळालेल्या सवलतीचा फायदा घेऊन काँग्रेसमध्यें शिरण्याची तयारी करा' असा उपदेश आपल्या अनुयायांना करण्याचा त्यांनीं धडाका सुरू केला. मुंबईची काँग्रेस संपल्यावर 'लीडर' पत्राचे विद्वान् संपादक श्री. चिंतामणी व इतर कांहीं मंडळी पुण्यास आली होती. टिळकांची व त्यांची मनमुराद चर्चा झाली. चिंतामणीप्रभृतींचीं पुण्यांत व्याख्यानेंहि झालीं. सर्व पक्षांतील लोक प्रायः एकाच राजकीय विचाराच्या चिंतनांत गर्क झालेले आहेत, ही गोष्ट या वेळीं टिळकांच्या लक्षांत आली.

चिरोलवर अब्रुनुकसानीची फिर्याद करण्याचें मनांत ठरवून टिळकांनीं त्या दिशेनें जी खटपट सुरू केली होती ती १९१५ च्या शेवटीं मार्गाला लागली होती. १-१०-१५ रोजीं टिळकांचे लंडनमधील सॉलिसिटर डौनर जॉन्सन यांनीं चिरोलप्रभृतींना फिर्यादीची नोटीस दिली. ही नोटीस मिळाल्याबरोबर 'लंडन टाइम्स'च्या संपादकाच्या पोटांत भीति उठली. या संपादकाच्या वतीनें एक सॉलिसिटर टिळकांच्या सॉलिसिटरला भेटले. चिरोलच्या पुस्तकांत दुरुस्तीवजा एक छापील चिठ्ठी घालण्याची आमची तयारी आहे, जरूर तर कांहीं किरकोळ चुकांची दुरुस्ती करण्यासहि आम्ही तयार आहों; पण, माफी मागण्याला अगर दंड म्हणून पर्यायें रकम देण्याला आम्हीं तयार नाहीं, असें या महाशयांनीं कळविलें. ही वाटाघाट सुरू झाली यातच पुष्कळ अर्थ

होता. चिरोलची माज् कधी नसती तर, 'लंडन टाइम्स'तर्फे हें बोलणें सुरू झालेंच नसतें. माज् कधी असूनहि येशी मिरविणाऱ्या चिरोलला अगर 'लंडन टाइम्स'ला मोकळें सोडण्याची टिळकांची इच्छा नव्हती. म्हणून दि. १४-११-१५ रोजीं चिरोलप्रभृतींवरील टिळकांची फिर्याद रीतसर दाखल करण्यांत आली.

धोरण म्हणून टिळकांनीं या सुमारास ज्या गोष्टी केल्या त्यांत गव्हर्नर-जनरल हार्डिज यांचें अभिनंदन करण्यासाठीं त्यांनीं पुण्यास बोलाविलेल्या सभेला बरेंच प्राधान्य द्यावें लागेल. लॉर्ड हार्डिज यांना देशांतील क्रांतिकारक चळवळीचा किंचितसा ताप अनुभवावा लागलेला होता. असें असूनहि, त्यांनीं आपली कारकीर्द एकंदरींत चांगल्या रीतीनें घालविली. याबद्दल त्यांचें अभिनंदन करण्यासाठीं टिळकांनीं दि. २९-३-१६ रोजीं किर्लोस्कर नाट्यगृहांत मुद्दाम सभा भरविली. या सभेंत बोलतांना टिळकांनीं हार्डिजची रिपनशीं तुलना केली व हार्डिजचा कर्झनशीं असलेला विरोध त्यांनीं स्पष्ट करून दाखविला. 'लॉर्ड कर्झन यांनीं ज्या आकांक्षा अशक्य कोटींतल्या ठरविल्या होत्या त्याच हार्डिज यांनीं न्याय्य व योग्य असल्याचें कबूल केलें. इंग्रजी राज्यपद्धतीचा वरवंटा पूर्वीप्रमाणेंच हिंदुस्थानावर फिरत न ठेवतां, हिंदी जनतेच्या अंगचे गुण प्रगट होण्याला सवड मिळेल अशा धोरणानें राज्यकारभारांत सुधारणा केल्या पाहिजेत, ही गोष्ट त्यांनीं मान्य केली,' असें सांगून टिळकांनीं या मावळत्या गव्हर्नरजनरलचा गौरव केला.

राष्ट्रीय पक्षाची परिषद एप्रिल महिन्याच्या शेवटीं बेळगांव येथें भरावयाची असें पूर्वीच निश्चित ठरलें होतें. परिषदेची तयारी फेब्रुवारीपासूनच सुरू झालेली होती. स्थानिक मंडळींपैकीं कांहीं जैनलिंगायतप्रभृतींचा परिषदेला विरोध होता. पण, तो शेवटीं निष्प्रभ ठरला. दि. २९ एप्रिल रोजीं श्री. दादासाहेब खापर्डे यांच्या अध्यक्षतेखालीं या परिषदेचें काम सुरू झालें. अशा परिषदांतून भाषणें करतांना टिळक या सुमारास किती जबाबदारीनें वागत असत हें लो. ना. अणे यांनीं पुढील *शब्दांत वर्णिलें आहे : त्यांनीं या परिषदेंतील भाषण मुद्दाम इंग्रजींतून दिलें. याचा हेतुदेखील विपर्यासाला जागा राहूं नये, असाच

---

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. १५-१६.

**टाइम्सकार' म्हणाला कीं, 'सभेच्या ठरावानें टिळकांनें काँग्रेस काबीज केली.** माझे डोळे उघडले. बळवंतरावांकडे जाऊन मी आपल्या योबार्डीत मारून घेतली आणि प्रांजलपणें चूक कबूल करून क्षमा मागितली.

गांधीजी व टिळक यांची या प्रसंगाच्या वर्षसव्वावर्षे आधीं सिंहगडावर भेट झाली होती. 'चोराच्या उलट्या बोंबा' या टिळकांच्या लेखाचा गांधीजींनीं त्या वेळीं निषेध व्यक्त केला होता. 'हा पक्का मिशनरी आहे'* असा अभिप्राय टिळकांनीं त्या वेळीं व्यक्त केला होता. श्री. गंगाधरराववजी देशपांडे यांच्या आग्रहाच्या निमंत्रणाचा स्वीकार करून गांधीजी या परिषदेला उपस्थित होते व टिळकांनीं सुचविल्यावरून ते प्रतिनिधीहि झाले होते. या परिषदेंतल्या ठरावांना सुटसुटीत स्वरूप देण्याची कामगिरी श्री. न. चिं. केळकर यांनीं केली होती. याबद्दलचें श्रेय कोणी तरी इसम टिळकांना देऊं लागला, तेव्हां टिळक प्रांजलपणानें म्हणाले†: The lion's share goes to Mr. Kelkar. (यांतचें बहुतेक श्रेय केळकरांना दिलें पाहिजे.)

या परिषदेनंतर बेळगांव येथें हिंदी स्वराज्यसंघाची स्थापना करण्यांत आली व स्वतः टिळकांनीं संघातर्फे पहिलें व्याख्यान दिलें. बेळगांवाहून टिळक सातारा येथें गेले व तेथून पुण्यास आले. शिवाजीउत्सवाच्या कार्यक्रमांतून टिळक मोकळे होतात तों बिझांटबाई पुण्यास आल्या व होमरूलच्या व्याख्यानांनीं पुणें गर्जू लागलें. बिझांटबाई पुण्याहून निघाल्या नि त्यांच्या 'न्यू इंडिया' पत्राकडून सरकारनें जामीन मागितला असल्याबद्दलची बातमी प्रसिद्ध झाली. मे महिन्याच्या शेवटीं श्री. केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं नगर जिल्हा परिषद झाली. निमंत्रित म्हणून टिळक या वेळीं नगरास गेले होते. नगर येथें स्वराज्यसंघाची कचेरी उघडून व दोन व्याख्यानें देऊन टिळक परत आले.

१९१६ सालीं जून महिन्याच्या शेवटीं—म्हणजे आगरकरांच्या मृत्यूनंतर तब्बल २१ वर्षांनीं—मुंबईस त्यांच्या स्मरणार्थ जाहीर समारंभ झाला. याप्रसंगीं टिळकांनीं आपल्या या उदारधी स्नेह्याबद्दल काढिलेले कांहीं उद्गार संस्मरणीय

* आठवणी व आख्यायिका : खं. १ : भा. १ : पृ. २६.

† आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ३८७.

आहेत. समाजसुधारणेचे अध्वर्यु या एकाच नात्यानें आगरकरांचें महत्त्व सांगत बसणे हे आगरकरांना कमीपणा आणणारें आहे असें लिहून सांगतांना टिळकांनी पुढील उद्‌गार* काढिले : आगरकर हे पक्के स्वराज्यवादी होते आणि कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांप्रमाणें देशांतील दारिद्य, परावलंबिता, चांगल्या पुरुषांचा तेजोभंग, गोऱ्या अधिकाऱ्यांची चरणी व वरणी, व्यापार-नाश वगैरे राजकीय व औद्योगिक अवनति पाहून त्यांचें चित्त केशवचनादि चार्लींच्या निरीक्षणापेक्षांहि अधिक संतप्त व दुःखित होत असे. आगरकरांना एकतर्फी समाजसुधारक समजणाऱ्या लोकांनीं त्यांचीं इतर मतें मां छपविलीं' या प्रश्नाचें उत्तर देतांना टिळकांनी 'त्यांस सगळा आगरकर नको होता किंबहुना तो त्यांच्या पचनींहि पडला नसता' असे उद्‌गार काढिले. आगरकरांचें चरित्र टिळकांनी लिहावें अशी सूचना करण्यांत आली असतां, या विषयाबद्दल व सामान्यतः चरित्रलेखनाबद्दल बोलतांना टिळक म्हणाले†: घरोलरच आगरकरांचें चरित्र मीच उत्तम लिहूं शकेन, इतरांस माझ्यासारखें लिहितां येणार नाहीं. कारण मला त्यांचें अंतरंग, त्यांचे उत्कट गुण जितके माहीत होते इतके इतरांस असणें शक्य नाहीं... चरित्रें कोणाचीं लिहावींत? चरित्रें राष्ट्राला स्वातंत्र्य देणाऱ्यांचीं लिहावीं... हिंदुस्थानला जे स्वातंत्र्य देतील त्यांचीं चरित्रें हींच खरीं चरित्रें।

पुढें महिन्यांत टिळकांच्या वयाला साठ वर्षे पुरीं होऊन ते ६१ व्या वर्षात पदार्पण करीत आहेत ही गोष्ट पुण्यांतल्या टिळकभक्तांच्या लक्षांत होती. पण, पावसाळ्यांत येणाऱ्या पावसाच्या सरींप्रमाणें कार्यक्रम एकामागून एक असे चालूच असल्यामुळे या मंगलप्रसंगीं टिळकांचा गौरव कसा करावा याची योजना आखण्याचें काम राहून गेलें होतें. ही योजना आखण्याला मंडळी जमली त्या वेळेपासून समारंभाचा दिवस पुरता तीन आठवडेहि दूर नव्हता. कारण, हिंदुकालगणनापद्धतीप्रमाणें टिळकांचा वाढदिवस केला तरी त्या वर्षी दि. २०।७ ही तारीख येत होती व इंग्रजी पद्धतीप्रमाणें दि. २३।७ ा टिळकांचा जन्मदिवस होताच। - मात्र करावें असा प्रश्न निघाला तेव्हां

* लो. टिळकांचे केसरींतील लेख: भाग ४ : पृ ५३४.

† आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. १८२.

कोणी महारुद्र करावा असें सुचविलें, कोणी सत्यनारायणपूजेचा पुरस्कार केला, कोणी टोलेजंग मेजवानीकडे वळले तर कोणी कोरड्या सभेवर भागवावें, असेंहि म्हटलें. भव्य कल्पना मनांत उसळत असली तरी प्रथम तिच्या शक्याशक्यतेचा विचार करण्याबद्दल प्रसिद्ध असलेले श्री. तात्यासाहेब केळकर हें सारें ऐकत होते. टिळकांचें मन सध्यां कोणत्या मयन्या घेत आहे याचें ज्ञान त्यांना इतरांहून अधिक होतें. या मयन्यांचें पोषणहि व्हावें आणि महाराष्ट्राच्या मनांत वसत असलेला टिळकांच्याविषयींचा गाढ आदरहि घसघशीतपणें, रोकडा प्रदर्शित व्हावा यासाठीं त्यांनीं असें सुचविलें कीं, या महामंगलप्रसंगीं एक लक्ष रुपये गोळा करून टिळकांना थैली अर्पण करावी. 'शुभस्य शीघ्रम्' या न्यायानें त्यांनीं आपला सहस्र रुपयांचा आंकडाहि जाहीर केला; त्यामुळें बसल्या बैठकींत इतरहि कांहीं आकडे निश्चित झाले. ही कल्पना सफल होईल अशी जवळजवळ खात्री दिसूं लागल्याशिवाय काय होणार आहे याची वर्तमानपत्रीं प्रसिद्धि करावयाची नाहीं असें ठरल्यामुळें, गांवांत हिंडून नि परगांवीं माणसें धाडून निधि गोळा करण्याचें काम नेटानें चालू होतें तरी, १८।७ पर्यंत ही गोष्ट वृत्तपत्रांत प्रसिद्ध झाली नाहीं. वऱ्हाडांतील प्रसिद्ध लोकसेवक तपस्वी बाबासाहेब परांजपे यांनीं या वेळीं निधीला जी रकम दिली ती असें सिद्ध करणारी होती कीं, टिळक म्हणजेच बाबासाहेबांचें सर्वस्व आहे!

दि. २३ ला गायकवाडवाड्यांत महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांच्या अध्यक्षतेखालीं सभा होऊन टिळकांना मानपत्र व थैली अर्पण करण्यांत येणार आहे असें केसरींत जाहीर झाल्याबरोबर पैशाचा पाऊस पडूं लागला नि समारंभाला उपस्थित राहूं इच्छिणाऱ्या लोकांची वाड्याकडे रीघ लागली. पराक्रमानें आपलें छत्रपतित्व प्रस्थापित केल्यावर श्रीशिवछत्रपतींनीं रायगडावर राज्याभिषेक करून घेतला. तेव्हां नजराणे घेऊन ठिकठिकाणचे मांडलिक जसे गडावर गोळा झाले तसेच टिळकांचे मांडलिकहि वाड्यांत गोळा झाले. समारंभाच्या दिवशीं गायकवाडवाड्यांत धार्मिक विधि, भिक्षादान वगैरे गोष्टी झाल्याच. पण, समारंभाच्यापूर्वीं टिळकांनीं जी एक गोष्ट केली ती मोठी सूचक होती. ते मुद्दाम महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांच्या दर्शनाला गेले. महर्षींना नमस्कार केल्यावर टिळक गहिंवरून म्हणाले : आज मला नमस्कार

करण्यास आपल्याशिवाय कोण आहे* ! निवृत्तिमार्गी अण्णासाहेबांच्या मार्गे प्रवृत्तिमार्गी टिळक इतके कां असतात हें टिळकांच्या निकटवर्ती मंडळीपैकींहि पुष्कळांना समजत नसे. पूर्ववयांत क्रांतिमार्गाकडे वळलेले अण्णासाहेब, वृत्तींत सात्त्विक भावांचें प्राबल्य असल्यामुळें अरविंद यांच्याप्रमाणें योगी झाले असले तरी, त्यांच्या बुद्धीची झेंप मोठी आहे नि देशबांधवांच्या उन्नतीविषयींची त्यांची कळकळ जिवंत आहे, हें टिळक जाणून होते.

या दिवशीं सायंकाळीं बाड्यांत जो समारंभ झाला त्याला हजारों लोक आले होते. मानपत्रवाचन, थैली देण्याचें काम वगैरे आटोपल्यावर टिळकांनीं गहिंवरून जें भाषण केलें तें फक्त टिळकांनींच करावें ! लक्ष रुपयांच्या रकमेस उद्देशून ते म्हणाले, 'ती माझी नाहीं असें मी समजतों आणि मी आपणांस असें आश्वासन देतों कीं, वरील रकमेंत माझ्या स्वतःचें कांहीं तरी तुळशीपत्र घालून तिचा विनियोग करण्याचें आपण माझ्याकडे सोंपविलेलें काम माझ्याकडून होईल तितक्या कसोशीनें व वर निर्दिष्ट केलेल्या प्रकारच्या 'कामाकडेच करीन.' जमलेल्या मंडळींना राष्ट्रकार्याचें महत्त्व समजावून सांगतांना टिळक म्हणाले, "माझ्यासारख्या माणसानें केलेल्या यत्किंचित् कामगिरीनें आपण तृप्त होऊं नका. आज आपणा सर्वांपुढें जें राष्ट्रकार्य आहे तें इतकें मोठें, इतकें व्यापक नि इतकें जरूरीचें आहे कीं, त्याला आपण सर्वांनीं माझ्यापेक्षां किती तरी पट अधिक निश्चयानें आणि स्फूर्तीनें लागलें पाहिजे... आपली मातृभूमि आपणा सर्वांस या उद्योगास लागण्याबद्दल आव्हान करीत आहे... मातृभूमीच्या या आव्हानाकडे लक्ष देऊन, कोणताहि भेदभाव मनांत न ठेवतां, आपण सर्व 'राष्ट्रदेव' होऊं या."

छत्रपतींच्या रायगडावरील राज्यारोहणप्रसंगीं इंग्रजांचे वकील उपस्थित होते. वरील प्रसंगाची पूर्तता याहि दृष्टीनें झाली. टिळकांचीं बेळगांव व अहमदनगर येथें झालेलीं होमरूलवरील व्याख्यानें राजद्रोहात्मक आहेत असें मानणाऱ्या पुण्याच्या डि. मॅजिस्ट्रेटनें टिळकांवर नोटिस काढली. 'एक वर्षपर्यंत चांगली वर्तणूक ठेवून शांतता राखण्याची हमी म्हणून २० हजारांचा जात मुचलका आणि दहादहा हजारांचे दोन जामीन तुमच्याकडून कां घेऊं नयेत

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ११२.

याविषयींची कारणें समक्ष येऊन कळवा' अशा आशयाची नोटीस घेऊन समारंभाच्या दिवशीं सकाळीं गायडरसाहेब वाड्यांत आला. माझे वडील उद्यां आपल्यावर नोटीस बजावण्यासाठीं येणार आहेत, असें टिळकांना कळविण्यासाठीं गायडरच्या मुलीनें लिहिलेलें पोस्टकार्ड टिळकांना आगाऊच मिळालें असल्यामुळे,* टिळक गायडरचें स्वागत करायला सिद्धच होते!

नोटिशींतून निघालेल्या खटल्याचें काम पुण्यास ऑगस्ट ७ पासून १२ पर्यंत चाललें. या वेळीं टिळकांच्यातर्फे जिनांनीं काम केलें. या ठिकाणीं जामिनाची रक्कम कमी होण्यापलीकडे दुसरें कांहीं निष्पन्न झालें नाहीं. या निकालाविरुद्ध दि. २३ ऑगस्ट रोजीं हायकोर्टाकडे अपील करण्यांत आलें. बॅ. जिना यांनींच दि. ८ नोव्हेंबर रोजीं हायकोर्टातल्या या अपिलाचें काम टिळकांतर्फे चालविलें. न्यायमूर्ति बॅचलर व शहा यांनीं टिळकांना निर्दोषी ठरविण्याचीं कारणें भिन्नभिन्न दिलीं; पण, सामान्य जनतेला कारणाच्या या खोल पाण्यांत शिरण्याची इच्छा नव्हती. टिळक निर्दोषी ठरले याचा अर्थ होमरूलची चळवळ कायदेशीर ठरली इतकेंच लोकांनीं ओळखलें. या निकालानंतर स्वराज्यसंघाच्या सभासदांची संख्या झपाट्यानें वाढत गेली.

गव्हर्नरजनरल या नात्यानें लॉर्ड चेम्सफर्ड याची कारकीर्द नि होमरूलच्या चळवळीची प्रभावी सुरवात या गोष्टी समांतर चालू झाल्यामुळें, ठिकठिकाणच्या सरकारी अधिकाऱ्यांच्या डोळ्यांत सलणारी ही चळवळ दडपून टाकण्याचे प्रयत्न होणार, हें दिसतच होतें. टिळकांवरील जामिनकीची नोटीस हा या प्रयत्नांचा एक प्रकार झाला! त्याच्या मागोमाग बिझांटबाईंच्या मागें शुक्लकाष्ठ लागलें. त्यांच्या 'न्यू इंडिया' पत्राकडून पूर्वी घेण्यांत आलेला जामीन जप्त करण्यांत आला नि 'कॉमनवील' पत्राकडून नवा जामीन मागण्यांत आला. असें असलें तरी, राजकीय अधिकार मागण्याची लोकांची इच्छा दबून मात्र गेली नाहीं. उलट, इंग्रज माणसाला परिचित व पटणारें असें रूप धारण करून ही इच्छा व्यक्त झाली. मध्यवर्ती विधिमंडळांतले सर शंकरन् नायर, विठ्ठलभाई पटेल, जिनाप्रभृति सभासद यापूर्वीपासूनच अधिकारांच्या मागणीचें स्वरूप ठरवीत होते. अशा १९ सभासदांनीं केलेली मागणी ऑक्टोबर महिन्यांत

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. २२०.

गव्हर्नरजनरलच्या मार्फत विलायतेस रवाना झाली. २१ ऑक्टोबर रोजी मुंबई प्रांतिक परिषदेचें अधिवेशन जिना यांच्या अध्यक्षतेखालीं अहमदाबाद शहरीं झालें. त्याला टिळक उपस्थित होते. यापूर्वीपासूनच महाराष्ट्रांत व इतर प्रांतांत होमरूलच्या मागणीला जोर चढला होता. बॅ. बॅप्टिस्टा यांनीं तर स्वराज्यघटनेचा एक मसुदा तयार करून तो प्रसिद्धहि केला होता. नोव्हेंबर महिन्यांत कॉंग्रेसकमिटीनें आपला सुधारणांचा मसुदा तयार केला आणि मुस्लिम लीगनेंहि आपल्या मागण्या प्रसिद्ध केल्या.

अशा रीतीनें हिंदुस्थानांतलें राजकारणी लोकमत अधिकार मागण्याच्या कामीं एकवट होत असतांनाच तिकडे इंग्लंडमध्ये महत्त्वाच्या घडामोडी होत होत्या. महायुद्धाच्या चढउतारांकडे ब्रिटिश लोक डोळे लावून बसले असल्यामुळें, युद्धकार्य प्रभावी होण्याच्या दृष्टीनें मंत्रिमंडळांत बदल घडणें अपरिहार्य होतें. महायुद्ध सुरू झाल्यानंतर ब्रिटनचे पंतप्रधान ॲस्क्विथ यांनीं एकदां मंत्रिमंडळाची मजबुती केली होती. पण, तेवढ्यानें निभाव लागत नाहीं असें दिसल्यामुळें, ॲस्क्विथसाहेबांनीं शेवटीं दि. ५-१२-१६ रोजीं आपल्या जागेचें त्यागपत्र दिलें. नवे पंतप्रधान लॉइड जॉर्ज यांना भारताची मदत अधिक प्रमाणांत मिळावी म्हणून कांहीं तरी करावें लागेल, असा संभव दिसूं लागला.

नोव्हेंबर महिन्यांत टिळक कांहीं भिन्नराजकारणी कामासाठीं शेठ मनमोहनदास रामजी यांच्याबरोबर मद्रास येथें गेले होते. त्या भागांतील सरकारी अधिकाऱ्यांनीं पोलीस ॲक्टअन्वये नोटीस काढून टिळकांच्या भाषणाला व्यत्यय आणला. या व्यत्ययामुळें टिळक चिडले आणि त्यांच्यावर खटला करण्याची संधि मिळाली तर ती सरकारला हवीच होती. पण, या सरकारी सांपळ्यांत शिरण्याचें शौर्य टिळकांना गाजवावयाचें नव्हतें! मद्रास व्याख्यानेंच न झालीं तरी मदुरा, हुबळी, धारवाड, बेळगांव इत्यादि सर्व ठिकाणीं व्हावयाचें ते सारें कार्य झालें. पुण्यास परत आल्यावर टिळकांच्या दृष्टीसमोर लखनौची कॉंग्रेस दिसूं लागली. राष्ट्रीय राजकारणाची प्रचंड नाव प्रगतीच्या मार्गानें चालावयाची तर, तिच्या खालीं चळवळीचें भरपूर जीवन असावयाला पाहिजे, तिचीं शिडें दुरुस्त असावयाला पाहिजेत, आणि तिच्यावरील नावाड्यांत एकोपा नांदत असला पाहिजे. सुरतेस कॉंग्रेस भंगली तेव्हांपासून चळवळीचें जीवनहि आटलें होतें, शिडांचा कपडाहि फाटूनतुटून

गेला होता आणि नावाड्यांची तोंडेंहि दहा दिशांकडे वळली होतीं! १९१४ सालीं टिळक सुटून आले त्यानंतरच्या अडीच वर्षांच्या अवधींत त्यांनीं चळवळीचें जीवन खेळतें राहील अशी व्यवस्था केली, नव्या संस्था काढून व जुन्यांत जागृति करून त्यांनीं फाटूनतुटून गेलेलीं शिडें पल्लेदार केलीं आणि सर्व नावाड्यांना त्यांनीं एकसंघ बनविलें. **'हिम्मत मर्दा, तो मदत खुदा'** हाहि न्याय या वेळीं खरा ठरला. त्यामुळें, प्रगतीच्या मार्गाकडे वळूं पहाणाऱ्या हिंदी राजकारणाच्या नावेला ब्रिटिश मंत्रिमंडळांत झालेल्या खांदेपालटीचा पाठचा वाराहि मिळेल, असा संभव दिसूं लागला.

मुंबईच्या काँग्रेस कमिटीतर्फे काँग्रेसचे प्रतिनिधि म्हणून टिळक या वर्षी निवडले गेले. पुण्यातल्या, पुण्याबाहेरच्या, महाराष्ट्रांतल्या, कर्नाटकांतल्या आणि वऱ्हाड-नागपूरकडल्या स्वपक्षीयांना प्रतिनिधि म्हणून निवडून येण्याची त्यांनीं सूचना दिली. या सुमारास टिळक हे भारताचे अनभिषिक्त राजे म्हणून मान्य झाले होते. महाराष्ट्राबाहेरच्या कित्येक प्रांतांतले लोक तर त्यांच्या नांवामागें 'भगवान्' किंवा 'महात्मा' ही उपाधि लावूं लागले होते. लखनौच्या काँग्रेसचे ते कर्णधार नव्हते हें खरें; पण, गलबतावरील सराईत कर्णधार स्वतः सुकाणू हातांत वागविण्यापेक्षां; बरोबरीच्या माणसांपैकीं कोणाच्या तरी हातीं तें खेळत ठेवून, त्याला वेळींच योग्य सूचना देत असतो तद्वतच या वेळीं टिळकांची स्थिति होती. आपल्या बरोबरीच्या मंडळींना गोळा करून टिळक मुंबईहून खास गाडीनें लखनौला जावयाला निघाले तेव्हां त्यांच्या प्रयाणाचा थाट पाहून एखाद्याला असें वाटलें असतें कीं पूर्वीच्या काळचा एखादा राजा अगर सध्यांच्या काळचा एखाद्या स्वतंत्र राष्ट्राचा अध्यक्षच कांहीं तरी बड्या कामगिरीवर निघाला आहे.

टिळक व त्यांच्याबरोबरची मंडळी यांना लखनौस नेण्यासाठीं सिद्ध झालेली 'स्पेशल ट्रेन' २३-१२-१६ रोजीं रात्रीं मुंबईहून निघाली. कल्याण, चाळीसगांव, भुसावळ अशा अनेक ठिकाणीं टिळकांच्या सत्कारासाठीं स्टेशनवर लोक उपस्थित होते. मोठ्या नदीच्या प्रवाहाला वाटेंत लहानलहान नद्या येऊन मिळतात त्याप्रमाणें मनमाड, भुसावळ वगैरे स्टेशनांवर त्या त्या भागांतील टिळकप्रेमी लोक येऊन मिळत होते. दि. २४ रोजीं दुपारीं गाडी हरदा स्टेशनवर थांबली. येथें जेवणाचा कार्यक्रम ठरला होता. व स्थानिक

मंडळींनीं हा कार्यक्रम अत्यंत थाटानें व्हावा, अशी व्यवस्था केली होती. या ठिकाणीं टिळकांच्या सत्कारासारखाहि पसंतीचा कार्यक्रम झाला. गाडी भोपाळ स्टेशनवर पोंचली त्या वेळीं रात्र झाली होती. तरीहि, मुसलमानहद्दींतल्या या स्टेशनवर टिळकांचा उत्तम सत्कार झाला. बीना, ललितपूर, झांशी इत्यादि स्टेशनांवर झालेले सत्कार स्वीकारीत, टिळक दि. २५ ला सकाळीं कानपूर येथें पोंचले. तेथील सत्काराचा स्वीकार करून, ते दुपारीं लखनौस पोंचले.

गाडीला बराच उशीर झाला होता तरी टिळकांच्या स्वागतासाठीं स्टेशनवर फार मोठा लोकसमूह उपस्थित होता. टिळकांच्या मिरवणुकीची व्यवस्था सिद्ध ठेवण्यात आली होती. यासाठीं विशेष लक्षपूर्वक शृंगारलेली एक मोटार तयार ठेवण्यांत आली होती. लखनौच्या प्रमुखांनीं टिळकांना मोटारींत नेऊन बसविलें; पण, मंडळींनीं मोटारीला गराडा घातल्यामुळें, मोटारीची गति कुंठित झाली. टिळकांची मिरवणूक अशा रीतीनें निघावी हें उत्साही लोकांना संमत नव्हतें! अशा मागणीकरी एका प्रसंगावधानी माणसानें मोटारीच्या टायरी-वर चाकूचा प्रयोग केला! घोड्यांच्या गाडींतून टिळकांना न्यावें असें योजून व्यवस्थापकांनीं तसें करण्याचा प्रयत्न केला. पण, येथेंहि साहसी आणि प्रसंगावधानी मंडळींपुढें नाइलाज झाला! गाडीचे पोल ओढून त्यांनीं घोड्यांना जबाबदारींतून मुक्त केलें! अशा रीतीनें टिळकांची गाडी स्वतः ओढीत नेण्याची आपली हौस लोकांनीं भागवून घेतली.

स्टेशनवरून निघालेली ही मिरवणूक चारबाग, अमिनाबाद, वगैरे भागां-तून पुढें चालली. मिरवणूक अर्धा रस्ता संपवून पुढें निघणार तों पंडित मालवीयजी टिळकांना सामोरे आले. पंडितजींना टिळकांच्या शेजारीं स्थान देण्यांत आल्यावर, मिरवणूक पुढें चालली. डेरिलालच्या धर्मशाळेंत टिळक व त्यांच्यांबरोबरची पाहुणेमंडळी यांची उतरण्याची सोय केलेली होती. मिरवणूक या ठिकाणीं विसर्जन पावली त्या वेळीं दुपारीं २ वाजण्याचा समय होता. गाडींतून उतरल्यावर धर्मशाळेच्या गच्चीवर उभें राहून टिळकांना लोकांना दर्शन द्यावें लागलें. लोकांचे आभार मानतांना टिळकांनीं 'लखनौ' या शब्दावर कोटी केली. 'तुमच्या या भाग्यवान् शहरीं उभा होणारा शेरा पडूं लागेल' असें त्यांनीं सांगितलें.

सुरतेस मोडलेली कॉंग्रेस लखनौस जोडली होती. लखनौ येथील केसर-

मार्गेत ती जोडली गेली. स्वागताध्यक्ष श्री. जगत्‌नारायण यांच्या भाषणानंतर बाबू अंबिकाचरण मुजुमदार यांची अध्यक्ष म्हणून रीतसर निवड झाली. त्यांनी आपल्या भाषणांत टिळक फिरून कॅांग्रेसमध्यें आले या गोष्टीचा मोठ्या अभिमानानें उल्लेख केला. अध्यक्षीय भाषणानंतर कॅांग्रेसचें अधिवेशन त्या दिवशी स्थगित झालें. यानंतर टिळकांना ऑल इंडिया कॅांग्रेसकमिटीच्या सभेला जावयाचें होतें. टिळक उच्चासनावरून खालीं उतरूं लागले तेव्हां त्यांच्या-भोंवतीं दर्शनोत्सुक लोकांचा वेढाच पडला. आपल्या जोड्याला हात लावून त्याची धूळ लोकांनीं मस्तकाला लावावी हें टिळकांना आवडलें नाहीं. 'मला जाऊं द्या' अशी विनंति त्यांनीं केली. पंडित मालवीयजींनीं लोकांना हिंदीमध्यें विनंति केली तेव्हां टिळकांना हळूहळू वाट मिळूं लागली. पण, लोकांची गर्दी खऱ्या अर्थानें दुभंगली त्याचें कारण वेगळेंच होतें. त्या गर्दींत एक दाढीवाला म्हातारा होता. "महात्मांको काम है, महात्माकु जाने दो" असें ओरडून सांगण्याला त्यानें सुरवात केली आणि तोंडच्या शब्दाला त्यानें हातांतल्या काठीचा ठेका दिला, तेव्हां लोक उमजले.*

कॅांग्रेसनें तयार केलेली सुधारणांची योजना व मुस्लिम लीगनें केलेली योजना यांचा विषयनियामक समितीनें एकत्र विचार केला. हा विचारविनिमय चालू असतांना ठिणग्या कशा पडल्या, या प्रसंगीं टिळकांनीं लखनौ-करार म्हणून जो करार केला तो करण्यांत त्यांचा हेतु काय होता, वगैरे गोष्टींचें चित्र† पुढील शब्दांत रेखाटलेलें आढळतें : "विषयनियामक समितीच्या चर्चेत भाग घेणाऱ्या टिळकांना पहाणें हें अत्यंत मनोरंजक व बोधप्रद होतें. आवेशांत आलेले वक्ते भोंवतालीं उसळत होते. टिळक एखाद्या खडकाप्रमाणें स्थिर होते... पंडित मदनमोहन फार गरम झाले होते. लखनौकरार स्वीकारण्याला त्यांचें मन तयार होईना. कांहीं उत्साही हिंदु पंडितजींच्या फांवल्यावेळीं त्यांना भेटले होते. कॅांग्रेस मुसलमानांना शरण जाईल तर मी जरूर वाटलें तर आणि योग्य ठरलें तर कॅांग्रेसविरुद्ध प्रचंड निदर्शन करीन, असें आश्वासन पंडितजींनीं या मंडळींना दिलें होतें. महाराष्ट्राचे पुढारी टिळक हे इतर कोणाहिपेक्षां अधिक धर्मनिष्ठ होते, अधिक

* आठवणी व आख्यायिका : खं. ३ : पृ. २२१.

† आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ५६४.

वेदपारंगत होते आणि अधिक सनातनीहि होते. तरी कराराविरुद्ध मांडण्यांत आलेला कोणताहि मुद्दा ऐकण्याला ते तयार नव्हते. या करारावर ते मोठे भाळले होते, असा अर्थ नाहीं. करारामुळें मुसलमानांचें समाधान होऊन ते कॉंग्रेसमध्यें येत असतील तर, आणि त्यामुळें मुसलमानांच्या देशभक्तीचा भारतबाह्य देशांकडील ओढा नाहींसा होऊन ते भारतनिष्ठ होत असतील तर, हा करार करण्यासारखा आहे, असें त्यांचें म्हणणें होतें."

लखनौ-कॉंग्रेसला सर जेम्स मेस्टन येणार आहेत आणि ते आपल्या-बरोबर सर व्हॅलटाईन चिरोल यानाहि आणणार आहेत अशी अफवा कॉंग्रेस चालू असताना उठली होती. चिरोल आला तर अधिक्षेपसूचक आवाज काढून त्यांची फजिती करावयाची असा काहीं मंडळींचा विचार चालू होता. ही गोष्ट टिळकांना कळल्याबरोबर त्यांनीं पेन्सिलीनें एक सर्क्युलर लिहिलें. मुंबईकडच्या एकाहि प्रतिनिधीनें असें वर्तन करू नये अशी विनंति* टिळकांनी केली होती. शेवटीं चिरोल आला नाहीं, ही गोष्ट निराळी! लखनौ-कॉंग्रेसच्या वेळीं गांधीजी हजर होते प्रतिनिधि निवडण्याच्या कामीं त्यांनीं कांहीं मध्यस्थी केली होती. मध्यस्थीनें ज्या याद्या झाल्या त्यांतून गांधींचें नांव गळलें होतें. शेवटीं टिळकांच्या सांगीवरून, महाराष्ट्रीय प्रतिनिधींच्या खटपटीमुळें गांधीजींची प्रतिनिधि म्हणून निवड झाली.* लखनौ-करार किंवा 'कॉंग्रेस-लीग स्कीम' या नावानें पुढें प्रसिद्धि पावलेला या अधिवेशनांतील ठराव कॉंग्रेसच्या शेवटच्या दिवशीं बाबू सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांनीं सभेपुढें मांडला. कॉंग्रेसच्या अधिवेशना-नंतर लखनौ येथें 'स्वराज्यसंघ परिषद' भरली. लखनौ येथें कॉंग्रेसबरोबरच जसें मुस्लिम लीगचें अधिवेशन झालें त्याप्रमाणेंच तेथें हिंदुसभापरिषदहि झाली. टिळकांनीं करार करून मुसलमानांना फाजील सवलती दिल्या म्हणून ही परिषद टिळकांवर रुष्ट झाली होती.

या वेळीं दूरदूरच्याहि लोक टिळकांबद्दल किती आदर दाखवीत असत हें दाखविणारी पुढील आख्यायिका † लक्षांत ठेवण्यासारखी आहे : "घरच्या

---

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ११२.
† आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. २२२.

घरपण्यांतील एक मुसलमान गृहस्थ लोकमान्यांचे दर्शन घ्यावयास आले व खोलीच्या दाराशीं उभे राहून आपल्या पायांतील बुटाचे बंद सोडण्यास त्यांनी आपल्या बरोबरच्या शिपायास सांगितलें...स्वयंसेवक त्यांस म्हणाला, "बूट काढून ठेवण्याची जरूर नाहीं. आपण त्यांनिशीं आंत जावयास हरकत नाहीं. तेव्हां त्या गृहस्थानें दातांत जीभ घातली-व...म्हटलें, "नहि महाराज! ये तो बहोत सेक्रेड जगा है! यहां पर जूता कैसा लेजावे!"

---

## पर्व पंधरावें : : : होमरूलचा उच्चैर्घोष

सुकर्णधारानें कुशलतेनें चालविलेली ही नौका दुभंगली नाहीं, बुडली नाहीं किंवा धारेला लागून भलतीकडे वाहत गेली नाहीं. एवढेंच नव्हे तर स्वराज्यरूपी बंदर आतां तिच्या दृष्टिपथांत आलें असून लवकरच ही नौका त्या बंदरांतील धक्क्याला सुरक्षितपणें जाऊन लागेल.

—टिळक

टिळक लखनौस गेले ते कानपूरवरून गेले; पण, ते कानपुरांत गेले नव्हते. कांग्रेसचें काम संपतांच त्यांना कानपूरला जावें लागलें. १९१७ च्या इंग्रजी पाडव्याला ते लखनौहून निघून कानपूरला पोंचले. खापर्डे, दादासाहेब करंदीकर, बेळवी इत्यादि मंडळी टिळकांसमवेत होती. संध्याकाळीं झालेल्या सभेंत टिळकांना संस्कृत भाषेंत लिहिलेलें मानपत्र देण्यांत आलें. या सभेंत बोलतांना टिळकांनीं काढिलेले पुढील उद्गार* लक्षांत ठेवण्याजोगे आहेत :

हिंदुसमाजाला शास्त्रांतील चातुर्वर्ण्य मान्य आहे. पण, तें आनुवंशिक नाहीं. गुण व कर्म यांच्या योगानेंच ते सिद्ध होतात.

* केळकरकृत टिळक-चरित्र: उत्तरार्ध खं. ३ : भा. ३ : पृ. ६.

**पण, इंग्रजी राज्यामुळें चातुर्वर्ण्यहि नष्ट झालें. कारण देशांत क्षत्रिय-कर्मच शिल्लक उरलें नाहीं...ब्राह्मणांनीं सुद्धां बुद्धीचा अभिमान टाकला पाहिजे.**

सुरतेनंतरच्या आठनऊ वर्षांत टिळक व मोतीलाल घोष या जिवलग मित्रांची भेट झाली नव्हती. वार्धक्यामुळें मोतीबाबू लखनौला येऊं शकले नव्हते; म्हणून त्यांना भेटण्यासाठीं टिळक कानपूरहून कलकत्त्यास गेले. तिकडून ते नागपुरास गेले. नागपूर, यवतमाळ, कारंजा, अकोला, मूर्तिजापूर अशा अनेक ठिकाणीं जाऊन, ठिकठिकाणचे सत्कार स्वीकारून नि आपल्या अनुयायांना कार्यप्रवृत्त करून टिळक जानेवारीच्या मध्याच्या सुमारास पुण्यास परत आले. लखनौची कांग्रेस यशस्वी होऊन होमरूलची एकमुखी मागणी तयार झाली नि तिकडे इंग्लंडचे पंतप्रधान राजकारणी औदार्याच्या धोरणाची भाषा बोलूं लागले; त्यामुळें, हिंदुस्थानांतल्या नोकरशाहीचें मन अस्वस्थ होऊं लागलें. होमरूलची मागणी मागें पडावी म्हणून दडपशाहीच्या धोरणाचा आश्रय करण्याचे मनसुबे चालू झाले. मध्यप्रांत सरकारनें बिझांटबाईंनीं आपल्या हद्दींत येतां कामा नये असें फर्मान काढलें. बाईंचे एक सहकारी वाडिया यांच्यावर मद्रास सरकारनें भाषणबंदीचा हुकूम बजावला.

जानेवारी महिन्याच्या अखेरीस पुण्यास स्वराज्यसंघाची सभा झाली. या प्रसंगीं पुण्यांस आलेल्या मंडळींपैकीं श्री. मा. श्री. अणे यांचें दि. २१-१-१७ रोजीं टिळकांच्या अध्यक्षतेखालीं जाहीर व्याख्यान झालें. त्या वेळीं नेमके कोणते प्रश्न राजकीय महत्त्व पावले होते हें समजण्याच्या दृष्टीनें व पौराणिक दृष्टान्त फुलवून विषय सजविण्याची अणे यांची हातोटी लक्षांत येण्याच्या दृष्टीनें, या व्याख्यानांतला पुढील उतारा* लक्षांत ठेवण्यासारखा आहे :

साम्राज्याच्या गर्भाशयांत समाविष्ट झालेल्या वसाहती बाहेर पडून खेळूं-बागडूं लागल्या आहेत. आपणहि तसेंच करावें असें हिंदुस्थानला वाटूं लागलें आहे...क्षात्रदीक्षा घेऊन आरंभिलेल्या युद्धाचा यज्ञ संपवून इंग्लंड दानाला सिद्ध होईल तेव्हां हिंदुस्थानच्या बटु वामनानें त्रिपादभूमि मागण्याकरितां उपस्थित झालें पाहिजे. त्या दानप्रसंगीं शुक्राचार्य आडवे आले, तेव्हां त्यांची

* केळकरकृत टिळकचरित्र : उत्तरार्ध, खं. ३ : भा. १ ; पृ. ६.

जी गत झाली तशीच मेस्टन-मॉरिस-कार्टिस व इतर लोक आमच्या आड येत आहेत त्यांचीहि होईल. बळीनें वामनाला त्रिपादभूमि देतांना पाताळांतील आपल्या राज्याचें रक्षण करण्याचें अभिवचन त्याजकडून घेतलें. त्याप्रमाणें आम्हांलाहि स्वराज्य मिळेल तर, आम्हीहि साम्राज्याचें रक्षण करण्यास तयार आहों, अशी जामिनकी आमच्यापुरती देऊं.

दि. २-२-१७ रोजीं महर्षि अण्णासाहेब पटवर्धन परलोकवासी झाले. त्यांच्या योग्यतेप्रमाणें नि लोकप्रियतेप्रमाणें पुढील सर्व गोष्टी करण्याच्या कामांत टिळकांना लक्ष घालावें लागलें. स्मशानयात्रा, जाहीर सभा, जाहीर सभेंतील ठराव पोंचता करण्याच्या निमित्तानें अण्णासाहेबांच्या चिरंजीवांना उपदेश वगैरे सर्व गोष्टींत टिळकांनीं पुढाकार घेतला. अण्णासाहेबांच्याबद्दल टिळकांना इतका आदर कां वाटे हें त्यांनीं अण्णासाहेबांच्या योग्यतेविषयीं जे उद्गार काढिले त्यांवरून स्पष्ट होतें. "अण्णासाहेबांच्याविषयीं टिळक असें म्हणत कीं, हा या काळचा पुरुष नव्हेच! जुना ऐतिहासिक काळच त्यांना योग्य होता. हिंदुस्थान हें इंग्लंड असतें तर माधवराव रानडे हे ग्लॅडस्टन होऊं शकते हें जितकें खरें आहे तितकीच ही दुसरी गोष्ट खरी आहे कीं, पुणें जुन्या काळचें पॅरिस असतें तर अण्णासाहेब पटवर्धन हे कार्डिनल रिचेल्यो झाले असते किंवा पुणें जर जुनें विजयनगर असतें तर अण्णासाहेब विद्यारण्य किंवा माधवाचार्य झाले असते.*"

भारतसंरक्षक सैन्याची उभारणी करण्याचें सरकारी धोरण ठरून त्याविषयींचा कायदा होण्याचा संभव दिसूं लागल्याबरोबर, दूरदर्शी भारतीय नेत्यांनीं या संधीचा फायदा घेण्याचें ठरविलें. दि. १७-२-१७ रोजीं पुण्यास किर्लोस्कर थिएटरमध्यें सैन्यभरतीचा पुरस्कार करण्यासाठीं रँ. परांजपे यांच्या अध्यक्षतेखालीं जाहीर सभा झाली. या सभेंत टिळक-शिवरामपंत परांजपे-प्रभृति वक्त्यांचीं भाषणें झालीं. या विषयाचा सर्व महाराष्ट्रभर सांगोपांग विचार व्हावा म्हणून टिळकांनीं दि. २७-२-१७ च्या केसरींत 'ही वेळ आहे, लष्करात शिरा' या मथळ्याचा लेख लिहिला. सुशिक्षितांनीं सैन्यांत शिरण्याविरुद्ध आज जे आक्षेप घेतले जातात तेच-किंवा त्याहून अधिक-आक्षेप घेतले

---

* केळकरकृत टिळकचरित्र : उत्तरार्ध, खं. ३ : भा. १ : पृ. ७.

जावें अशी त्या वेळची परिस्थिति होती. तरीहि, तरुणांनीं लष्करांत शिरावें असा उपदेश टिळकांनीं केला. युद्धसाधनांचें स्वरूप पालटल्यामुळें इंग्लंडपुढील प्रश्नाचें स्वरूपच कसें बदललें आहे हें स्पष्ट करतांना टिळकांनी या लेखांत पुढील विचार मांडले आहेत :

एवढ्या दूरवरच्या वसाहतींचें किंवा जिंकलेल्या देशांचें सर्व परशत्रूंपासून संरक्षण करण्यास साम्राज्याच्या केंद्रस्थानी असलेलें इंग्रज राष्ट्र आजपर्यंत आपल्या समुद्रावरील अप्रतिहत वर्चस्वामुळें समर्थ झालेलें होतें. पण, हें समुद्रावरील–म्हणजे समुद्राच्या पृष्ठभागावरील–वर्चस्व पृष्ठभागाखालीं भुयारांतून संचार करणाऱ्या पाणबुड्यांनीं व बंदरांतून घातलेल्या पाणसुरंगांनीं पोखरण्याचा प्रयत्न सुरू झाला आहे; आणि खुष्कीवरील युद्धांत बंदुका, आकाशविमानें आणि दूर पल्ल्याच्या प्रचंड तोफा यांनीं क्रांति करून सोडली आहे.

जमिनीवर लढणारें सैन्य मोठें नसलें तरी नडणार नाहीं ही समजूत इंग्लंडला कां पालटावी लागली याचें स्पष्टीकरण पुढील अवतरणांत केलेलें आहे :

हिंदी लोकांचें काळें सैन्य फक्त हिंदुस्थानच्या रक्षणाकरितांच पाहिजे,... अशी जी समजूत होती ती नाहींशी झाली. केवळ समुद्रावरच वर्चस्व ठेवून काम भागत नाहीं. जर्मनीचा प्रतिकार करण्यास फ्रेंच शिपायांबरोबर इंग्रजांच्या तर्फेहि अनेक लाख लोक रणभूमीवर तयार पाहिजेत, अशी वेळ येऊन ठेपली आहे.

सरहद्दीवरच्या मुसलमानांवर विश्वास ठेवण्याचें धोरण सरकारला कां सोडावें लागत आहे याचें स्पष्टीकरण पुढील वाक्यांत केलेलें आहे :

हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील रानटी मुसलमान शिपायांवर भरंवसा ठेवतां येत नाहीं. कारण, जर्मनींतील कारस्थान, तुर्कस्थान, इराणमार्फत काबुलापर्यंत येऊन पोंचलें आहे.

सर्व परिस्थिति मनासारखी नसली तरी सुशिक्षित तरुणांनी अडून बसतां कामा नये, 'ज्याला स्वराज्य पाहिजे त्यानें स्वदेशाचें रक्षणहि केलें पाहिजे' असें बजावतांना टिळकांनीं तरुणांना पुढील आश्वासन दिलें आहे :

ज्या कालाच्या ओघानें हिंदुस्थान सरकारच्या लष्करी धोरणांत फरक घडवून आणला तोच काळ आमच्या लष्करी आकांक्षा परिपूर्ण कर-ण्यास पुढेंहि समर्थ आहे, हें विसरतां कामा नये.

सुशिक्षित तरुणांनीं लष्करांत जाणें किती महत्त्वाचें आहे हें आळवून-आळवून सांगितल्यावर टिळक शेवटीं लिहितातः यांतच राजभक्ति आहे, देशभक्ति आहे, साम्राज्यनिष्ठा आहे आणि राजकारणहि आहे.

टिळकप्रभृति लोकांनीं सैन्यभरतीचा प्रचार सुरू केला त्याप्रमाणेंच अन्य प्रांतांतल्याहि अनेक पुढाऱ्यांनीं हा विषय हातीं घेतला. टिळकांनीं मार्च महिन्याच्या प्रारंभीं मुंबईस या विषयावर एक व्याख्यान दिलें व याच महिन्यांत श्री. खाडिलकर हे या विषयाच्या प्रचारासाठीं बेळगांवला गेले. ही मंडळी हा प्रचार करीत आहेत त्यांत देशभक्ति आहे नि राजकारण आहे, 'हें सरकारनेंहि ओळखलें. खाडिलकरांना बेळगांवास बोलण्याला प्रतिबंध झाला. पंजाबकडे जाण्याचा टिळकांचा विचारहि नव्हता. पण, लष्करभरतींतली ही देशभक्ति नि राजकारण या मार्गानें पंजाबांत शिरल्या तर, मलतेंच कांहीं तरी होईल अशी भीति सरकारला वाटूं लागली! 'मन चिंती तें वैरी न चिंती' अशी सरकारी अधिकाऱ्यांची अवस्था झाली. टिळकांनीं दिल्ली-पंजाब प्रांतांत प्रवेश करतां कामा नये, असें सरकारी फर्मान सुटलें.

प्रेस-ॲक्टमुळें वर्तमानपत्रांची फार कुचंबणा होते, सबब तो रद्द व्हावा, इंग्लंडांत वृत्तपत्रांना जें स्वातंत्र्य आहे तेंच स्वातंत्र्य हिंदुस्थानांतल्या वृत्तपत्रांना असणें राजकीय प्रगतीच्या दृष्टीनें अवश्य आहे वगैरे मुद्दे मांडण्यासाठीं एक शिष्टमंडळ गव्हर्नरजनरल चेम्सफर्डसाहेबांकडे गेलें असतांना, त्याला निराश होऊन परतावें लागलें. या विषयाचा परामर्ष घेतांना टिळकांनीं दि. १३-३-१७ च्या केसरींत व्यक्त केलेले कांहीं विचार चिरस्मरणीय आहेत. वृत्तपत्रांचें कर्तव्य कोणतें याचें करणरूपी आणि अकरणरूपी वर्णन टिळकांनीं पुढील वाक्यांतून केलेलें आढळतें : (१) वर्तमानपत्रांचा खरा उपयोग अनियंत्रित राजसत्तेस आळा घालण्याकडे होत असतो (२) गुळगुळीत कागदावर रंगीबेरंगी बुळबुळीत मजकूर छापून लोकांचें रंजन करणें हें कांहीं वर्तमानपत्रकर्त्यांचें मुख्य कर्तव्य नव्हे.

एप्रिल महिन्याच्या आरंभीं कलकत्ता येथें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची

सभा झाली तिला टिळक गेले होते. गांधीजीहि या सभेला उपस्थित होते. चंपारण्यांतल्या मजुरांच्या दुःस्थितीचा प्रश्न या सुमारास तीव्र रूप धारण करीत होता. कलकत्त्याचें काम आटोपल्याबरोबर गांधीजी चंपारण्याकडे वळले आणि टिळक पुण्यास न थांबतां कर्नाटकाकडे वळले. दि. १२-४-१७ रोजीं चिकोडी येथें बेळगाव जिल्हासभा श्री. दादासाहेब करंदीकर यांच्या अध्यक्षतेखालीं व्हावयाची होती. तेथें जाऊन व आसपासच्या कांहीं ठिकाणांना भेट देऊन जागृति करणें हा टिळकांचा या वेळीं कर्नाटकांत जाण्यांतला हेतु होता. चिकोडी येथील सभेच्या शेवटीं भाषण करतांना लोकांनी 'प्रवृत्तिपर व्हावयाला पाहिजे असें सांगण्यासाठीं टिळक म्हणाले*: प्रवृत्ति हाच खरा मनुष्यधर्म होय. आपल्या समाजांत नुसतीच निवृत्ति असती तर महाराष्ट्र निर्माण झालें नसतें. ज्यांना कांहीं करतां येत नाहीं व केलें तर लोकें आपटण्याची भीति ज्यांना वाटते तेच निवृत्तीचा मार्ग स्वीकारतात. चिकोडी येथेंच दि. १३-४ ला मराठा शिक्षणपरिषद भरली. प्राचीन काळचे साधुसंत व आधुनिक काळचे शिक्षक यांच्या कार्यांतलें साम्य स्पष्ट केल्यावर टिळक या वेळीं म्हणाले: "शिक्षणाची सक्ती पाहिजे असेल तर आपण सरकारवर सक्ती करण्याची ताकद अंगीं आणिली पाहिजे." दौऱ्यांत बरोबर असलेल्या अण्णासाहेब परांजपे यांच्या व्याख्यानाच्या वेळीं अध्यक्ष म्हणून समारोप करतांना टिळकांनी विलायतेला 'डेप्युटेशन' पाठविण्याच्या स्वतःच्या कल्पनेचें समर्थन पुढीलप्रमाणें केलें†:

पूर्वी मीहि डेप्युटेशन पाठविण्याच्या विरुद्ध होतों; पण, आज पाठविण्याला तयार झालों; तो तरी कां! भीक मागण्याकरितां नव्हे; तर, विलायतेंत युद्धामुळें लोक खडबडून जागे झाले आहेत; आमचें 'डेप्युटेशन' जाऊन सांगणार कीं, हिंदुस्थानला स्वराज्य देण्यांत तुमचा फायदा आहे. हिंदुस्थानला परतंत्र ठेवण्यांत ब्रिटिश सरकारचा किती तोटा झाला, हें सांगण्याला आमचें 'डेप्युटेशन' जाणार.

टिळक निपाणीस गेले असतां तेथेंहि त्यांना भाषण करावें लागलें.

* केळकरकृत टिळक-चरित्र : उत्तरार्ध : खं. ३ : भा. ३ : पृ. ११.

† केळकरकृत टिळकचरित्र उत्तरार्ध : खं. ३ : भा. २ : पृ. १२.

निपाणीचें ऐतिहासिक वैभव, त्या ठिकाणची विद्यमान स्थिति वगैरे गोष्टींचा उपयोग टिळकांनीं सद्यःपरिस्थिति चित्रित करतांना कसा मार्मिकपणानें केला हें पुढील अवतरणावरून* स्पष्ट होईल :

निपाणीकर देसाई होते तेव्हां या मुलखांतून पेशव्यांच्या लष्करभरती-करतां दहा हजार सैन्य वेळेस बाहेर पडत असे. आपले घोडे व आपल्या दरम्या घेऊन लोक सैन्याला जाऊन मिळत; पण, आज तीच गोष्ट उलटी झाली आहे. आपणांला 'रंगरूट' म्हणून धरून नेतील या भीतीनें लष्करी अधिकारी दिसला कीं, लोक पळून जातात! **सरकारनें आम्हांला इतकें परतंत्र करून ठेविलें आहे कीं, निपाणीला उत्तम तंबाखू पिकत असतां विरूट इजिप्त देशांतून यावा लागतो.**

कर्नाटकांतील या संचारानंतर टिळकांना मे महिन्यांत नाशिकला जावें लागलें. ना. शास्त्री यांच्या अध्यक्षतेखालीं प्रांतिक परिषदेचें अधिवेशन नाशिक येथें १७–१८ मे या दोन दिवशीं झालें. या अधिवेशनाच्या बरोबरच या ठिकाणीं स्वराज्यसंघाचा पहिला वाढदिवसहि साजरा झाला. १९०९ सालीं नाशिक येथें 'जॅक्सन' प्रकरण झालें; त्यानंतर नाशिक शहरांत सरकारी जुलूम-जबरदस्तीचे बरेच प्रकार झाले! त्यामुळें मध्यंतरींच्या काळांत नाशिक शहरांतलें राजकीय जीवन प्रायः आटूनच गेलें होतें. या निमित्तानें टिळक नाशिकला येतांच या कुंठित झालेल्या प्रवाहाला फिरून गति मिळाली. नाशिक येथील प्रांतिक परिषदेच्या विषय-नियामक-समितींत राजबंदि-विमोचनाच्या—विशेषतः सावरकरबंधूंच्या मुक्ततेच्या–प्रश्नाची चर्चा चालली असतां, परिषदेला आलेली बडी नेमस्त मंडळी व त्या वेळचे केसरीचे एक सहसंपादक श्री. वि. म. भट यांची बरीच खडाजंगी झाली. भट यांनीं या बड्या मंडळीला निकराचा विरोध केला हें पाहून संतुष्ट झालेले टिळक स्वतःच या विषयावर बोलावयास उठले. "मी स्वतः एक राजकीय कैदी होतों हें तरी पारख-समर्थ मानावयास तयार आहेत काय?" असा रोखठोक प्रश्न टिळकांनीं विचारला.† या परिषदेंत

* केळकरकृत टिळक-चरित्र : उत्तरार्ध, खं. ३ : भा. ३ : पृ. १४.

† आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. २२१.

राजबंदिविमोचनाविषयींचा प्रस्ताव शेवटीं संमत झाला. याचें बरेंचसें श्रेय स्वतः टिळकांकडे होतें.

इकडे टिळक होमरूलच्या प्रश्नावर लोकमत केंद्रित करीत होते व टिकाऊ राष्ट्र-कल्याणाचा एक भाग म्हणून सुशिक्षित तरुणांना सैन्यात जाण्याचा आग्रह करीत होते त्याच वेळीं सरकारी अधिकारी वेगळ्याच दिशेनें विचार करीत होते. ब्रिटिश पंतप्रधान मि. लॉईड जॉर्ज यांच्या तोंडीं स्वयंनिर्णयाची भाषा खेळू लागल्यामुळें हिंदुस्थानचीहि राजकीय दृष्ट्या कांहीं प्रगति होणार अशी भीति सरकारी गोटांत उत्पन्न झाली. आपली इच्छा दुबळी ठरली आणि हिंदुस्थानच्या पदरांत अखेरीस कांहीं सुधारणा पडल्याच तर, प्रगतिमार्गावर पाऊल टाकणाऱ्या हिंदुस्थानच्या पायांत थोडा तरी अडकलेला असावा, या हेतूनें नोकरशाहीनें होमरूलच्या चळवळीच्या विरुद्ध पोसण्याला कांहीं संस्थानिकांना आणि कांहीं ब्राह्मणेतरांना प्रवृत्त करण्याचा उद्योग सुरू केला. हिंदुस्थानांत चाललेली होमरूलची चळवळ घातकेला विघातक आहे असें भासविलें तर, ब्रिटिश मुत्सद्दी सुधारणांच्याबद्दल मनांतील अढी तर्क करून, नोकरशाहीनें त्या दिशेनेंहि खटपट सुरू केली. हिंदुस्थानातले लोकाग्रणी ब्रिटिश जनतेच्या दृष्टीनें गर्ह्य ठरावे यासाठीं नोकरशाहीनें असें जाहीर केलें कीं, हिंदी नेत्यांच्या उपद्व्यापामुळें सैन्यभरतीची प्रगति व्हावी तशी होत नाहीं! मद्रासचे त्या वेळचे गव्हर्नर लॉर्ड पेंटलंड यांनीं या वर्षी मे महिन्याच्या अखेरीस भाषण केलें, त्यांत त्यांनीं संकल्पित दडपशाहीची सूचना स्पष्ट शब्दांत देऊन टाकली.

चंपारण्यांतील मजुरांची गाऱ्हाणी समाधानकारक रीतीनें मिटली नाहींत तर गांधीजी त्या भागांत 'सत्याग्रह' सुरू करतील कीं काय, याविषयींची चर्चा सर्वत्र चालली होती त्या सुमारासच मद्रास सरकारनें दडपशाहीच्या धोरणाला सुरुवात केली. दि. १६ जूनला बिझांटबाई, त्यांचे सहकारी मि. अरंडेल व मि. वाडिया या सर्वांवर भारतरक्षण कायद्यान्वयें हुकूम बजावण्यांत आले व त्यांना अटक करण्यांत आली. १९०८ सालीं दडपशाही सुरू झाली त्या वेळीं ज्याप्रमाणें 'विद्यार्थ्यांनीं सभांना जाऊं नये' असें फर्मान निघालें होतें, त्याप्रमाणें याहि वेळीं फर्मान निघालें, पण मद्रास सरकारनें सुरू केलेला उपक्रम अविचाराचा आहे असें बजावण्याला जागृत झालेलें लोकमत या वेळीं चुकलें नाहीं. बेझंटबाईंच्या अटकेचा निषेध करण्यासाठीं टिळकांनीं दि १९ व

२६ जूनच्या अंकात दोन लेख लिहिले. हिंदुस्थानच्या मागणीचें निश्चित स्वरूप सर्वांच्या डोळ्यांपुढें असावें, त्या स्वरूपाचा विपर्यास करण्याची संधि नोकरशाहीला मिळूं नये म्हणून टिळकांनीं या दोन लेखांपैकीं पहिल्या लेखांत पुढील खुलासा केला :

कॉंग्रेसची व त्याचबरोबर स्वराज्यसंघाचीहि मागणी तीन स्वरूपांची आहे—(१) हिंदुस्थानला स्वराज्य मिळावें हाच इंग्रजी राज्यपद्धतीचा अंतिम हेतु आहे, असा बादशाही जाहीरनामा लवकरच प्रसिद्ध व्हावा. (२) पुढें प्राप्त होणाऱ्या स्वराज्याची पहिली 'व्यक्त' पायरी म्हणून या ठरावांत नमूद केल्याप्रमाणें आता हक्क मिळावेत. आणि (३) युद्धानंतर साम्राज्याची पुनर्घटना होते वेळीं हिंदुस्थानचा दर्जा साम्राज्याच्या इतर स्वतंत्र भागांच्या बरोबरीनें असावा.

नोकरशाहीनें हिंदुस्थानांतील होमरूलची मागणी दडपून टाकण्यासाठीं चालविलेला अट्टाहास हास्यास्पद आहे हें टिळकांनीं याच लेखांत पुढीलप्रमाणें सुचविलें आहे : एकीकडे या साम्राज्यात आयर्लंडला स्वराज्य देण्याचे विचार चालू असून, बंड करून कैदेंत गेलेल्या सर्व आयरिश लोकांना मुक्त करण्यात येत आहे आणि प्रस्तुतचें महायुद्ध सर्व राष्ट्रांना स्वराज्याचे हक्क प्राप्त होण्याकरितां उपस्थित झालें आहे अशी दोस्तराष्ट्रांत सामील झालेल्या अमेरिकेचे प्रेसिडेंट जाहीर घोषणा करीत आहेत; पण, ... येथील इंग्रजी अधिकारी हिंदुस्थानाला स्वराज्य प्राप्त करून देण्याकरता......झटणाऱ्या एका विद्वान् बाईच्या आणि गृहस्थाच्या तोंडांत बोळा घालण्यास प्रवृत्त झालेले आहेत. दडपशाहीचें पिशाच सरकारी अधिकाऱ्यांवरच कसें उलटलें आहे याचें वर्णन टिळकांनीं दुसऱ्या लेखांत पुढीलप्रमाणें केलें आहे: भारतसंरक्षक सैन्यांत भरती करण्यासाठीं जे लोक खटपट करणार होते त्यांनीं उघडपणें ती बंद करण्याचें ठरविलें, पेंटलंडसाहेबांना परत बोलवा म्हणून विलायतेस तारा झाल्या आणि मि. बमनजी या एकट्या गृहस्थानेंच स्वराज्याची चळवळ नेटानें चालविण्यास लाख रुपये देण्याचें अभिवचन दिलें.

लखनौ-कॉंग्रेसच्या वेळीं प्रतिनिधींना चिरोलचें दर्शन घडतें कीं काय, असा प्रश्न उपस्थित झाला होता. लखनौ-कॉंग्रेसपूर्वी चिरोल हिंदुस्थानांत

आला होता तो टिळकांनी त्याच्यामागें अब्रूनुकसानीच्या फिर्यादीचें स्वांड लाविल्यामुळें आला होता. आपल्या बचावासाठीं अवश्य असणारा पुरावा मिळविण्यासाठीं तो ठिकठिकाणीं हिंडत होता व या कामीं त्याला मुंबई सरकारकडून व कोल्हापूरदरबाराकडून पोटभर मदत मिळत होती. या खटल्यांत ज्या अनेक साक्षी घ्यावयाच्या त्या कमिशनमार्फत हिंदुस्थानांत घेणें श्रेयस्कर होतें. आपल्या तर्फेचे साक्षीदार कोण हें ठरवून, कमिशनचें काम सुरू होण्यापूर्वी सर्व सिद्धता करणें टिळकांना अवश्य होतें. 'अमुक साक्षीदार बोलवावा की नाहीं' अशा बारीक प्रश्नापासून त्यांनीं जवळच्या मंडळींशीं चर्चा केली. मुंबई सरकारशीं टिळकांना या प्रकरणीं पुष्कळसा पत्रव्यवहारही करावा लागला. कमिशनपुढील साक्षीपुराव्याचें हें काम या वर्षीच्या ११ जुलैपासून २९ ऑगस्टपर्यंत चाललें. साक्षीदारांची तपासणी वगैरे करण्याचें काम प्रत्यक्षतः श्री. दादासाहेब करंदीकर हे करीत होते. पण, कोणत्या साक्षीदाराला कोणता प्रश्न विचारावा नि कोणता विचारूं नये इतक्या तपशिलांत शिरून टिळक त्यांच्याशीं चर्चा करीत असत. यामुळें, जुलै आणि ऑगस्ट या दोन महिन्यांत टिळकांना प्रायः याच एका उद्योगानें गुंतवून ठेविलें.

सरकारनें भारतरक्षणकायद्यान्वयें पिशांटपार्टीना डांबून टाकल्या; पण, त्यांनीं दि. २४-६-१७ रोजीं सर सुब्रम्हण्यम् अय्यर यांच्याकडून प्रेसिडेंट विल्सन यांच्या नांवें एक पत्र रवाना केलें. हिंदुस्थानात स्वकारभारी न होण्याचीं सर्व कारणें काय, याचा ऊहापोह या पत्रांत करण्यात आला होता. या पत्राची चर्चा अमेरिकेत जोरजोरानें सुरू झाल्यामुळें, ब्रिटिश मंत्रिमंडळाला हिंदुस्थानांतील मानगर्दीत लक्ष घालावें लागलें. विरोधकरणांतील साक्षीपुराव्याच्या कामांत टिळक गुंतले असतांनाच, दि. २०-८-१७ रोजीं भारतमंत्री मि. मॉंटेग्यु यांनीं हिंदुस्थानविषयक घोषणा केली. टिळकप्रभृति पुढाऱ्यांनीं स्वराज्याची मागणी आणि स्वकारभारतीचा पुरस्कार हा सजोड कार्यक्रम नेटानें राष्ट्रापुढें मांडला, विसंतोषी नोकरशाहीनें त्या कार्यक्रमांत व्यत्यय आणला, महायुद्धांत इंग्लंडला ऐनवेळीं मदत करणाऱ्या अमेरिकेच्या कानावर या व्यत्ययाची वार्ता गेली—या सर्व कारणपरंपरेमुळें भारतमंत्र्यांना तोंड उघडावें लागलें, असें म्हणण्याला हरकत नाहीं.

मि. मॉंटेग्यु यांनीं अधिकृतरीत्या जी घोषणा केली तिनें दोन गोष्टी साधल्या.

जबाबदारीचें स्वराज्य देऊन, हिंदुस्थानला साम्राज्यांतील एक भागीदार बन-विण्याच्या दृष्टीनें ब्रिटिश सरकारचें यापुढील धोरण आंखण्यांत येईल, ही गोष्ट मान्य झाली. या ध्येयाच्या दिशेनें कांहीं तरी महत्त्वाच्या सुधारणा लवकरच अमलांत आणण्यांत येतील, असें अभिवचन मिळालें. या सुधारणांच्या स्वरूपाची वाटाघाट करण्यासाठीं स्वतः भारतमंत्री हिंदुस्थानांत येणार असें जाहीर झाल्यामुळें नोकरशाहीनें चालविलेली दडपशाही आणि लोकांनीं चालविलेली चळवळ या दोहोंच्याहि प्रमाणांत कांहीं पालट होईल, असें स्पष्ट दिसूं लागलें.

सप्टेंबर महिन्यांत सातारा येथें श्री. दादासाहेब करंदीकर यांचा साठावा वाढदिवस साजरा होणार असल्यामुळें, टिळकांनीं तिकडे जाण्याचें ठरविलें. प्रत्यक्ष निघण्याच्या दिवशीं टिळकांच्या अंगांत बराच ताप होता. अशा स्थितींत त्यांनीं निघूं नये, असा आग्रह त्यांना करण्यांत आला; पण, आपला कार्यक्रम जाहीर झालेला असला म्हणजे, स्वतःची सोयगैरसोय न पाहतां हजारों माणसें रात्रीअपरात्रीं आपल्यासाठीं स्टेशनवर येतात, त्यांची निराशा करणें बरोबर नाहीं, असें ठरवून टिळक ठरल्याप्रमाणें साताऱ्यास गेले. या वेळीं साताऱ्यास त्यांची मिरवणूक चालली असतांना, त्यांच्यावर चवऱ्या-मोरचलें ढाळण्यांत आलीं. लोक राजचिन्हें भलत्याच ठिकाणीं वापरतात हें पाहून टिळक नेहमींच उद्विग्न होत असत. 'असें करूं नका' म्हणून मिरवणुकीं-तील मंडळींना ते एकसारखें सांगत होते. लोकांनीं त्यांचें फारसें वेळ ऐकलें नाहीं. राजवाड्यासमोर मिरवणूक आल्यावर मात्र टिळकांना तो प्रकार सहनच होईना! त्यांनीं कठोर वृत्ति धारण करून, लोकांना तो प्रकार बंद करावयास लाविला. श्री. दादासाहेब करंदीकर यांचा वाढदिवस दि. १७-९ रोजीं साजरा झाला. टिळक साताऱ्यास असतांनाच, बिझांटबाईंची मुक्तता झाल्याचें वृत्त प्रसिद्ध झालें. साताऱ्चा कार्यक्रम संपवून टिळक वाईस गेले व पुण्यास परत आल्याबरोबर गुजराथेंत नडोद येथें गेले. दि. ३-१० रोजीं मुंबई येथें श्री. भुलाभाई देसाई यांच्या अध्यक्षतेखालीं जाहीर सभा होऊन स्थानबद्ध असलेल्या अलीबंधूंच्या सुटकेची मागणी करण्यांत आली. या सभेंत टिळकांचें भाषण झालें. दि. ७-१० रोजीं प्रयाग येथें झालेल्या 'ऑल इंडिया काँग्रेस कमिटी'च्या सभेला टिळक व बिझांटबाई हीं दोनहि थोर माणसें हजर होतीं. प्रयागच्या लोकांनीं अत्यंत उत्साहानें दोघांची एकत्र मिरवणूक काढली.

भारतमंत्र्यांच्या घोषणेमुळें व ते हिंदुस्थानकडे निघाल्यामुळें, राजकारणाच्या स्वरूपांत जो बदल झाला त्याचें विवेचन करण्यासाठीं टिळकांनी लिहिलेला लेख दि. ९-१०-१७ च्या केसरींत प्रसिद्ध झाला. या लेखाच्या आरंभीं टिळकांनीं गेल्या अडीच-तीन वर्षांतील चळवळीला कांहीं तरी फळ आल्याविषयींचें समाधान पुढील शब्दांत व्यक्त केलें आहे :

स्वराज्य हेंच आपलें ध्येय ठरवून हिंदी पुढाऱ्यांनीं आपल्या चळवळीचें तारूं त्या ध्येयाकडे हाकारण्यास सुरवात केल्यापासून तुफानी वारा वाहूं लागला, समुद्र खवळला, आणि ही नौका लाटांच्या तडाख्यांत सांपडून कोठें खडकावर आपटते का महासागराच्या उदरांत बेपत्ता होते, अशी सामान्य जनास धास्ती वाटूं लागली; परंतु, सुदैवानें या नौकेवरील कर्णधार धीराचे व दूरदर्शी असल्यानें या सर्व संकटप्रसंगांतून ही नाव बचावून स्वराज्यरूपी बंदराच्या नजीक येऊं लागली आहे.

*हिंदी स्वराज्याच्या नैसर्गिक शत्रूच्या चढाईच्या धोरणाला आतां आळा बसला आहे आणि त्यांनीं आतां बचावाचें धोरण अवलंबिलें आहे अशी प्रस्तावना करून* टिळकांनीं या लेखांत स्वराज्याच्या मागणीला नेणतेपणानें विरोध करणाऱ्या ब्राह्मणेतरांच्या म्हणण्याचा विचार केला आहे. मागासलेल्या वर्गांचें भांडण न्यायाचें असलें तरी तें मांडतांना त्या वर्गानें कोणती दृष्टि ठेवावी हें टिळकांनीं पुढील वाक्यांत सांगितलें आहे :

प्रतिनिधींची वांटणी ही स्वराज्यमागणीच्या मानानें एका अर्थीं गौण बाब असून ब्राह्मणेतर किंवा मागसलेल्या वर्गांनीं आपल्या हक्कांविषयीं भांडणें जरी न्यायाचें आहे तरी, तसें करतांना आपला उद्योग व आपली आवेश यांचा मुख्य भाग स्वराज्यमागणीकडे खर्चावयास पाहिजे, असें आम्हांस वाटतें.

*दि. २०-२१ रोजीं पंढरपूर येथें श्री. न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं सोलापूर जिल्हापरिषद झाली.* टिळक प्रयागाहून परत आले ते तडक पंढरपुरास गेले. या परिषदेहून ते पुण्यास परत येतात तोंच ज्योतिष संमेलनाचें काम वाट पहात होतें. स्वतः टिळक हे या संमेलनाचे अध्यक्ष होते आणि पंढरपुराहून परत आल्यानंतर जो मर्यादित वेळ सांपडला त्यात त्यांनीं आपलें अध्यक्षीय भाषण तयार केलें. या संमेलनांत वाद पुष्कळ माजले. तीन दिवस

एकसारखी चर्चा झाल्यावर टिळकांचें सामदामाचें म्हणणें बहुतेक मंडळींनीं मान्य केलें. हा विषय संपवून टिळकांना तत्काळ गुजरायकडे वळावें लागलें.

नोव्हेंबर महिन्याच्या सुरवातीस गोध्रा येथें गुजराय प्रांतिक परिषदेचें अधिवेशन झालें. गांधींजी हे या परिषदेचे अध्यक्ष होते. टिळक व खापर्डे हे दोघे या परिषदेला उपस्थित होते. ही जोडी गोध्रा स्टेशनवर पोंचली तेव्हां गांधीजी सर्व गांवकऱ्यांसह त्यांना सामोरे गेले. दि. ४ रोजीं परिषदेला सुरवात झाली. टिळकांना गुजराथींत भाषण करणें शक्य नसल्यामुळें त्यांनीं इंग्रजींत बोलण्याची इच्छा व्यक्त केली. परिषदेच्या नियमानुसार टिळकांनीं मराठींतच बोलावें असें गांधींजींनीं सुचविलें.* जवळजवळ दीडतास चाललेलें हें मराठी भाषण गुजराथी श्रोत्यांनीं तन्मयतेनें ऐकलें. खापर्डे यांनीं टिळकांचे स्वराज्य-विषयक विचार उत्तम गुजराथींत सांगून लोकांना थक्क करून सोडलें. दि. ६-११ रोजीं टिळक व खापर्डे सुरतेस पोंचले. चार तास चाललेल्या मिरवणुकींत लोकांनीं टिळकांवर मोतीं व सोन्या-रुप्याचीं फुलें उधळलीं.† सभा इतकी मोठी झाली कीं सहा व्यासपीठांवर जाऊन टिळकांना बोलावें लागलें. या सभेंत अलीबंधूंच्या मुक्ततेविषयींचा ठराव पास करण्यांत आला. या वेळीं टिळक व खापर्डे या दोघांनाहि दहा वर्षांपूर्वींच्या सुरतेचें स्मरण झालें असेल, हें अगदीं स्वाभाविक आहे.

टिळक पुण्यास परत आल्यानंतर लवकरच शनिवारवाड्याजवळ झालेल्या एका सभेंत त्यांचें भाषण झालें. ही सभा नि हें भाषण हीं दोन्ही फार संस्मरणीय‡ आहेत. लखनौस पास झालेल्या स्वराज्याच्या योजनेला पुष्टी देणें हा या सभेचा उद्देश होता. अठरा जातींचे व संप्रदायाचे प्रत्येकीं दोनदोन असे वक्ते मुख्य ठरावावर बोलले. केवळ ब्राह्मणांचे प्रतिनिधि या नात्यानें टिळकांनीं बोलावें असें सभाध्यक्ष कर्मवीर वि. रा. शिंदे यांनीं सुचविलें. ही सूचना मान्य करून टिळकांनीं या सभेंत जें भाषण केलें त्यांतील पुढील विचार महत्त्वाचे आहेत:

**आतां आपल्याला पूर्वीचें स्वराज्य नको असून पाश्चात्य धर्तीवरील**

---

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. २३०.

† आठवणी व आख्यायिका : खं. १ : भा. २ : पृ. १९७.

‡ आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. २०२-२०३.

स्वराज्य पाहिजे आहे. आपल्या जातिभेदामुळेंच येथें ब्रिटिश राज्य स्थापन झालें आहे व जातिभेद असाच पुढें चालू रहाणार असेल तर, स्वराज्यांताहि आमची अशीच अधोगति होईल.

या सुमारास बॅ. बॅप्टिस्टा यांनी विलायतेंत मजूरपक्षाशी संधान बांधून 'हिंदी स्वराज्य' या विषयावर व्याख्यानांची झोड उठविली होती. मॉंटेग्युसाहेब हिंदुस्थानांत येऊन पोंचले होते व दिल्ली येथें बसून वेगवेगळ्या शिष्टमंडळांच्या भेटी घेण्याचें काम त्यांनी सुरू केलें होतें. स्वराज्यसंघातर्फें जाणाऱ्या शिष्टमंडळाची भेट मॉंटेग्युसाहेब दि. २६-११ रोजीं दुपारीं घेतील, असें ठरलें होतें. दि. २१-११ रोजीं सायंकाळीं शिष्टमंडळांतील लोक मुंबईहून निघाले. ठरल्याप्रमाणें मॉंटेग्युसाहेबांनी शिष्टमंडळाची भेट घेतली. दि. २७ रोजीं मॉंटेग्युसाहेब व टिळक यांची स्वतंत्र भेट झाली. 'संकल्पित सुधारणा समाधानकारक वाटल्या नाहींत तर आपण काय कराल' असा प्रश्न या मुलाखतींत मॉंटेग्युसाहेबांनी टिळकांना विचारला. 'मिळालेल्या पदरांत पाडून घेईन आणि उरलेल्यासाठीं लागलीच चळवळ सुरू करीन' असें उत्तर टिळकांनीं तात्काळ दिलें. 'माझ्या प्रश्नाचें अचूक उत्तर इतक्या तत्परतेनें देणारा हा एकच पुरुष मला भेटला' असे उद्गार मॉंटेग्युसाहेबांनी मागाहून काढले, असें म्हणतात.

टिळकप्रभृति मंडळी दिल्ली सोडून निघाल्यावर, टिळकांना वाटेंत आग्रा येथें अनिच्छेनें थांबावें लागलें.* 'टिळक आग्रा स्टेशनवर गाडींतून खालीं उतरले ते सहज उतरले. त्यांच्या दर्शनासाठीं स्टेशनवर गर्दी लोटलीच होती. विद्यार्थी त्यांच्याभोंवतीं गोळा झाले आणि त्यांना राहण्याचा आग्रह करूं लागले. त्यांनी नकार दिला; पण, आग्रा येथील स्वराज्यसंघाच्या उपाध्यक्षांनीं टिळकांना अल्गद उचललें आणि स्टेशनाबाहेर नेलें. काय झालें म्हणून पहावयाला खापर्डे उतरले. इतक्यांत विद्यार्थ्यांनी टिळक व खापर्डे यांचें सामान गाडींतून काढलें. गाडी निघून गेली. सर्व गोष्टी आतां या तरुणमंडळीच्या मर्जीप्रमाणें सुरू झाल्या! संध्याकाळीं जवळजवळ सर्व आग्रा शहरांत टिळकांची मिरवणूक काढण्यांत आली.

डिसेंबरच्या शेवटीं कलकत्ता येथें बॅनी बेझंट यांच्या अध्यक्षतेखालीं राष्ट्रीय

* आठवणी व आख्यायिका : खं. ३ : ( इंग्रजी विभाग ) : पृ. ७१.

सभेचें अधिवेशन झालें. तिकडे जाण्यापूर्वी टिळकांनीं स्वराज्यमागणीच्या चळवळीला एक वेगळें स्वरूप दिलें होतें. स्वराज्यमागणीच्या अर्जावर बारा लक्ष लोकांच्या सह्या मिळविण्याचा उद्योग त्यांनीं स्वराज्यसंघामार्फत सुरू केला होता. टिळक कलकत्त्यास पोंचले नि त्यांची मिरवणूक निघाली ती जवळजवळ दोन अडीच तास चालली! कॉंग्रेसचें काम पूर्वीच सुरू झालें होतें. टिळक तडक तिकडे गेले. सभासदांनीं टिळक पोंचतांच सर्व सभा उभी राहिली! बंगाली पुढारी 'कर्टिस' योजनेवर बरेच भाळले आहेत, असें या वेळीं टिळकांच्या लक्षांत आलें. अनेकांशीं वाद करून टिळकांनीं या योजनेंतील दोष त्यांना पटवून दिले. मॅंटेग्युसाहेबांनीं घोषणा केल्यापासून कित्येक लोक चलचित्त बनले होते आणि लखनौयोजनेंत बदल करावा, असें म्हणूं लागले होते. सुधारणांचा मसुदा प्रत्यक्ष प्रसिद्ध झाल्याशिवाय, विचारपूर्वक ठरविलेली योजना रेसभरहि बदलूं नये, असा आग्रह टिळकांनीं धरला.

टिळक कलकत्त्याहून नागपूरमार्गें पुण्यास परत आले तों जानेवारी महिना निम्मा होत आला होता. पुण्यास परत येतांच टिळकांनीं होमरूल लीगचें शिष्टमंडळ घेऊन इंग्लंडला जाण्याची तयारी चालविली. लीगचें काम दिवसें-दिवस व्यापक होत होतें; त्यामुळें, खर्चाचे अंदाजहि वाढत चालले होते. यासाठीं टिळकांनीं ठिकठिकाणीं दौरे काढावे असें ठरून, वऱ्हाड-मध्यप्रांताला दौऱ्याचा पहिला मान देण्याची कल्पना मान्य झाली. जानेवारी महिन्याच्या शेवटीं लोणावळें येथें पुणें जिल्हा राजकीय परिषद झाली. या परिषदेचे अध्यक्ष बॅ. जयकर हे टिळकांना दुरून बरेंच वर्षे मानीत असत. १९१७ च्या उन्हाळ्यांत नाशिक येथें झालेल्या राजकीय परिषदेबरोबरच तेथें सामाजिक परिषदहि झाली होती. या परिषदेचे अध्यक्ष बॅ. जयकर हे होते. टिळक सामाजिक परिषदेच्या जागीं गेल्यामुळें, तेव्हांपासून बॅ. जयकर हे टिळकांना अधिक जवळून ओळखूं लागले होते. लोणावळें येथील परिषदेच्या अध्यक्षस्थानीं बॅ. जयकर यांना नियुक्त करण्याच्या कामीं स्वतः टिळकांनीं खटपट केली होती. स्वतः टिळक या परिषदेला उपस्थित होते व त्यांचीं तेथें जाहीर व्याख्यानेंहि झालीं.

दि. ५-२ पासून सुरू होऊन पुढें जवळजवळ तीन आठवडे चाललेला टिळकांचा वऱ्हाड-नागपूर भागांतला दौरा हा टिळकांच्या दौऱ्यांच्या माना-

स्वस्तिवाचना सिंहगडावर चढला गगनांत
थरथरुनी श्री तानाजींचा तो तुटका हात

टिळकांना विलायतेहून इतर कांहीं आणतां आलें नाहीं तरी, त्यांनी तेथें बदिस्त पडलेली शिवरायांची 'भवानी तलवार' तेवढी परत आणावी; असें सुचवितांना गडकरी यांनी या कवितेत पुढील ओळी लिहिल्या आहेतः—

नलगे दौलत नलगे बरकत नको कोहिनूर
स्वदेश नलगे स्वराज्य नलगे हो सर्वहि चूर
एक सांगणें एक मागणें तेंच लाखवार
मागुति घ्यावी श्रीशिवबांची भवानि तलवार
स्वदेशभूषा स्वराज्यजननी सकळिं दाखवावी
दावित दावित सौभाग्यश्री स्वदेशीं आणावी
चहुं मुलखांतुनि नव खंडांतुनि मिरवित आणावी
रायगडावर समाधिची मग पूजा बांधावी

महाराष्ट्राचा आपल्या कार्याला असा आशीर्वाद मिळवून टिळक पुण्याहून निघाले ते मुंबईस पोंचले. शिष्टमंडळांतील सर्व मंडळी येथें जमून कोलंबोच्या मार्गे विलायतेस जावयाची, असें ठरलें होतें. दि. २४ रोजीं सकाळीं मुंबई येथें बडोदानरेश सयाजीराव महाराज गायकवाड यांच्या अध्यक्षतेखालीं अखिल भारतीय अस्पृश्यतानिवारण परिषद भरली. टिळक या परिषदेला गेले आणि 'कॉंग्रेसनें अस्पृश्यवर्गाचे प्रतिनिधि घेऊन आपल्या कार्यास त्यांचा पाठिंबा मिळवावा' असा ठराव त्यांनी तेथें मांडला. या ठरावावरील लोकमान्यांचें भाषण काय अर्थाचें होतें व तें भाषण करतांना त्यांना किती आवेश चढला होता, हें कर्मवीर वि. रा. शिंदे यांनीं पुढील शब्दांत* सांगून ठेविलें आहे :

लोकसमुदाय सात हजारावर जमला होता. मंडपाच्या बाहेरहि सारखी रेटारेटी चालू होती. लोकमान्यांसहि आवेश चढून त्यांच्या गर्जना मंडपाबाहेर रस्त्यांतच नव्हे तर पलीकडील चाळींत राहणाऱ्या लोकांच्या कानांवरहि आदळत होत्या. पेशव्यांच्या वेळींहि अस्पृश्यांनी भरलेल्या पखालींतील पाणी ब्राह्मण प्याले... If a god were to tolerate

* आठवणी व आख्यायिका : ख. २ : पृ. २०४९.

**untouchability, I would not recognise him as God at all' ( अस्पृश्यता देवास मान्य असेल तर मी त्यास देवच म्हणणार नाहीं )...हे उद्‌गार ऐकून जो गजर उडाला त्यांत मंडप कोसळून पडतोसें वाटलें...मी येथें जरी आजें शरीरानें प्रथमच आलों आहें तरी मनानें ह्या चळवळींत नेहमींच आहें. जुन्या काळीं ब्राह्मणांच्या जुलमानें ही चाल पडली हें मी नाकारीत नाहीं; पण, या रोगाचें निर्मूलन आतां झालेंच पाहिजे' वगैरे त्यांच्या तोंडचे शब्द भावी इतिहासांत दुमदुमत राहतील.**

टिळकांच्या मुंबई येथील मुक्कामांत अनेक धंद्यांतील लोकांनीं व अनेक संस्थांनीं त्यांचा सत्कार केला व त्यांच्या कार्याला देणग्याहि दिल्या. टिळक निघणार त्याच्या आदल्या दिवशीं रात्रीं सरदारगृहांत त्यांचें व श्रीमंत जगन्नाथ-महाराज यांचें संभाषण झालें. ताईमहाराज प्रकरणांत टिळकांचे जवळजवळ साठ हजार रुपये खर्च झाले होते. टिळकांनीं ही रक्कम परत घ्यावी असें महाराजांनीं सुचविलें. त्यावर टिळक म्हणाले* : एकूण तुमच्या व आमच्या इस्टेटींत तुम्ही फरक करतां म्हणावयाचा! माझी इस्टेट तीच तुमची इस्टेट असें मी समजत आलों. लक्षांत ठेवा, ज्या दिवशीं बाबामहाराजांस त्यांच्या अंतकाळीं मीं शब्द दिला त्या दिवसापासून जें जें म्हणून मी माझें समजतों तें तें सर्व तुमचें-मग पैशाची कथा काय ?—असें मी मानीत आलों आहें. इतकेंच काय, पण, माझे मनांत तुम्हांस मी माझा तिसरा मुलगा असेंच समजतों.

टिळकांच्या या उद्‌गारांनंतरहि महाराजांनीं 'पितृऋणा'तून मुक्त होण्याचा आग्रह धरला. तेव्हां टिळक त्यांना म्हणाले : ठीक आहे. अशानें तुम्हांला समाधानच होणार असेल तर बंगलाबागेची तुमची कांहीं जमीन मला द्या. तिची आज-किंमत तीस हजार रुपये होईल. उत्साहानें व राष्ट्रीयत्वाच्या अभिमानानें काम करणाऱ्या मंडळींस न्यू पूना कॉलेजकरतां मी ती जागा भाड्यानें देणार आहें. बाकीचे तीस हजार मी तुम्हांस माझा मुलगा समजतों म्हणून प्रेमपूर्वक बक्षीस म्हणून देत आहें. मग तर झालेना!

---

* आठवणी व आख्यायिका : खंड १ भा. १ : पृ. ४६१.

दि. २७ मार्च रोजीं सायंकाळीं शिष्टमंडळांतील मंडळी सेंट्रल गाडीनें मुंबईहून कल्याणपर्यंत गेली. ही मंडळी कल्याणला पोंचल्यावर मागाहून मद्रास मेल आली तिनें ही सर्व मंडळी पुढें निघाली. वाटेवाट प्रमुखप्रमुख ठिकाणीं शिष्टमंडळाचा अपूर्व सत्कार होत होता. तंजावर, त्रिचनापल्ली, मदुरा वगैरे ठिकाणचा सत्कार स्वीकारून ही मंडळी शेवटीं रामेश्वरास पोंचली. तेथील वेदाध्यायी भिक्षुकमंडळी तिकडील रिवाजाप्रमाणें मोठमोठे अलकलश डोक्यावर घेऊन लोकमान्यांचे दर्शनास आली होती. रामेश्वरासारख्या ठिकाणीं थांबतां येत नाहीं याबद्दल दुःख व्यक्त करून टिळक पुढें निघाले. रामेश्वराच्या स्टेशनावर वेदघोष ऐकण्याचा समारंभ संस्मरणीय झाला. लोकमान्यांनीं जमलेल्या सर्व ब्राह्मणांस रौप्यदक्षिणा देऊन संतुष्ट केलें.*

टिळक व शिष्टमंडळांतील मंडळी सीलोनला येणार म्हणून तेथील 'सीलोन-इंडियन असोसिएशन'च्या प्रमुखांनीं सर्व व्यवस्था केली होती. या लोकांना या मंडळींच्या आगमनाचा नक्की दिवस कळूं नये, अशी व्यवस्था सरकारनें केली होती. टिळकप्रभृति मंडळी सीलोनला पोंचताच या संस्थेच्या प्रमुखांनीं त्यांचे स्वागत केलें. हिंदी व सिंघाली पद्धतीप्रमाणें एक महाराष्ट्रांतील ब्राह्मण मुलगी व कच्छ, संस्थानांतील एका खोजे गृहस्थाची मुलगी यांजकडून लोकमान्यांना आरती ओंवाळण्यांत आली. दि. ५ रोजीं कोलंबोहून इंग्लंड-कडे जाणाऱ्या जपानी बोटीनें ही मंडळी प्रवास करणार असल्यामुळें, मध्यंतरीं १।२ दिवस मोकळे होते. सामानाची खरेदी, नवा देश पहाण्याची गडबड, टिळ-कपाळप्रभृतींची व्याख्यानें अशा कार्यक्रमांत मंडळींनीं हे दिवस दवडिले. दि. ३ रोजीं श्री. केळकर हे परोपरचे प्रवास-परवाने मंजूर करून घेण्यासाठीं इष्ट त्या ठिकाणीं गेले. तेथें त्यांना असें समजलें कीं, ठरून ठेविलेली जपानी आगबोट आणखी वीस दिवस तरी कोलंबोस येत नाहीं! ऊँकेशायर नांवाची दुसरी बोट लवकरच सीलोनला येऊन इंग्लंडकडे जावयाची होती; तिच्यावर शिष्टमंडळांतल्या सातजणांची सोय होते कीं काय, हा तपास सुरू झाला. इतक्यांत, या मंडळींना मिळालेले प्रवासपरवाने रद्द करण्यांत आल्याची वज्राघाताच्या स्वरूपाची बातमी येऊन थडकली!

---

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ५१६.

येथपासून पुढें सुमारें १६ तारखेपर्यंत ही सर्व मंडळी कोलंबो येथेंच राहिली. व्हाइसरॉयकडे तारा करण्यांत आल्या. त्यांचीं उत्तरें आलीं; त्यांत शाब्दिक श्लेष काढावे लागले. शेवटीं टिळकांनीं एक तार व्हाइसरॉय व इंग्लंडचे पंतप्रधान यांनाहि केली. 'आयर्लंडला ज्या सवलती दिल्या त्या हिंदुस्थानला मिळाल्या तर हिंदुस्थान पन्नास लक्षांपासून एक कोटीपर्यंत लढवय्ये रणांगणावर धाडील आणि चालू युद्धाचा निकाल यशस्वी रीतीनें लावून घेईल' अशा अर्थाची ही तार होती. निदान चिरोलकेससाठीं म्हणून स्वतः मला व वकील म्हणून श्री. करंदीकर यांना जाण्याला परवानगी द्या, अशी तार टिळकांनीं व्हाइसरॉयला पूर्वीच केली होती. ' खटला पुढें ढकलतां येईल ' असें या तारेचें उत्तर आल्यामुळें, हा सर्व ग्रंथ येथेंच संपला. ही तारातारी चालू असतांनाच,* गांधीजींनींहि टिळकांना एक तार धाडली होती ! 'प्रवासपरवाने रद्द करणारा होम डिपार्टमेंटचा हुकूम आपण माना ' असें गांधींनीं या तारेंत लिहिलें होतें. हा हुकूम तोडावयाचा म्हणजे काय करायचें याची गांधीजींची कल्पना काय असेल, देव जाणे !

अशा रीतीनें सीलोन येथें तळ देऊन बसलेलें हें शिष्टमंडळ आशानिराशेचे अनेक हेलकावे खात होतें ! संकल्पित हेतु सिद्ध झाला नाहीं तरी, हा नवा मुलूख अवचित पहावयाला सांपडला एवढ्यावरच या मंडळींना समाधान मानावें लागलें. टिळकांनीं कोलंबो येथील वास्तव्यांत एक बुद्ध-विहार पाहून घेतला. तेथील बुद्ध भिक्षूनें त्यांना एक पाली व्याकरण दिलें. एका अर्थानें ही सर्व मंडळी मनांत निराश झाली होती; तरी, कोलंबो येथील मंडळींनीं त्यांच्याविषयीं दाखविलेलें आगत्य त्यांना अत्यंत उत्साहदायक वाटलें. टिळकांनीं तर् कोलंबो सोडण्यापूर्वी त्यांच्या स्वागतांत वगैरे भाग घेणाऱ्या सर्व बाळगोपाळांस भोजनहि दिलें.† कोलंबोहून परत येतांना टिळक वाटेंत मद्रासेस थांबले होते. दि. २१ रोजीं त्यांचें तेथें व्याख्यान झालें. दि. २७ रोजीं व्हाइसरॉयसाहेब दिल्ली येथें युद्धपरिषद भरविणार असल्याची बातमी

---

* आठवणी व आख्यायिका : खं. ३ : इंग्रजी विभाग : पृ. ७७.

† आठवणी व आख्यायिका : खं. ३. पृ. १४०.

यापूर्वीच बाहेर आली होती. टिळकांनी आपल्या व्याख्यानात या सकल्पित परिषदेच्या स्वरूपाचा व परिणामांचा परामर्श घेतला.

दि. २७ रोजी दिल्ली येथे युद्धपरिषद सुरू झाली तिला टिळक, खिस्तांटचार्ट वगैरे नेत्यांना निमंत्रण नव्हतें. गांधीजी व खापर्डे या परिषदेला निमंत्रित म्हणून गेले होते. कॉन्फरन्सच्या कमिटीचें काम चालू असतांना गांधीजींनी सांगितलें की, 'टिळक, बेसंटबाई, अलीबंधु अशा लोकांशिवाय तुम्ही परिषद भरता, तुम्हाला देशात मनुष्यबळ कोण देणार? कमिटीतील सर्व चर्चा पोल आहे!' असें म्हणून ते तेथून निघून गेले. पण यानंतर त्यांची व व्हाइसरॉयची मुलाखत झाल्यामुळें ते फिरून कमिटीला येऊन बसले! कमिटींत लष्करी बाबींची चर्चा झाल्यावर, स्वराज्याचा ठराव पुढें दडपण्यात आला. पण तो नियमबाह्य ठरला. खापर्डे यांनी हा ठराव परिषदेत मांडण्याचा प्रयत्न केला पण तोहि साधला नाहीं! दिल्लीस ही परिषद झाली त्याच दिवशीं पुण्याच्या नागरिकांची जाहीर सभा श्री. हरिभाऊ आपटे यांच्या अध्यक्षतेखालीं झाली. प्रतिनिधि निवडून पाठविणें शक्य असतें तर पुण्याचे प्रतिनिधि म्हणून टिळकांचीच योजना झाली असती असें मत या सभेत व्यक्त झालें. दिल्ली येथील युद्धपरिषदेला अनुलक्षून टिळकांनी केसरीत 'साम्राज्याच्या गरजा आणि येती थामच्या काजा' व 'दिल्ली परिषदेंत काय झालें' असे दोन लेख लिहिले.

मे महिन्याच्या प्रारंभी मुंबईस ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची सभा झाली तिला टिळक उपस्थित होते. सर्वमान्य पुढाऱ्यांना दिल्लीच्या परिषदेंतून वगळण्यांत आलें याबद्दलचा निषेध या सभेत करण्यांत आला. राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाला इंग्लंडमधील मजूर पक्षाच्या पुढाऱ्यांना बोलावण्यात यावें असें बॅ. बॅप्टिस्टा यांनी लंडनहून सुचविलें होतें; ही सूचना सभेनें स्वीकारली. या सभेला गांधीजी व खापर्डे आलेले होते. दिल्लीच्या युद्धपरिषदेच्या वेळीं झालेली सर्व हकीकत या उभयतांनी टिळकांना कळविली. रवींद्रनाथ टागोर यांचा या सुमारासच इंग्लंड-अमेरिकेंत व्याख्यानांसाठीं दौरा काढण्याचा विचार होता. या दौऱ्याचा राजकारणाशीं अर्थाअर्थी कांहींहि संबंध नव्हता. तरीहि, टागोर यांच्यासारखा जगन्मान्य हिंदी पुरुष परदेशांत गेला तर अप्रत्यक्षपणें ती गोष्ट हिंदुस्थानच्या राजकीय प्रगतीला हितकारक ठरण्याचा संभव आहे हें

ओळखून, टिळकांनीं त्यांच्या हवालीं पन्नास हजार रुपये–विनशर्त व बोभाटा न करितां–केले होते. गांधीजी दि. ४ मे रोजीं टिळकांना भेटले त्या वेळीं, संभाषणाच्या ओघांत असें बाहेर आलें कीं, टागोर यांनीं व्याख्यानांसाठीं परदेशांत जाऊं नये, असें गांधीजींनीं त्यांना सुचविलें होतें! गांधीजींच्या या उद्योगामुळें असो अगर इतर कांहीं कारणांमुळें असो, रवींद्रनाथ टागोर यांनीं यानंतर लवकरच् टिळकांचे पन्नास हजार रुपये परत धाडिले, हें खरें!

टिळक मुंबईहून पुण्यास परत आल्यावर, त्यांचें लक्ष चिरोल केससाठीं विलायतेस लवकर कसें जातां येईल या मुद्द्याकडे वळलें. दिल्लीच्या युद्धपरिषदेच्या प्रांतिक पुरत्या निघणार असाहि संभव दिसूं लागला. हळूहळू या परिषदेची निश्चित योजना बाहेर आली. आणि टिळक-केळकरप्रभृति मंडळींना या परिषदेचीं निमंत्रणेंहि आलीं. मुंबईच्या या युद्धपरिषदेंत काम कसें चालणार, कोणते ठराव चर्चेला निघणार, ठरावांना उपसूचना मांडण्याची मुभा मिळणार कीं नाहीं, वगैरे मुद्द्यांचा अधिकृत खुलासा आगाऊ करून घेणें अवश्य आहे, असें टिळकांना वाटलें. म्हणून, त्यांनीं केळकर यांच्या हस्तें मुंबई सरकारशीं पत्रव्यवहार सुरू केला. या बाबतींत मुंबई सरकारनें बराच चेंगटपणा केला. उपसूचना वगैरे मांडण्याला मुभा मिळणार नाहीं असें शेवटीं निष्पन्न झालें. सभेपुढील ठरावावर भाषणें करतानाच आपले सर्व विचार मांडावयाचे असें ठरवून, दि. १० जून रोजीं मुंबईच्या टाउन हॉलमध्यें झालेल्या या सभेला टिळक हजर राहिले.

गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन यांनीं या सभेंत जें प्रास्ताविक भाषण केलें त्यांत त्यांनीं होमरूल मागणाऱ्या लोकांच्या राजनिष्ठेवर आणि प्रामाणिकपणावर शिंतोडे उडविले. हें घडलें नसतें तर, ही सभा कदाचित् सुरळीत पार पडली असती. कारण, सभेंत काय बोलावयाचें तें पांच मिनिटांत आटपेल अशा बेतानें टिळकांनीं घरूनच लिहून नेलें होतें. विलिंग्डनसाहेबांनीं हा अतिक्रम केल्यामुळें, टिळकांना आपल्या संकल्पित भाषणाचा सगळा रोंख बदलावा लागला. ठरावावर बोलण्याची पाळी टिळकांवर आली त्या वेळीं त्यांनीं असें सांगितलें कीं, **हिंदुस्थानावर आज ना उद्यां स्वारी झाली तर हिंदी लोक तिच्या प्रतिकारासाठीं आपले देहहि खर्ची घालतील; पण, स्वराज्य व स्वदेशसंरक्षण यांची सांखळी मात्र तोडतां येणार नाहीं.**

टिळकांच्या तोंडून हें वाक्य निघाल्याबरोबर विलिंग्डनसाहेबांनीं त्यांना थांबविलें. 'राजकारणाची चर्चा मी येथें चालू देणार नाहीं' असें त्यांनीं बजाविलें. त्यावर टिळक म्हणाले, "अशा परिस्थितींत येऊन निघून जाण्यालेरीज स्वाभिमानी माणसाला दुसरा मार्ग नाहीं.' असें म्हणून टिळकांनीं सभात्याग केला. यानंतर केळकर यांच्यावर बोलण्याचा प्रसंग आला. "लोकांनीं सैन्यांत शिरावें असा उपदेश करावयास आम्ही निघालों तर आम्हांला असें दाखवितां आलें पाहिजे कीं, सरकार लोकांचा राजकीय दर्जा वाढविण्यासाठीं मनःपूर्वक प्रयत्न करीत आहे," असें केळकर म्हणाल्याबरोबर विलिंग्डनसाहेबांनीं त्यांनाहि अडविलें. "माझें भाषण जरा पुढें ऐका, मग निर्णय करा," असें केळकर म्हणाले; पण, त्यांना इतकीहि सवड मिळाली नाहीं! त्यामुळें त्यांनींहि सभात्याग केला! इतकें झाल्यावर हॉर्निमन, जम्नादास द्वारकादास, चमनजी वगैरे मंडळींनींहि सभात्याग केला! जिना व दादासाहेब करंदीकर यांनीं अखेरपर्यंत सभा गाजवावी असा संकेत ठरला असावा. त्यामुळें हे दोघे मात्र सभा सोडून निघून गेले नाहींत. दुसऱ्या ठरावावर बोलतांना जिना यांनीं गव्हर्नरसाहेबांची चांगलीच कानउघाडणी केली.

टिळकप्रभृति मंडळींचा हा सभात्याग यापुढें कांहीं दिवस चांगलाच गाजत राहिला. विलिंग्डन अध्यक्ष असतील अशा सभेस हजरहि न राहण्याचा संकल्प हॉर्निमनप्रभृति कांहीं लोकांनीं जाहीर केला. हॉर्निमन हे यापूर्वी युद्धसमितीवर काम करीत होते. त्यांनीं या जागेचा राजिनामा दिला. दि. १८-६ च्या केसरींत टिळकांनीं या सर्व प्रकारावर 'लॉर्ड विलिंग्डन यांचा अत्याचार' या मथळ्याचा लेख लिहिला. दि. १६-६ रोजीं मुंबईस शांताराभाच्या चाळींत झालेल्या एका जाहीर सभेंत गांधीजींच्या अध्यक्षतेखालीं बोलतांना टिळक म्हणाले, "देशावरील बंधनें काढून घेण्यासाठीं सरकारला कोण मदत करील? लष्करांत वरिष्ठ जागा देण्याचें सरकार कबूल करील तर पांच हजार लोकांची मी भरती करीन. तसें मजकडून न होईल तर कमी पडणाऱ्या प्रत्येक माणसामागिक मी शंभर रुपये दंड देईन. याची जामिनकी म्हणून मी गांधींच्याजवळ पन्नास हजार रुपये ठेवण्याला तयार आहें."

दि. २२-६ रोजीं टिळकांनीं पुणें येथें एक व्याख्यान दिलें. 'सैन्यांत

जाण्यापासून देशाला कांहीं उपयोग होण्याची आशा असेल तर लोक सैन्यांत जाण्याला तयार होतील; देशांत जर नेहमीं परतंत्र-पणानेंच वागावें लागणार तर देशाचें रक्षण केलें काय, न केलें काय सारखेंच,' अशा आशयाचे उद्गार टिळकांनीं या भाषणांत काढले. जुलै महिन्याच्या शेवटीं सरकारनें या भाषणाच्या आधारें टिळकांवर हुकूम बजावला. 'यापुढें तुम्हांला ज्या जिल्ह्यांत भाषण करावयाचें असेल त्या जिल्ह्याच्या डि. मॅजिस्ट्रेटची व मुंबईस भाषण करावयाचें असेल तर तेथील पोलिस कमिशनरची तुम्हीं आगाऊ परवानगी घेतली पाहिजे; नाहीं तर भाषण करण्याला तुम्हांला मनाई आहे,' असा या हुकुमाचा अर्थ होता.

जुलै महिन्याच्या आरंभीं मॅंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणांचा अहवाल प्रसिद्ध झाला. ७ जुलै रोजीं सकाळच्या डाकेनें या रिपोर्टाच्या तीन प्रति टिळकांकडे आल्या. टिळकांनीं एक प्रत स्वतः वाचावयाला घेतली. त्या दिवशीं सकाळपासून सायंकाळपर्यंत सारखी बैठक मारून टिळकांनीं या रिपोर्टाचें वाचन संपविलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं टांचणें-टिपणें तयार करून, दुपारच्या वेळीं त्यांनीं **'उजाडलें, पण सूर्य कोठें आहे'** या मथळ्याचा लेख सांगितला. या लेखाच्या द्वारें टिळकांनीं या सुधारणांवर जो अभिप्राय दिला तो कळावा म्हणून सरकार फार उत्सुक होतें. दि. ९-७ रोजीं सकाळींच केसरीचा अंक नेण्या-साठीं सरकारी माणूस मुद्दाम धाडण्यांत आला होता, अशी माहिती मिळते. टिळकांनीं पुढील आठवड्यांत याच विषयावर 'जनाब! देहली तो बहोत दूर है' या मथळ्याचा लेख लिहिला.

मॅंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणांच्या स्वरूपाची चर्चा सुरू होऊन मध्यंतरीं दबलेले राजकीय मतभेद पुन्हा डोकें वर काढणार, असा संभव दिसूं लागला. सुधारणांच्या स्वरूपाचा विचार करण्यासाठीं काँग्रेसचें खास अधिवेशन भरवावें अशा सूचना करण्यांत येऊं लागल्या. या सर्व चर्चा चालू होत्या तोंच टिळकांना चिरोल-केससाठीं विलायतेस जाण्याची परवानगी मिळाली. काँग्रेसचें अधिवेशन आटोपल्याबरोबर शक्य तितक्या लवकर निघावयाचें असें ठरवून टिळक त्या तयारीला लागले.

ऑगस्ट महिन्याच्या अखेरीला काँग्रेसचें खास अधिवेशन मुंबई येथें बॅ. हसन इमाम यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें. या अधिवेशनाला दि. २८ रोजींच

प्रारंभ व्हावयाचा होता. पण, काँग्रेसमधून बाहेर पडूं पहाणाऱ्या नेमस्तांना सांभाळण्याचा प्रयत्न पं. मालवीय हे करीत असल्यामुळें, अधिवेशनाची प्रत्यक्ष सुरवात दि. २९ ला झाली. अनेक लोकांचा एक दिवस व्यर्थ घालविल्याबद्दल पंडितजींनी शेवटीं दिलगिरी व्यक्त केली! सुधारणांच्या संबंधींच्या ठरावाचें स्वरूप ठरवितांना विषयनियामक समितींत बरीच खडाजंगी झाली. या समितींतच टिळकांनीं एका तरुण देशभक्ताला 'You are still a child in politics' (आपण अजून राजकारणांत पोर आहात) असें म्हटलें. यावर हे गृहस्थ खूप खवळले आणि आदळआपट करूं लागले! तेव्हां अध्यक्ष बॅ. हसन इमाम यांनी 'टिळकांनीं आपल्याला पोर म्हणणें हा आपला गौरव आहे" असे उद्गार काढले!

मुंबईचें हें अधिवेशन संपवून टिळक सप्टेंबरच्या सुरवातीला पुण्यास परत आले. बाबू मोतिलाल घोष, बॅ. दास, श्री. बिपिनचंद्र पालप्रभृति बंगाली मंडळी व कित्येक अन्यप्रांतीय देशभक्त या वेळीं पुण्यास* आले होते. दोन दिवस गायकवाडवाड्यांत त्यांचीं व्याख्यानें रंगलीं. या वेळीं टिळकांवर बजावण्यांत आलेला भाषणबंदीचा हुकूम अमलांत होता; तरीहि, या सभेच्या वेळीं टिळकांचीच अध्यक्षस्थानीं योजना करण्यांत आली होती. 'न बोलतां दृष्ट तो कौल देणारा अध्यक्ष' हा अर्थ मनांत ठेवून बिपिनचंद्र पाल यांनीं या वेळीं बोलतांना टिळकांना उद्देशून 'This oracle in the chair' असे शब्द वापरले.

टिळकांनीं विलायतेंत कसलीहि राजकीय चळवळ करावयाची नाहीं या अटीवरच त्यांना सरकारनें प्रवासपरवाना दिला असल्यामुळें, अगदीं नेमकीं तेवढीं माणसेंच बरोबर घेऊन विलायतेस जाण्याचें टिळकांनीं ठरविलें. कधीं निघणार, कोणत्या मार्गानें जाणार वगैरे गोष्टींचा त्यांनीं या वेळीं बोभाटा होऊं दिला नाहीं. दादासाहेब करंदीकर, श्री. वासुकाका जोशी व श्री. गणपतराव नामजोशी यांना बरोबर घेऊन, दि. २३-९-१८ रोजीं टिळक मुंबईहून निघाले.

---

## पर्व सतरावें : : : विलायतेंतील वास्तव्य

टिळक हे सत्याग्रही म्हणूनच त्यांनीं चिरोलखटला 'विलायतेपर्यंत नेला ...सत्याग्रह फार पुरातनकाळापासूनचा आहे.

—शिवरामपंत परांजपे

टिळक निघाले त्या वेळीं विलायतेचा प्रवास लढाईमुळें धोक्याचा वाटणारा होता. शिवाय या सुमारास जिकडेतिकडे इन्फ्लुएंझाची सांथ पसरलेली असल्यामुळें, आजारी न पडतां टिळकप्रभृति मंडळी मार्गाला लागतात कशी व वाटेंत आजारी न पडतां इंग्लंडांत सुखरूप पोंचतात कशी, हा विवंचनेचाच विषय झाला होता. लढाईमुळें विलायतच्या प्रवासाला या वेळीं दिवसगतहि फार लागे. २३।९।१८ ला मुंबईहून निघालेले टिळक २०।१० ला जिब्राल्टरला पोंचले नि त्यानंतर दहा दिवस त्यांना लंडनला पोंचावयाला लागले, यावरून हा प्रवास कसा रखडपट्टीचा होता, याची कल्पना करतां येईल. टिळक एडनला पोंचले तेथें त्यांना 'हिंदी प्रवासी' म्हणून खालीं उतरतां आलें नाहीं. दिल्ली येथें या वर्षाच्या अखेरीस होणाऱ्या कॉंग्रेसच्या अध्यक्ष-पदावर आपली निवड करण्यांत आली हें वृत्त टिळकांना एडन येथें कळलें. एडनपर्यंत टिळकांनीं आपला पोषाख बदलला नव्हता; पण, इंग्रजी पेहेरावाची हळूहळू सवय व्हावी यासाठीं एडनपासून पुढें त्यांनीं विजार घालण्याला सुरवात केली.

पोर्ट सैदला टिळकांची बोट ३।४ दिवस खोळंबून राहिली; पण येथेंहि त्यांना खालीं उतरतां आलें नाहीं. बोटीचा मुक्काम पोर्ट सैदला होता त्या अवधींत बोटींतल्या उतारूंना एक सूचना देण्यांत आली. यापुढील प्रवासांत दगाफटका होण्याचा संभव जास्त असल्यामुळें, लाइफ बेल्ट वगैरे उपकरणें वापरण्याचा सराव उतारूंना होणें अवश्य होतें. यासंबंधाची रंगीत तालीम दुपारीं होणार आहे अशा अर्थाची ही सूचना होती. दुपारीं ही रंगीत तालीम

झाली तेव्हां टिळक गळ्यांत उपकरणें अडकवून उभ्या दोरांच्या शिडीवरून एखाद्या तरुणासारखे भरभर उतरले व चढले.* लाइफ बोट पाण्यांत सोडून, उडी टाकून तिच्यांत बसून, ती वल्हवीत बोटीपासून दूर नेण्याचा नि पुन्हा बोटीपर्यंत परत येण्याचा प्रयोगहि टिळकांनीं स्वतः केला.† जिब्राल्टरपासून तर धोक्याचा प्रदेशच सुरू झाला. बोटीवर 'ब्लॅक आउट'चा अंमल सुरू झाला. टिळकांच्या बोटीच्या मागेंमागें एकेक पाणबुडी बोट, एका बाजूला एक युद्धनौका, डोक्यावर एक टेहळें विमान अशा थाटांत बोटीचा प्रवास मंदमंद चालला. क्वचित् तोफांचे आवाजहि कानांवर येत. अशा रीतीनें हा प्रवास दि. ३० ऑक्टोबरला संपला. टिळकप्रभृति मंडळी टिल्बरी डॉक्समध्यें पोंचली. तेथें त्यांना थॉमस कुकच्या माणसानें एक पत्र दिलें. टिळकांची उतरण्याची वगैरे व्यवस्था काय करून ठेवण्यांत आली आहे यासंबंधींची माहिती बॅ. बॅप्टिस्टा यांनीं या पत्रांत दिली होती. 'मैदा व्हेल' या लंडनच्या भागांत हौले प्लेस नं. १० या ठिकाणीं बॅप्टिस्टांनीं टिळकांना बिऱ्हाडासाठीं जागा ठरवून ठेविली होती व बिऱ्हाडाची कांहीं मांडामांडहि करून ठेविली होती. सर्व मंडळी या ठिकाणीं पोंचल्यावर, टिळक सुखरूप आले हें पाहून बॅप्टिस्टांना परमानंद झाला. ते टिळकांना कडकडून भेटले.

या ठिकाणीं टिळकांची विलायती दिनचर्या सुरू झाली. घरीं जशी त्यांची राहणी साधी होती तशीच ती या ठिकाणींहि राहिली. त्यांच्या खाण्यापिण्याचें पथ्य सांभाळणें, बाहेर जातायेतांना त्यांना सांभाळून नेणेंआणणें, प्रत्येक वैयक्तिक बाबतींत त्यांची काळजी घेणें व त्यांना लागेल ती मदत करणें हें काम श्री. गणपतराव नामजोशी आस्थेनें करूं लागले. टिळक लंडनला पोंचल्यावर थोडक्याच दिवसांत दिवाळी आली. त्या वेळीं लंडनला असलेले कॅप्टन यतले यांच्या घरीं टिळकांनीं या वर्षींची भाऊबीज साजरी केली! एखाद्या पुरातन मंदिरांत सुवासिनींनीं ओंवाळलें तर भाइलाजानें तें सहन करण्याचा व प्रत्येक ओंवाळणींत कांहीं तरी द्रव्य टाकून पुढें जाण्याचा

* आठवणी व आख्यायिका : खं. १ : भा. १ : पृ. ६१.
† आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ३६.

टिळकांचा परिपाठ असे! भाऊबिजेच्या निमित्तानें ओंवाळून घेण्याची नि ओंवाळणी घालण्याची ही पर्वणी त्यांना किती वर्षांनीं लाभली होती, कोण जाणे!

टिळक विलायतेस पोंचले त्या सुमारासच शस्त्रसंधि होऊन महायुद्ध संपलें नि तहाच्या वाटाघाटींना सुरवात झाली. चिरोलकेसमध्यें यश येण्याची जी अर्धवट आशा वाटत होती तीहि या बदललेल्या परिस्थितीमुळें आतां उरली नाहीं, हें टिळकांनीं ओळखलें. बॅरिस्टर या नात्यानें ते सर जॉन सायमन यांना भेटले तेव्हांहि सरसाहेबांनीं प्रथम बरीच टाळाटाळ केली. खटला चालविण्यांत अर्थ नाहीं असा सल्ला देण्यापर्यंत त्यांची मजल गेली. पण, एवढा प्रवास करून आल्यावर, परिणामाला भिऊन टिळक खटला काढून घेतील हें शक्यच नव्हतें. सर जॉन सायमन यांना गुंतवून, खटल्याची तारीख कोणती ठरते याची वाट टिळक पाहूं लागले.

दि. १३।११ रोजीं टिळकांनीं पंतप्रधान लॉइड जॉर्ज यांना पत्र लिहिलें व विजयाबद्दल स्वतः म्हणून व कॉंग्रेसतर्फे म्हणून दोस्त राष्ट्रांचें अभिनंदन केलें. खटल्याच्या कामाव्यतिरिक्त इतर कसली हालचाल टिळकांनीं करूं नये या अटीवर त्यांना प्रवासपरवाना देण्यांत आला होता. खटल्याचा निकाल लागे-पर्यंत व्याख्यानें द्यावयाचीं नाहींत असें टिळकांनीं आपण होऊनच ठरविलें होतें. तरीहि, आपल्यावर असलेले निर्बंध एकदांचे नाहींसे व्हावे हें त्यांना अनेक दृष्टींनीं इष्ट वाटूं लागलें. त्यांनीं तशी खटपट केली व विलायतेस पोंचल्यापासून महिनाभराच्या अवधींत त्यांच्या हालचालींवरील बंधनें रद्द झालीं. बॅप्टिस्टांनीं मजूरपक्षाशीं जोडलेले संबंध दृढ करणें, या पक्षाला आर्थिक मदत देऊन त्यांची व त्यांच्या वृत्तपत्रांची सहानुभूति मिळविणें या उद्योगांना टिळकांनीं नोव्हेंबरपासूनच सुरवात केली. लंडनमधील कॉंग्रेस कमिटींतील पुष्कळ लोक कॉंग्रेसच्या सध्यांच्या धोरणाविषयीं उदासीन आहेत व या कमिटीतर्फे चालणारें 'इंडिया' साप्ताहिक ज्यांच्या हातीं आहे त्या लोकांचा तर कॉंग्रेसच्या धोरणाला व आपल्याला विरोध आहे, असें टिळकांना आढळून आलें. या सर्वांना ताळ्यावर कसें आणितां येईल हें मनाशीं ठरवून, टिळक त्या दिशेनेंहि लोकांच्या गांठीभेटी घेऊं लागले.

स्वराज्याच्या मागणीच्या प्रचारासाठीं टिळकांनीं श्री. केळकर यांच्याकडून

The Case for Indian Home Rule हें पुस्तक तयार करून घेतलें होतें त्याच्या प्रति ठळक ठळक माणसांना देऊन त्यांना आपल्या बाजूला वळवून घेण्याचा उद्योग टिळकांनीं पहिल्या एकदोन महिन्यांत केला. या शिवाय, इंग्लंडला पोंचताच त्यांनीं 'स्वयंनिर्णय' या विषयावर एक व 'ब्लवनोंची सर्वमान्य स्वराज्ययोजना' या विषयावर एक अशीं दोन पत्रिकें तयार केलीं व तीं छापून घेतलीं. या पत्रिकांचा प्रचार व त्यातील विषयाची चर्चा हाहि एक उद्योग टिळकांच्या मागे लागला. अमेरिकेचे अध्यक्ष विल्सन व फ्रेंच मुत्सद्दी क्लेमेंशो यांना हीं पत्रिकें नक्की मिळावीं यासाठीं टिळकांनीं दुहेरी व्यवस्था केली व १९१९ च्या जानेवारीच्या पूर्वार्धात हीं पत्रिकें या उभयतांना मिळाल्याचें वृत्त त्यांना समजलें.

इंग्लंडमधील वास्तव्यकाळातल्या पहिल्या दोन-अडीच महिन्यांत टिळकांनीं या उद्योगाशिवाय आपल्या आवडीचा असा आणखीहि एक उद्योग सुरू केला. वेदकालनिर्णय, वेदपूर्वकालीन पृथ्वी, खाल्डियन वेद, असीरियन संस्कृति इत्यादि अनेक विषयांकडे त्यांची बुद्धि नेहमींच ओढ घेत असे अशा मनःप्रवृत्तीच्या गृहस्थाला इंडिया ऑफिसच्या ग्रंथालयात पोटभर खाद्य मिळण्यासारखें आहे हें ओळखून, आपला फावला वेळ या ग्रंथालयात घालविण्यास टिळकांनीं सुरवात केली. खाजगी चर्चाभेटींच्या निमित्तानें त्यांच्या ओळखींचा पसारा वाढू लागला त्याबरोबर त्यांना चहाला व उपाहाराला निमंत्रणें येऊं लागलीं. 'ब्रिटिश इंडिया सोसायटी' या संस्थेतर्फे असाच एक समारंभ साजरा करण्यात आला. या समारंभाला टिळकांप्रमाणेच मुंबईचे भूतपूर्व गव्हर्नर लॉर्ड सिडनहॅम व त्यांची पत्नी हीं उपस्थित होतीं! समारंभ घडवून आणणाऱ्या बाईंनीं शिष्टाचार म्हणून टिळकांची लाटसाहेबांशीं ओळख करून दिली! लाटसाहेबांनींहि निमूटपणें टिळकांशीं हस्तांदोलन केलें! पण, बाईंना मात्र हा प्रकार पाहून भयंकर फणकारा आला! 'एका गुन्हेगाराच्या हाताशीं माझ्या यजमानांचा हात भिडवला! केवढा हा आचरटपणा' अशा भावनेनें बाई बेहोष झाल्या नि मर्यादेचा धडधडाट करू लागल्या! समारंभ घडवून आणणाऱ्या बाईंची नाकदुऱ्या काढताकाढता पुरेवाट झाली!

दिल्लीच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष म्हणून टिळक निवडले गेले पण, हें

कांहीं दिल्ली येथें उपस्थित राहणार नाहींत असें दिसूं लागलें, तेव्हां दुसरा अध्यक्ष म्हणून कोणाला निवडावें असा प्रश्न उपस्थित झाला. दिल्लीच्या मंडळींना रवींद्रनाथ टागोर हवे होते. अखेरीस पं. मालवीय यांच्या गळ्यांत ही माळ पडली! त्यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत टिळकांच्या नांवाचा उल्लेखहि केला नाहीं. या अनुल्लेखाचा बराच गवगवा झाला, त्यामुळें पंडितजींनीं समारोपाच्या भाषणांत ओझरतें टिळकांचें नांव घेतलें. दिल्ली कॉंग्रेसच्या वेळीं जो वादविवाद झाला त्यांत विख्यांटबाई बऱ्याच बिथरल्या! दादासाहेब खापर्डे यांच्या नांवानें त्या फारच चरफडूं लागल्या. जानेवारी महिन्यांत टिळकांना या भानगडी कळल्या तेव्हां त्यांना परमावधीचें दुःख झालें. जगाच्या चावडीवर हिंदुस्थानचा प्रश्न मांडावयाच्या अशा मोक्याच्या वेळीं हिंदुस्थानांतल्या कर्त्या माणसांचीं मनें अशीं बिघडलेलीं असणें हितावह नाहीं, असें त्यांना वाटत होतें. भिन्न मुखांनीं एकच मागणी करण्याची सध्यांची वेळ आहे असें त्यांचें या सुमारास मत बनलें होतें. दिल्लीच्या कॉंग्रेसनें शांततापरिषदेला शिष्टमंडळ धाडण्याचें ठरविलें व त्यांत टिळकांचा समावेश केला. या गोष्टीचा इतर कांहीं फायदा झाला नाहीं तरी, 'इंडिया' पत्राच्या संपादकांशीं झगडतांना,ही कॉंग्रेस-मान्यता उपकारक ठरेल, असें टिळकांना वाटलें.

नाताळची सुटी संपून दि. ११-१-१९ ला कोर्ट सुरू झालीं. चिरोल-केसच्या कामाला प्रारंभ केव्हां होईल, याची कल्पना त्यांना तोंपर्यंत आली नव्हती. मध्यंतरीं इंग्लंडांत पार्लमेंटच्या निवडणुकी सुरू झाल्या. मजूरपक्षाच्या लोकांशीं टिळक-बॅप्टिस्टा यांनीं संधान बांधलें असल्यामुळें, या निवडणुकीच्या मोहिमेचा उपयोग हिंदुस्थानच्या दृष्टीनें करण्याच्या कामीं टिळकांना यश आलें. हिंदुस्थानची स्थिति व तेथील लोकांच्या आकांक्षा यांविषयीं माहिती देणारीं सुमारें दहा लक्ष हस्तपत्रकें या निवडणुकीच्या भरांत इंग्लंडच्या सर्व भागांत वांटण्यांत आलीं. या सुमारास लाला लजपतराय नि डॉ. हर्डीकर हे अमेरिकेंत होते. हिंदुस्थानविषयक प्रचार-वाङ्मय त्यांच्याकडेहि धाडण्याला टिळक विसरले नाहींत. शांततापरिषदेला कॉंग्रेसतर्फे जाण्याची– निदान प्रेक्षक म्हणून तरी जाण्याची– टिळकांची इच्छा होती. पॅरिसला जाण्यासाठीं प्रवास-परवाना मिळण्याबद्दलचा अर्जहि त्यांनीं ब्रिटिश सरकारकडे धाडला. पण, या अर्जाला

नकारार्थी उत्तर देण्यांत आलें. इंडिया ऑफिसनें दि. २८।१।१९ ला या अर्जाला नकार दिला. मध्यतरी न्यायालयें सुरु होऊन चिरोलकेस दि. २९-१ पासून सुरू होईल, असें जाहीर झालें होतें.

टिळकांनीं चिरोलविरुद्ध केलेल्या या प्रसिद्ध खटल्याच्या कामाला दि. २९।१ रोजीं न्यायमूर्ति डार्लिंग यांच्यापुढें प्रारंभ झाला. सर जॉन सायमन हे विख्यात बॅरिस्टर व मुत्सद्दी टिळकांच्या बाजूनें काम चालवीत होते नि स्पेन्स नांवाचे दुसरे एक बॅरिस्टर सायमनसाहेबांना मदत करीत होते. चिरोल यांच्या तर्फेचे बॅरिस्टर सर एडवर्ड कार्सन हे आयर्लंडमधील पुढारी म्हणून आणि चळवळ्ये म्हणून चांगलेच नाणावलेले होते. बॅरिस्टर म्हणून त्यांची योग्यता फार वरच्या दर्जाची मानली जात असे. टिळकांसारखा फिर्यादी, चिरोलच्या रूपानें जवळजवळ ब्रिटिश सरकारच या खटल्यांत प्रतिवादी आणि सायमन-कार्सन यांच्यासारखे कलहकुशल बॅरिस्टर वादीप्रतिवादींच्या तर्फे काम चालविणारे— असा संच या खटल्यांत जमून आल्यामुळें, या खटल्यांत मौजेचे प्रसंग पुष्कळच उद्भवले! इंग्लंडमधील पद्धतीप्रमाणें हा खटला ज्यूरीच्या मदतीनें निकालांत निघणार होता; आणि खटला जसा विशेष, त्याप्रमाणेंच या खटल्यांतली ज्यूरीहि स्पेशल म्हणजे विशेषच होती.

दि. २९ रोजीं सुरवातीचे मंत्रतंत्र झाल्यावर, सर जॉन सायमन यांनीं वादी टिळक यांची फिर्याद काय आहे हें समजून सांगण्यासाठीं भाषणाला सुरवात केली. या भाषणांत त्यांनीं जवळजवळ टिळकांच्या सार्वजनिक कार्याचें समालोचनच केलें असें म्हणावयाला हरकत नाहीं. सायमनसाहेबांचें भाषण चाललें असतांना, न्या. मू. डार्लिंग मधूनच कांहीं मार्मिक प्रश्न विचारीत. "टिळक कोण आहेत हें तुम्हीं सांगितलें; चिरोल कोण आहेत हेंहि सांगाना. मला त्यांचें फक्त नांव माहीत आहे, ज्यूरीला तर तेंहि माहीत नसेल!" असें डार्लिंगसाहेब म्हणाले. टिळकांनीं आखाड्यांना प्रोत्साहन कां व कसें दिलें यांचें स्पष्टीकरण सायमनसाहेब करीत होते त्या वेळीं कोर्टांत पुढील संवाद झाला :

डार्लिंगः—ह्या भाषणावरून विद्यार्थ्यांच्या शिक्षणांत तालिमबाजीचा समावेश केल्याचा टिळकांना मोठा अभिमान वाटतो, असें दिसून येत नाहीं काय ? आमच्या ईटन व हॅरो येथील शाळांतून असा उपदेश केला पाहिजे.

**सायमनः**—अगदीं बरोबर! पण हें सर्व हिंदुस्थानांतून इंग्रजांना हांकलून देण्याकरिता, असें म्हणणें हीच बेअब्रू.

**कार्सनः**—तुम्ही दर्शवितां तेवढी ही गोष्ट हलकी नाहीं.

पहिल्या दिवशीं अपुरें राहिलेलें आपलें भाषण सायमनसाहेबांनीं दि. ३०-१ ला पुढें सुरू केलें व तें त्यांनीं त्याच दिवशीं संपविलें. हें उर्वरित भाषण चालू असतांना कोर्टांत झालेला पुढील संवाद मासलेवाईक आहे. रॅड-आयर्स्टच्या खुनांशीं टिळकांचा कांहीं संबंध नव्हता असें सायमनसाहेबांनीं सांगितल्यावरून हा संवाद सुरू झाला :

**डार्लिंगः**—हें प्रकरण पुरें करण्याकरितां मी इतकेंच विचारतों कीं, शेवटीं कुणी गुन्हेगार सांपडला कीं नाहीं?

**सायमनः**—होय. पुढें एक मनुष्य सांपडला. त्याचें नांव खाडिलकर असें होतें.

**कार्सनः**—नव्हे! नव्हे! त्याचें नांव चापेकर असें होतें!

**सायमनः**—कोणीहि असो. तो सांपडल्यावर त्याच्यावर खटला झाला... सर्व कांहीं झालें आणि तें यथायोग्य झालें. तो ब्राह्मण होता हेंहि खरें. पण, आयर्लंडात जितके आयरिश लोक असतील तितकेच हिंदुस्थानांत ब्राह्मण असतील.

**डार्लिंगः**—नाहीं. नाहीं. अधिक असतील!

आपल्या भाषणात फिर्यादींतील प्रमुख मुद्द्यांचें स्पष्टीकरण केल्यावर, टिळकांना साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत बोलावण्यापूर्वी सायमनसाहेबांनीं उच्चारलेलें पुढील वाक्य सर एडवर्ड कार्सन यांची उलटतपासणीची पद्धत किती कठोर असे हें सुचविणारें आहे. सायमनसाहेब म्हणाले, "आतां मी टिळकांना साक्षीच्या पिंजऱ्यांत बोलावितों. सर एडवर्ड कार्सन हे त्यांची उलटतपासणी करणार, तेव्हां टिळकांना तें एक मोठें दिव्यच करावयाचें आहे."

या दिवशीं बॅ. स्पेन्स यांनीं टिळकांची सरतपासणी घेतल्यावर, सर एडवर्ड कार्सन यांनीं त्यांच्या उलटतपासणीला सुरवात केली. ही उलटतपासणी या दिवशीं सुरू झाली ती दुसऱ्या दिवशीं चालली; आणि पुढें दि. १२-२ व १३-२ या दिवशींहि चालली. मध्यंतरीं आठ-दहा दिवस न्या. मू. डार्लिंग हे इन्फ्लु-

एकाएकी आजारी पडल्यामुळे खटल्याचें काम स्थगित होतें. सर एडवर्ड कार्सन यांनीं उलटतपासणीला सुरवात केली त्या वेळी त्यांनीं पुरेशी तयारी केलेली नव्हती.* टिळकांनीं याचा भरपूर फायदा घेतला. 'ग्लोब'पत्रानें टिळकांची माफी मागितली होती ती पुराव्यांत दाखल व्हावी अशी टिळकांची फार इच्छा होती. कार्सन यांनीं विचारलेल्या एका प्रश्नाचा भरपूर फायदा घेऊन टिळकांनीं ही माहिती कोर्टाच्या गळ्यांत बांधली. टिळकांना निरुत्तर करण्याच्या हेतूनें आणि त्यांना कमीपणा यावा या हेतूनें कार्सनसाहेबांनीं आपल्याकडून अगदीं ढोबळे प्रश्न विचारावे आणि टिळकांनीं दिलेली नमुनेदार उत्तरें ऐकून खजिल होऊन चरफडावें, असे प्रकार या उलटतपासाच्या वेळीं अनेक वेळा घडले 'काळ'कर्ते परांजपे न्यू इंग्लिश स्कूलमध्यें विद्यार्थी म्हणून शिकत असतांनाच टिळकांनीं त्यांना पिक्रिक ॲसिडची कृति व बाँबची विद्या शिकविली, असें समजून कार्सनसाहेबांनीं टिळकांना प्रश्न विचारण्याला सुरवात केली, तेव्हां कोर्टांत पुढील प्रश्नोत्तरें झालीं :

डार्लिंग—पराजप्यांच्या वर्गांत टिळक 'सायन्स' शिकवीत होते तें कसलें हें विचारा.

कार्सन—कसलें सायन्स !

टिळक—पदार्थविज्ञान, ज्योतिष व यंत्रशास्त्र.

कार्सन—रसायनशास्त्र !

टिळक—नाहीं.

कार्सन—पिक्रिक ॲसिड !

टिळक—तो विषय मलाहि माहीत नाहीं.

टिळकांनीं दिलेल्या मार्मिक व खोचदार उत्तरांमुळें कार्सनसाहेब कसे चवताळले हें पुढील संवादावरून स्पष्ट होत आहे :

कार्सन—जुलमी सरकाराविषयीं तुम्हीं लिहिलेंत त्यांत इंग्रजी राज्याचा समावेश होतो काय !

टिळक—सगळ्याच जुलमी राज्यांचा समावेश होतो. परंतु, कोणाचा उल्लेख विशेष अभिप्रेत आहे हें परिस्थितीवरून ओळखावयाचें असतें.......

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ५५३.

मागचीं पुढचीं वाक्यें पाहिलीं म्हणजे कळून येतें. लोकांसंबंधीं लिहितांना मीं आयरिश लोकांचेंहि उदाहरण दिलें आहे.

कार्सन—तें असो म्हणा ! येथें कांहीं आम्ही आयरिश राष्ट्राचा न्याय करावयास बसलों नाहीं. बंगालच्या फाळणीमुळें बीय उडालें काय ?

टिळकः—होय ! तुमच्या आयर्लंड-अल्स्टरमध्यें झालें, तसेंच इकडे झालें.

कार्सन—अल्स्टरबद्दल तुम्ही बोलूं नका ! अल्स्टर आपली काळजी घेण्यास समर्थ आहे.

कार्सनचा रोख सगळ्या ब्राह्मणवर्गाला बदनाम करण्याचा आहे हें दिसतांच टिळकांनीं त्याला कसें डाफरून उत्तर दिलें हें पुढील संवादीवरून कळून येण्यासारखें आहे:

कार्सन—तुम्ही चित्पावन जातीचे पुढारी, नाहीं काय ?

टिळक—असलों तर निरनिराळ्या जातींचा असेन; एकट्या चित्पावनांचा नव्हे.

कार्सन—जॅक्सनचा खून करणारे सगळे ब्राह्मणच नव्हते काय ?

टिळक—माहीत नाहीं; पण ब्राह्मणांवर असा कटाक्ष धरणें हें सडक्या मेंदूचें लक्षण आहे.

कार्सनः—पण, हे शब्द न्या. मू. दावर यांनीं तुमच्याबद्दल वापरले आहेत.

टिळकः—एखादा शब्द न्यायमूर्तींनीं वापरला असला, म्हणजे तो चूक असूं नये कीं काय ? सवड असती तर तेथेंच योग्य उत्तर दिलें असतें.

रँडचा खून करणाऱ्याला टिळकांनीं चिथावणी दिली असें टिळकांच्या तोंडून कार्सनसाहेब काढूं पहात होते. त्या वेळीं झालेली शब्दांची झटापट अतीच मासलेवाईक आहे:

कार्सनः—दुष्काळाला इंग्रज हे कारण असें तुम्ही म्हटलें काय ?

टिळकः—नाहीं !

कार्सनः—मी फिरून तें विचारतों.

टिळकः—मी फिरून नाहीं म्हणतों.

कार्सनः—रँडसाहेबांनीं बाईंच्या लोकांना अन्यायानें शिक्षा केली काय ?

टिळकः—होय.

कार्सनः—आणि हेंच ते रहस्य असें तुम्हीं पुण्याच्या लोकांना सांगितलेंत!

टिळकः—खरें सांगायला चोरी कसली!

*पुढील संवादांतहि टिळकांचा निर्भयपणा प्रतिबिंबित झाला आहे :*

कार्सनः—तुमच्या असल्या भाषणानें कोणास चिथावणी मिळणारी नव्हती काय? समजा, तुमच्या मनांत रँडसाहेबाचा खून व्हावा असें आहे, तर तसें घडून यावयाला तुम्ही कसें लिहाल?

टिळकः—तसेंच मनांत येईल तेव्हां सुचेल तसें लिहीन। पण, लिहिलें तेव्हां कांहीं मनांत नव्हतें खास!

*स्वदेशीचे मत व तें न पाळण्याबद्दलचें प्रायश्चित्त यांसंबंधीं प्रश्नोत्तरें होत असतांना उडालेला पुढील खटकाहि सुंदर आहे :*

कार्सनः—तुम्हीं स्वतः स्वदेशी मत घेतलें होतें काय?

टिळकः—होतें.

कार्सनः—तुम्हीं विलायतेंत साखर खाल्ली तर हा तुमचा स्वदेश मुद्याची शिक्षा ईश्वर तुम्हांला करील, असें तुम्हांला वाटतें काय?

टिळकः—हें विचारण्यांत तुम्ही फारच वाहवत चाललां आहांत.

*नाशिक-कटाच्या खटल्यांत शिक्षा झालेल्या लोकांचे टिळक पुरस्कर्ते व पाठिराखे आहेत असें सुचविण्यासाठीं कार्सनसाहेबांनीं प्रश्न विचारण्यास प्रारंभ केला; तेव्हां प्रश्नोत्तराची पुढील पेर झडली :*

कार्सनः—ए. भट यांना नाशिकच्या खटल्यांत शिक्षा झाली असतां तुम्हीं त्यांना केसरी-कचेरींत ठेविलें काय!

टिळक—होय! मी त्यांना कचेरींतील कांहीं काम दिलें होतें.

कार्सन—ते तुमच्या नोकरींत अजून आहेत काय?

टिळक—मी इकडे येईपर्यंत तरी होते.

कार्सन—असें यथेच्छ कां सांगतां? लाजतां कां?

टिळक—राजद्रोहाची शिक्षा झालेले लोक तुमच्या पार्लमेंटातहि असतात. लाजण्याचें मला हो काय कारण!

*या खटल्यांत पुढें चिरोलतर्फे अनेक इंग्रजाच्या साक्षी झाल्या. कार्सन साहेबांनीं ज्यूरीवर छाप पाडण्यासाठीं केसरी व मराठा पत्रांतील टिळकांच्या लेखांचे उतारे वाचून दाखविण्याला सुरुवात केली. एक उतारा वाचावा.*

निमुळत्या आवाजांत 'हा राजद्रोह नव्हे काय?' असें कार्सनसाहेबांनीं म्हणावें, 'नाहीं! ही कायदेशीर टीका आहे' असें टिळकांनीं त्याना अडवून सांगावें, असा क्रम सुरू झाला. शेवटीं कार्सनसाहेबांच्या रागाचा पारा बराच चढला आणि त्यांनीं खड्या आवाजांत विचारलें, 'तर मग आपण कोणत्या भाषेला राजद्रोह असें समजतां?' टिळकांनीं अगदीं धीमेपणानें उत्तर दिलें, " आपण आयरिश होमरूलवर दिलेल्या व्याख्यानांतील अवतरणांना." हें उत्तर ऐकून कार्सनसाहेब देंकळासारखे विरघळले! सर जॉन सायमन ह्यांनीं या खटल्यापुरेशी टिळकांची वकिली पत्करली असली तरी ते काहीं टिळकांशीं समरस होऊन वागत नव्हते. असें असूनहि, टिळकांचें हें उत्तर ऐकून सायमनसाहेब प्रसन्न झाले! दि. २१-२ रोजीं न्या. मू. डार्लिंग यांनीं आपलें समारोपाचें भाषण संपविल्यावर, ज्यूरींतील लोक पांच वाजून पन्नास मिनिटांनीं आपला निर्णय ठरविण्यासाठीं कोर्टांतून उठले. निर्णय ठरविण्याला या सज्जनांना फारसा वेळ लागला नाहीं. २७ मिनिटांनीं ते परत आपल्या जागेवर येऊन बसले. ज्यूरीचा निकाल एकमतानें प्रतिवादीला अनुकूल असल्याचें सिद्ध झालें. 'कोर्टानें चिरोलसाहेबाचा खर्चहि टिळकाकडून देववावा' अशी कार्सनसाहेबांनीं विनंति केली आणि डार्लिंगसाहेबांनीं ती मान्य केली!

टिळकांना या खटल्यांत ठोकर बसल्यामुळें, बॅप्टिस्टा, दादासाहेब करंदीकर वगैरे मित्रमंडळी हताश झाली. खटल्याच्या निकालाची तार हिंदुस्थानांत पोंचली तेव्हां टिळकांच्या सर्व आप्तस्वकीयांचीं व हितचिंतकांचीं मनें उद्विग्न झालीं. टिळकांनाहि क्षणैक वाईट वाटलें—पण, जणुं काहीं झालेंच नाहीं अशा पद्धतीनें त्यांनीं दुसऱ्याच दिवसापासून आपल्या इतर उद्योगांना सुरवात केली. या निकालाविरुद्ध अपील करावें कीं काय, अशी चर्चा कांहीं दिवस चालली. पण, टिळकांनीं शेवटीं हा विचार आपल्या मनांतून काढून टाकला. या निकालामुळें आपल्या निकटवर्ती लोकांनीं विव्हळ होऊं नये हें सांगतांना टिळकांनीं दि. ३४-१९ च्या पत्रांत पुढील वाक्यें* लिहिलीं : चिरोलकेस आपल्यावर उलटली; तथापि इतक्यांतच येथून हलण्याचा माझा विचार नाहीं.

* केळकरकृत टिळकचरित्र : उत्तरार्ध, खं. ३ : भा. ५ : पृ. ३२.

माझ्या प्रकृतीबद्दल कांहीं काळजी करू नका. यापेक्षां किती तरी वाईट दिवस आम्हीं पाहिले आहेत आणि त्यांचा जर माझ्यावर परिणाम झाला असता तर, आज आहे असा मी राहिलोंच नसतों.

खटल्याच्या निकालामुळें टिळकांच्या डोक्यावर जो खर्चाचा बोजा बसला त्याची खंत टिळकांना फिकीर वाटत नसली तरी, त्यांच्या सहकाऱ्यांना त्याबद्दल स्वाभाविकपणेंच चिंता वाटू लागली. त्यामुळें, एकंदर खर्चाची अंदाजी रक्कम किती होईल हें मनाशीं ठरवून, या मंडळींनीं अडीचतीन लक्ष रुपयांचा निधि गोळा करण्याला सुरवात केली. या खटल्याला सार्वजनिक स्वरूप नसल्यामुळें, लोकांचा पैसा घेऊन खर्चाच्या जबाबदारींतून मुक्त होणें प्रशस्त नाहीं असें टिळकांचें मत होतें. 'हा निधि गोळा करण्याचें काम बंद ठेवा' असें टिळकांनीं आपल्या सहकाऱ्यांना पुढें वारंवार बजाविलें. पण, या बाबतींत टिळकांचा आग्रह चालू देण्याची कोणाचीच तयारी नव्हती. निधि गोळा करण्याचें काम जोरात सुरू राहिलें आणि निकाल झाल्यापासून सहा महिन्यांच्या अवधींत अडीच लक्ष रुपयांची रक्कम जमली.

इकडे टिळक चिरोलकेसच्या कामांत गढून गेले होते त्या वेळींच हिंदुस्थानांतील राजकीय वातावरण तापत चाललें होतें. यापूर्वीच्या दहाबारा वर्षांत ज्या क्रांतिकारक चळवळी हिंदुस्थानात झाल्या होत्या त्यांचा पुरा बीमोड व्हावा, अशी सरकारची इच्छा होती. रौलेटसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं या पूर्वीच एक समिति नेमण्यात आली होती. १९१८ च्या जुलैमध्यें या समितीनें आपल्या सूचना सरकारपुढें मांडल्या होत्या. या सूचनांना कायद्याचें स्वरूप देण्याचा हिंदुस्थान सरकारचा विचार आहे, ही गोष्ट १९१९ च्या आरंभींच बाहेर आली. हळूहळू या कायद्यांचें स्वरूप लोकांना कळलें. लढाई संपून आल्यावर कांहीं तरी राजकीय अधिकार मिळणार अशा आशेवर तरंगत असलेल्या लोकांच्या दृष्टीसमोर, प्रत्येक प्रकारच्या स्वातंत्र्यावर घाला घालणारे हे कायदे नाचूं लागल्यामुळें, हिंदुस्थानांतलें लोकमत दिवसेंदिवस बिथरत गेलें. दिल्लीच्या विधिमंडळांतील लोकप्रतिनिधींच्या मताची काडीचीहि पर्वा न करतां हे काळे कायदे अमलांत येणार असें ठरल्यामुळें, त्यांचा प्रतिकार कसा करावा यासंबंधींच्या विचारांना चालना मिळाली. या कामीं 'सत्याग्रह' करावयाचें ठरवून गांधीजी सत्याग्रहाच्या शपथपत्रिकेवर लोकांच्या सह्या घेऊ

लागले. गांधीजींची सत्याग्रह-कल्पना व महाराष्ट्रांतील टिळकपंथीयांची मनो-रचना यांत असलेला विरोध या वेळेपासूनच स्पष्ट होऊं लागला. दि. १४-३-१९ रोजीं डॉ. मुंजे, चिंतामणराव वैद्य व रामभाऊ मंडलीक हे गांधीजींना मुंबईस भेटले. गांधीजींनीं पुढारी मंडळींची सभा बोलवावी, असें वैद्य यांनीं सुचविलें. 'सत्याग्रहाच्या शपथपत्रिकेवर सह्या करणाऱ्या लोकांव्यतिरिक्त इतरांच्या सभा आपण बोलावणार नाहीं' असें गांधीजी म्हणाले. 'जो रागवल्याचें यत्किं-चितहि चिन्ह दाखवितो तो खरा सत्याग्रहधर्मी नव्हे' असें विवरण गांधीजींनीं केल्यावर वैद्य म्हणाले, 'तर मग आम्हांला प्रतिज्ञापत्रिकेवर सही करणें कठीण आहे.' 'सत्याग्रह हें कांहीं तरी अभिनव शस्त्र आणि शास्त्र आहे असें म्हणणाऱ्या गांधीजींना याच वर्षाच्या मे महिन्यांत प्रा. शि. म. परांजपे यांनीं पुढील शब्दांत* उत्तर दिलें : "टिळक हे सत्याग्रही आहेत म्हणूनच त्यांनीं हा (चिरोलवरील) खटला विलायतेपर्यंत नेला. सत्याचा आग्रह गेल्या एप्रिलांतच सुरू झाला असें नाहीं, तो फार पुरातन काळापासूनचा आहे."

गांधींचा सत्याग्रह आणि टिळकांच्या अनुयायांचा राजकारणी मार्ग यांमध्यें असे कित्येक भेद असले तरी सरकारनें केलेल्या काळ्या कायद्यांचा निषेध व प्रतिकार करण्याच्या बाबतींत सर्वांचें एकमत होतें. रौलेट कायद्यांविरुद्ध खवळलेल्या लोकमताची व सरकारी सामर्थ्याची पहिली झटापट दिल्ली येथें दि. ३०-३ रोजीं झाली आणि या राजधानीच्या शहरांत गोळीबार होऊन निःशस्त्र प्रजेचें रक्त सांडलें! १३-४ रोजीं अमृतसर येथें जालियनवाला-बागेंत डायरनें निरपराध लोकांचें हत्याकांड केलें! क्षुब्ध लोकमत आणि तें ठेंचून टाकण्याची सरकारी अधिकाऱ्यांची लालसा यांच्या संघर्षामुळेंच हा संतापजनक प्रकार घडून आला!

चिरोल-केसमधून मोकळीक झाल्याबरोबर टिळक इंग्लंडांतील राजकारणी कामाकडे वळले.' मॉटेग्युसाहेबांच्या सुधारणेच्या योजनेंत इष्ट बदल घडवून आणणें शक्य आहे असें त्यांचें मत बनलें होतें. ही आपली विचारसरणी हिंदुस्थानांतल्या प्रमुख राजकीय पुढाऱ्यांना कळावी व पटावी म्हणून, चिरोल

* केळकरकृत टिळकचरित्र : उत्तरार्ध, खं. ३ : भा. ६ : पृ. १८.

केसचें काम संपल्याबरोबर दि. २७-२ रोजीं त्यानीं पॅ. बॅप्टिस्टा यांना हिंदुस्थानकडे रवाना केलें. 'अधिक मागितल्यानें थोडेंहि निसटतें' ही नेमस्त-धुरीणांची विचारसरणी बरोबर नाहीं, अशी टिळकांची या सुमारास खात्री पटलेली होती. दि. १३-३ रोजीं त्यांनीं लंडनहून जो अहवाल रवाना केला त्यांतील पुढील वाक्यांवरून* ही गोष्ट उघड होत आहे:

दिल्ली-कॉंग्रेसच्या ठरावांना धरून सर्व एकनुवानें बोललों तर चांगलें होईल. अधिक मागितल्यानें मुळांत आहे तेंहि मिळणार नाहीं ही भीति खरी नाहीं. लॉर्ड सिडेनहॅम यांचा उगीच बाऊ दाखवितात. पण, परवां लॉर्ड सिंह, बिकानेरचे महाराज व मॉंटेग्यु यांनीं त्याना झणझणीत उत्तर दिलें आहे.

दि. १३-३ रोजीं टिळकांनीं श्री. दादासाहेब करंदीकर यांचीहि हिंदुस्थानला रवानगी केली. चांगल्याचांगल्या मंडळींचीं चारपांच शिष्टमंडळें इंग्लंडला यावीं—अगदीं वरिष्ठ वर्गांतले लोक म्हणून रवींद्रनाथ टागोर, महमुदाबादचे राजेसाहेब अशा लोकांनीं यावें; वरिष्ठ विधिमंडळाचे सभासद म्हणून खापर्डे-मालवीय यांनीं यावें, सप्रू व इमाम यांची हककून प्रचारासाठीं बेसंट-बाईंनीं यावें; पार्लमेंटरी कमिटीपुढें साक्ष देण्याला आणि सुधारणाविषयक बिलात उपसूचना सुचविण्याला योग्य म्हणून पॅ. दास व पॅ. बॅप्टिस्टा यांनीं यावें अशी आपल्या कल्पनांची तपशीलवार फोड टिळकांनीं दि. ६।३।१९ रोजीं श्री. केळकर यांना पत्र धाडून केली. चिरोल-केसचें काम संपताच टिळक हळूहळू व्याख्यानें वगैरे देण्याच्या उद्योगाला लागले. नाहीं नाहीं म्हणतांना लंडनमध्येंहि त्यांच्या भोंवतीं कामाचा पसारा अफाट वाढूं लागला. कामाचा उरक पाडण्याच्या दृष्टीनें केळकर किती उपयुक्त आहेत हें टिळकांना उत्तम प्रकारें माहीत होतें; म्हणून, या पत्रांतच त्यांनीं 'तुम्हीं आलेंच पाहिजे' असें केळकरांना निक्षून लिहिलें.

मार्चच्या शेवटीं टिळकांनीं हळूहळू सभांतून भाषणें करण्यास प्रारंभ केला. मुख्य वक्ते म्हणून भूपेंद्रनाथ बसू यांनीं एका सभेंत सुधारणा बिलाला अनुकूल भाषण केलें, टिळकांनीं उपवक्ता म्हणून भाषण करून सुधारणा अपुऱ्या

* केळकरकृत टिळकचरित्र : उत्तरार्ध, खं. ३ : भा. ५, पृ २९.

† केळकरकृत टिळकचरित्र : उत्तरार्ध : ख. ३ : भा. ५ : पृ. २७.

आहेत, असें प्रतिपादिलें. दि. ७।४ ला टिळकांच्या एका भाषणानंतर लॅन्सबरी, वेजवुड, रुदरफोर्डप्रभृति मजूरपक्षीय वक्त्यांनीं भाषणें करून टिळकांच्या म्हणण्याला पुष्टि दिली. दिल्लीचा गोळीबार, जालियनवाला बागेंतील कत्तल इत्यादि प्रकारांच्या वार्ता इंग्लंडांत येऊन थडकतांच, इंग्लिश वृत्तपत्रें खडबडून जागीं झालीं हें टिळकांच्या लक्षांत आलें. न्यूझीलंडकडे निघालेल्या जॉन ॲटलीनें वाटेंत हिंदुस्थानांत उतरून होमरूलर मंडळींचा परिचय करून घ्यावा, याविषयीं टिळकांनीं खटपट केली. शांततापरिषदेच्या कामाच्या प्रसिद्ध होत असलेल्या वृत्तान्ताकडे टिळकांचें लक्ष होतेंच. शांततापरिषदेपुढें हिंदुस्थानचें म्हणणें उघडपणें मांडलें जातें का हें पहावें म्हणून त्यांनीं एक अर्ज तयार केला व 'इंडिया ऑफिस'नें तो परिषदेकडे धाडावा अशी त्यांनीं त्या ऑफिसला विनंति केली. पण, दि. २९।४ रोजीं या ऑफिसनें 'आम्हांला अर्ज तिकडे पाठवितां येत नाहीं, असें टिळकांना कळविलें.

दि. २३।५ रोजीं लंडन येथून टिळकांना लिहिलेलें एडगर वॅलेस यांचें एक पत्र प्रसिद्ध झालें आहे.* हे गृहस्थ फ्रान्समध्यें दोन आठवडे खूप काम करून लंडनला परत येतांच टिळकांना सर्व घडामोडी कळवितात, याचा अर्थ हा दिसतो कीं, शांतता परिषदेंत प्रामुख्यानें भाग घेणाऱ्या देशोदेशींच्या मुत्सद्यांच्या हातीं आपला अर्ज पडावा, म्हणून टिळकांनीं त्यांची मुद्दाम योजना केली होती. टिळकांच्या परिसमधील मित्रांनीं लॉइड जॉर्ज यांची भेट घेतली, लॉइड जॉर्ज हे मॅंटेग्यु-योजनेला सर्वस्वी अनुकूल आहेत, अफगाणिस्थानांतल्या मानगडीमुळें ब्रिटिश मुत्सद्दी हिंदी जनतेचा अनुनय करण्याच्या वृत्तींत आहेत ही एडगर वॅलेस यांनीं मिळविलेली माहितीहि टिळकांना या पत्रामुळें उपलब्ध झाली.

एप्रिलच्या शेवटीं रस्त्यांत पडून टिळकांचा पाय मुरगळला व त्यामुळें, पूर्वी ठरल्याप्रमाणें त्यांना व्याख्यानें देतां येतात कीं नाहीं, अशी शंका वाटूं लागली. पण, लोकांचा अत्याग्रह व नामजोशी यांची तत्परता यांमुळें सर्व कार्यक्रम व्यवस्थेनें पार पडले. यासंबंधींचें टिळकांनीं स्वतःच केलेलें वर्णन † मासलेवाईक आहे :

---

* केळकरकृत टिळकचरित्र : उत्तरार्ध, खं. ३ : भा. ९, पृ. ३७.

† केळकरकृत टिळकचरित्र : उत्तरार्ध : खं. ३ : भा. ५ : पृ. ३६.

बाहेर जावयाचें असलें तर नामजोशी यांच्या खांद्यांवरून जाऊन टॅक्सींत बसतों आणि व्याख्यानाला जातों व एकदां खुर्चीवर बसलों की, माझें काम सुरू होतें; कारण, माझ्या पायाला इजा असली तरी माझी जीभ शाबूतच आहे.

३ मे रोजीं टिळकांचें ब्रिटन अँड इंडिया सोसायटींत भाषण झालें. सभेला खूप गर्दी होती. हिंदी लोकांपेक्षां इंग्रजच अधिक होते....सर विल्यम व्ह्यूक यांनीं पांच-सहा दिवसांपूर्वी याच जागीं व्याख्यान दिलें होतें; त्याला उत्तर म्हणून टिळकांचें भाषण झालें. एका बाजूला पाय तक्रार करीत असतांनाच, टिळकांनीं मे महिन्यांत अनेक ठिकाणीं व्याख्यानें दिलीं. दि. १२ मे रोजीं झालेलें टिळकांचें भाषण ऐकणाऱ्या सिम्सन नांवाच्या बाईंना' हें व्याख्यान किती व कां आवडलें हें स्पष्ट करणारा बाईंच्या पत्रांतला पुढील उतारा* वाचनीय आहे :

...कालचें तुमचें भाषण फारच चांगलें झालें, असें मला वाटतें. इतरांच्या ठिकाणीं जी मर्यादा रहात नाहीं ती तुमच्या भाषणांत राहिली, हाच त्याचा विशेष होय. चळवळ करितांना मनुष्याच्या मनात व्यक्तिशः कांहीं कांहीं विकार प्रबळ नसावेत आणि तसें तुमचें मन विकारवश नाहीं, असें दिसून आलें. कदाचित् तुम्ही ब्राह्मण म्हणून हा गुण तुमच्या अंगीं आनुवंशिक व स्वाभाविकच असेल! तुम्हांला इतकें दुःख भोगावें लागलें असतां, त्याच्या प्रतिकाराची छटा तुमच्या भाषणांत आली नाहीं. तुम्ही दूरदर्शी आहां, हेंहि दिसून आलें.

मे महिन्याच्या उत्तरार्धांत केळकर, विठ्ठलभाई पटेलप्रभृति शिष्टमंडळांतले गृहस्थ लंडनला पोंचले. त्यापूर्वी टिळकांनीं कार्याचा व्याप इतका वाढविला होता. एलिझाबेथ आर्नोल्ड ही आंग्लविदुषी व टिळक यांचा पत्रव्यवहार फेब्रुवारीपासूनच सुरू झालेला होता. या बाई हिंदु संस्कृतीच्या अभिमानी असल्यामुळें, टिळकांची व त्यांची भेट होतांच त्या टिळकांना आपले 'वैदिक गुरु' मानूं लागल्या. या बाई हिंदु संस्कृतीशीं किती समरस

* केळकरकृत टिळकचरित्र : उत्तरार्ध, खं. ३ : भा. ५ : पृ. ३५-३६.

झाल्या होत्या नि टिळकाविषयीं त्यांना किती गाढ आदर वाटत होता हें त्यांच्या दि. २४।५ च्या पत्रांतल्या पुढील उताऱ्यावरून* स्पष्ट होत आहे :

आपला पाय दुखावला असें ऐकलें. 'धर्माबरोबर कर्म' उभें राहिलें, असें मी म्हणतें. आपलें तत्त्वविवेचक संभाषण ऐकिलें म्हणजे पहिला पर्जन्य पडल्यानें पृथ्वीला वरें वाटतें, तसें माझ्या मनाला वाटेल.

तुर्कस्थानच्या फाळणीबद्दलचें मत व्यक्त करण्यासाठीं मे महिन्याच्या शेवटीं लंडन येथें मुसलमानांची एक सभा झाली; तिला टिळक गेले होते; बोलले मात्र नाहींत. मे महिन्याच्या शेवटीं मॅंटेग्युसाहेबांनीं इंग्लंडात आलेल्या भिन्नभिन्न शिष्टमंडळांच्या लोकांना एकत्र जेवण दिलें. बेझंटबाईंनीं याच सुमारास टिळक, केळकरप्रभृति मंडळींना चहाला बोलाविलें. मे अखेरीस टिळक व केळकर केंब्रिजला गेले. दि. ४।६ ला तेथील हिंदी मजलीसतर्फे बोलावण्यांत आलेल्या सभेंत टिळकांचें हिंदी विद्यार्थ्यांना उद्देशून भाषण झालें. या प्रसंगीं टिळकांनीं समोरच्या विद्यार्थ्यांना पुढील स्पष्ट सवाल† विचारला :

उच्च प्रतीचें शिक्षण मिळवून व स्वतंत्रतेच्या हवेंत पिकणारे विचार बरोबर घेऊन तुम्ही हिंदुस्थानांत जाणार. पण केवळ स्वार्थसाधनपर न बनतां देशकार्याला वाहून घ्यावयाचें असा निश्चय तुम्हांपैकीं कितीजणांनीं केला आहे?

जूनच्या आरंभींच हिंदी सुधारणांचें बिल पार्लमेंटपुढें ठेवण्यांत आलें. दि. ५।६ रोजीं हाउस ऑफ कॉमन्समध्यें त्याचें दुसरें वाचन झालें. या महिन्याच्या शेवटीं हाउस ऑफ लॉर्ड्समध्यें बिलाची चर्चा होऊन लॉर्ड कर्झन यांनीं सुचविलेल्या सिलेक्ट कमिटीकडे बिल पाठविण्यांत आलें. सुधारणांच्या मूळ अहवालांत प्रांतिक कारभारांतल्या दिवाणांना जी जबाबदारी देण्यात आली होती ती हाउस ऑफ कॉमन्समधील चर्चेंतच छाटली गेली होती. यामुळें अखेरीस शिल्लक काय उरणार अशी विवंचना वाटूं लागली होती. लॅन्सबरी-वेजवुडप्रभृतींनीं शिष्टमंडळांतल्या प्रमुखांना एकत्र बोलावून सर्वांचें एकमत करण्याची खटपट केली. या विषयाची चर्चा करण्यासाठीं टिळक व बिझांट-

---

* केळकरकृत टिळकचरित्र : उत्तरार्ध, खं. ३ : भा. ५ : पृ. ३७–३८.

† केळकरकृत टिळकचरित्र : उत्तरार्ध, खं. ३ : भा. ५ : पृ. ४०.

बाई यांनी पृथक् भेटहि घेतली. पण एकमत होणे अशक्य ठरले! तिकडे तहाच्या वाटाघाटी चालू होत्या नि त्यावेळीस जर्मनी तहावर सही करील की नाही, याविषयी शंका वाटत होती. जर्मनीने शेवटी स्वाक्षरी केल्यानंतर, याहि दिशेने इंग्लंडला निर्धास्तपणा वाटू लागला.

ब्रिटिश काँग्रेस कमिटीचे लोक आळंगुळेपणा करीत होते व 'इंडिया'पत्राचे चालक हटवादीपणाने वागत होते. '[illegible]' या न्यायाने टिळकांनी या लोकांची नि विठ्ठलभाई पटेल यांची गाठ घालून दिली. पटेल साहेबांनी जुलच्या उत्तरार्धात ब्रि. कॉ. कमिटीच्या बैठकीत आपले आसन मांडले. हळूहळू त्यांचे लेख 'इंडिया'पत्रात प्रसिद्ध होऊ लागले. दि. ११ रोजी खापर्डे, दिवाण माधवराव, पटेल व केळकर यांनी मॉंटेग्यु साहेब, लॉर्ड सिंह, सर विल्यम ड्यूक व पॅटर्सन यांच्याशी सुधारणाविषयक चर्चा केली.

टिळक, केळकर व वसुकाका जोशी ही त्रिवर्ग मंडळी जुलच्या अखेरच्या सुमारास ऑक्सफर्डला जाऊन आली. येथील मुक्कामात टिळकांचे विद्यार्थ्यांसमोर 'विद्यार्थ्यांचा भावी कार्यक्रम' या विषयावर व्याख्यान झाले. ध्येयाची कोरडी चर्चा करून कालापव्यय करीत बसण्यापेक्षा, तरुणांनी आपल्या मतें योग्य वाटेल ते ध्येय पसंत करावे, आणि मग, त्या ध्येयाकरिता स्वतःस जन्मभर वाहून घेऊन, कोणत्याहि उद्योगाचे फळ दैवाधीन असा निश्चय करून विद्यापीठांतून बाहेर पडावें, असा उपदेश टिळकांनी या ठिकाणच्या विद्यार्थ्यांना केला.

कमिटीनें हिंदी शिष्टमंडळांतल्या लोकांच्या साक्षी घेण्याचें काम जुलै महिन्यांत सुरू केलें. कमिटीच्या प्रश्नांचीं उत्तरें तयार करून तीं पाठविणें आणि या प्रश्नोत्तरांचा सांगोपांग विचार करणें हेंच काम या महिन्यांत विशेष महत्त्वाचें ठरलें. हिंदी स्वराज्यसंघातर्फे स्वतः टिळकांनींच साक्ष द्यावी असें ठरून, त्यांनीं जुलै महिन्याच्या उत्तरार्धांत कमिटीच्या प्रश्नांचीं लेखी उत्तरें पाठवून दिलीं.

ब्रिटिश कॉंग्रेस कमिटी नियमबद्ध होऊन तिनें व तिच्यामार्फत चालणाऱ्या 'इंडिया' पत्रानें कॉंग्रेसच्या धोरणाचा प्रचार नि पुरस्कार करावा यासाठीं टिळकांनीं यापूर्वीं ५।६ महिने जी खटपट सुरू ठेविली होती नि ज्या वाटाघाटी चालविल्या होत्या त्यांना या महिन्यांतच दृश्य फल आलें. 'इंडिया'पत्राचे पूर्वींचे संपादक मि. पोलक यांनीं पुष्कळ कुरकूर केली; पण, शेवटीं त्यांना पत्राशीं असलेला संबंध सोडावा लागला. श्री. केळकर नि मिस् नॉर्मंटन यांच्या संपादकत्वाखालीं 'इंडिया'पत्र निघूं लागलें आणि त्यांतून कॉंग्रेसचें म्हणणें अधिकृत रीतीनें मांडलें जाऊं लागलें.

दि. २९।७ रोजीं मॉंटेग्युसाहेब व टिळक यांची इंडिया ऑफिसमध्यें सुमारें अर्धा तास महत्त्वाची चर्चा झाली. पंजाबांतील स्थिति, सुधारणांचें बिल, कॉंग्रेसच्या मागण्या इत्यादि मुद्द्यांसंबंधीं टिळकांचे विचार मॉंटेग्युसाहेबांनीं या भेटींत समजावून घेतले. याच दिवशीं कॅक्स्टन हॉलमधील सभेंत टिळकांचें भाषण झालें. या दिवशीं संध्याकाळीं मजूरपक्षाच्या पार्लमेंटरी सभासदांची सभा झाली; तिच्यांतहि टिळकांचें भाषण झालें. आपलें पहिलें बिऱ्हाड सोडून टिळक या महिन्यांत टॅलबट रोडवर दीपचंद जव्हेरी यांचे घरीं राहावयास गेले. केसरी-मराठा पत्रांसाठीं नवें यंत्र खरेदी करण्याचा विचार ठरवून या महिन्यांत टिळकांनीं यंत्रांविषयींची चौकशी सुरू केली होती.

दि. ६ ऑगस्ट रोजीं सकाळीं टिळकांची हिंदी स्वराज्यसंघातर्फे सुधारणाविषयक प्रश्नांवर साक्ष झाली. टिळकांची साक्ष घेऊंच नये असें म्हणणारे गण साक्षी घेणाऱ्या समितींत बरेच होते; पण, त्यांचा उपाय हरला म्हणूनच टिळकांना साक्षीसाठीं बोलावण्यांत आलें. आगाऊ पाठविलेल्या उत्तरांच्या स्पष्टीकरणार्थ कांहीं सांगावयाचें असेल तर सांगा असें सुचविण्यांत आल्यावर, टिळकांनीं मुद्देसूदपणानें कॉंग्रेसची स्वराज्यविषयक भूमिका समितीला समजा-

खूप सांगितली. टिळकांच्या साक्षीच्या वेळीं सिडनहॅमसाहेब अध्यक्ष झाले होते। इतक्या महत्त्वाच्या साक्षीदाराची उलटतपासणी चांगली करून होईल अशी लोकांची अपेक्षा होती; पण, टिळकांच्या उलटतपासणीला काट लावून समितीनें स्वतःचेंच हंसें करून घेतलें।

ऑगस्टच्या पूर्वार्धांतच टिळक व मॉंटेग्युसाहेब यांची दुसरी मुलाखत झाली. पंजाबांत चालू असलेल्या दडपशाही व जुलमी कायद्यासंबंधींची बरीच चर्चा या भेटींत झाली असावी, असें दिसतें. पंजाब प्रकरणांत ज्यांना त्रास झाला त्यांना सार्वत्रिक माफी देण्यांत यावी, असा आग्रह टिळकांनी या वेळीं धरला. मॉंटेग्युसारख्याशीं वैयक्तिक भेटीचा योग आला की इतर पुष्कळसे लोक स्वतःसाठीं किंवा स्वकीयांसाठीं कांहीं तरी मागत असत. टिळकांना असें कांहींहि मागावयाचें नव्हतें. व्यक्तिस्वार्थाच्या दृष्टीनें टिळक सर्वस्वी निरपेक्ष असल्यामुळेंच त्यांना पदोपदीं देशाशीं बोलतांना सार्वजनिक प्रश्नांच्या बाबतींत आग्रह धरतां येत असे. मॉंटेग्युसारख्या माणसावर टिळकांच्या या निःस्वार्थीपणाची छाप कशी पडली असेल हें एका ब्रिटिश मंत्र्याच्या तोंडच्या पुढील उद्गारांवरून* कोणाच्याहि ध्यानांत येईल :

**There is only one Indian whom we cannot win over by any sort of influence or inducement and that is Mr. Tilak; all others we can influence, more or less.** (कोणत्याहि प्रकारचें वजन पडल्यामुळें अगर कसल्याहि आमिषामुळें आम्हांला वश न होणारा असा एकटा एकच हिंदी गृहस्थ आहे. तो म्हणजे टिळक। या ना त्या प्रमाणांत इतरांना आम्ही वळवूं शकतो.)

अमेरिकेंत असलेले लाला लजपतराय व डॉ. हर्डीकर यांच्याशीं पत्रव्यवहार सुरू करून टिळकांनीं यापूर्वीच तिकडेहि हिंदी चळवळ चालावी अशी योजना केली होती. त्याप्रमाणें, अमेरिकेंतहि इंडियन होमरूल लीगची शाखा प्रस्थापित झाली होती. या शाखेनें ऑगस्ट महिन्यांत हिंदुस्थानला स्वयंनिर्णयाचा अधिकार मिळण्याबद्दलची मागणी अमेरिकन कॉंग्रेसच्या परराष्ट्रीय

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ९.

कमिटीपुढें ठेविली. टिळकांनी शांततापरिषदेकडे धाडलेल्या अर्जाच्या धर्तीवर एक अर्ज तयार करून लालाजींनी तो वरील कमिटीपुढें मांडला.

सप्टेंबरच्या प्रारंभीं लंडन येथें रॉयल एशियाटिक सोसायटीच्या इमारतींत प्राच्यविद्या परिषदेची बैठक झाली. वेळांत वेळ काढून टिळक प्रेक्षक म्हणून या परिषदेला गेले. या सुमारास एसेक्स हॉलमध्यें झालेल्या एका सभेंत चमनलाल, सकलातवाला वगैरे मंडळींनीं आपल्या भाषणांनीं टिळकांना मवाळ ठरविण्याचा प्रयत्न केला ! पंजाब-प्रकरणाचा निकाल समाधानकारक लागेपर्यंत सुधारणांवर बहिष्कार टाकावा अशी विचारसरणी या मंडळींकडून मांडण्यांत आली. लंडनमधील हिंदी रहिवासी बॅ. पारेख व दुबे यांनीं या विचारसरणीला विरोध केला. टिळकांनीं या तरुण मंडळींची विचारसरणी खोडून काढतांना जो कोटिक्रम केला त्याचा श्रोत्यांच्या मनावर फार परिणाम झाला. सभेच्या शेवटीं, टिळकांचीं चार शब्द बोलतां यावे म्हणून पुष्कळ मंडळी त्यांच्याभोंवतीं गोळा झाली. त्यांच्यापैकीं एकाला टिळक म्हणाले* : मला आतां विचारण्यांत आलेले प्रश्न येथील सभेंत विचारण्यापेक्षां हिंदुस्थानांत विचारण्यांत आले असते तर त्यांचीं उत्तरें देणें कसें बिकट होतें याची कल्पना तुम्हांस होणार नाहीं. राजकारणांत मी पडलों त्या वेळेस स्वराज्य हा शब्द तोंडावाटे नुसता उच्चारण्याची लोकांची ताकद नव्हती. अशा लोकांतर्फे होमरूलची मागणी करूं लागण्यास आम्हांस किती अडचणींतून दिवस काढावे लागले हें या तरुण पिढीला कसें कळणार ? .

सप्टेंबरच्या मध्याच्या सुमारास शिष्टमंडळांतले लोक गटागटानें इंग्लंडच्या भिन्नभिन्न भागांत दौऱ्यावर गेले. वेल्सकडे गेलेल्या गटांत दादासाहेब खापर्डे होते. टिळक या वेळीं स्कॉटलंडमध्यें गेले. ग्लासगो व एडिंबरो या दोन ठिकाणीं त्यांच्या व्याख्यानांचे वगैरे कार्यक्रम झाले. ग्लासगो शहरांत टिळकांचीं अनेक भाषणें झालीं. ट्रेड युनियन काँग्रेसमध्यें टिळकांचा झालेला सत्कार व सभेंत उद्गारण्यांत आलेले त्यांच्याविषयींचे गौरवपर शब्द या दोहोंचेंहि महत्त्व विशेष आहे. सभागृहांत टिळकांनीं प्रवेश केला त्याबरोबर हजारों प्रेक्षकांनीं उठून

* आठवणी व आख्यायिका : खं. २ : पृ. ५२९

# पर्व अठरावें : : : योगेश्वराचा तनुत्याग

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैना प्राप्य विमुह्यति ।
स्थित्वास्यामंतकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥

—श्रीमद्भगवद्गीता

टिळक मुंबईस येऊन पोंचले त्या दिवशीं नोव्हेंबर महिन्याची २७ तारीख होती. उतारवयात इंग्लंडला जाऊन हा झुंजार देशभक्त चौदा-पंधरा महिन्यांनी मायदेशाला परत येणार असल्यामुळे, सकाळपासून बोटीच्या धक्क्यावर लोकांची अलोट गर्दी झालेली होती. टिळकांचे पाय मुंबईच्या भूमीला प्रत्यक्ष लागले त्या वेळीं दुपार झाली होती. तरीहि, हजारों लोक त्यांच्या स्वागतासाठीं सिद्ध होते. मुंबईनें केलेला सत्कार स्वीकारून आणि आपण केलेल्या कार्याची माहिती मुंबईच्या जनतेला देऊन, टिळक दि. १।१२ रोजीं पुण्यास परत आले. त्यांच्या आगमनाच्या वेळीं स्वागत कसें करावयाचें आणि पुणे शहर-तर्फे त्यांचा सन्मान कसा करावयाचा इत्यादि गोष्टी एका जबाबदार मंडळानें आपल्या हातीं घेतल्या होत्या. सकाळीं ८ वाजतां टिळक पुण्याच्या स्टेशनवर उतरले. वाटेंतील सत्कार आणि पानसुपाऱ्या स्वीकारीतस्वीकारीत ते गायकवाड वाड्यांत पोंचले, तों ११ वाजून गेले होते. आजवर पुणें नगरपालिकेनें कोणाहि बिनसरकारी गृहस्थाला मानपत्र दिलें नव्हतें. या दिवशीं सायंकाळीं त्या वेळचे पुणें नगरपालिकेचे अध्यक्ष श्री. ल. ब. आपटे यांनीं रे मार्केटांत भरलेल्या सभेंत टिळक व केळकर यांना पहिलें मानपत्र देऊन, नगरपालिकेच्या इतिहासांत नवीन पायंडा पाडला !

सर्व शहरातर्फे टिळक व केळकर यांचा जाहीर सत्कार करावयाचा व त्यांना मानपत्र द्यावयाचें असें यापूर्वींच ठरविण्यांत आलें होतें. हा समारंभ दि. २ ला साजरा व्हावा, असीहि योजना ठरविण्यांत आली होती. पण, टिळकांना थोडी विश्रांति मिळालेली बरी असें वाटून, समारंभाच्या व्यवस्थापकांनीं थेरदी

दि. ७ हा दिवस नक्की ठरविला. लखनौ येथे सिद्ध झालेले नेमस्त व राष्ट्रीय पक्षांतील ऐक्य मध्यंतरींच्या काळांत बिघडलें असल्यामुळें आणि चाणाक्ष माणसांच्या कानाला सुधारलेल्या कौन्सिलांच्या निवडणुकीचा आवाज ऐकूं येऊं लागला असल्यामुळें, या सुमारास महाराष्ट्रांत नेमस्त पुढारी व स्वतःला ब्राह्मणेतरांचे पुढारी म्हणविणारे कित्येक लोक यांची अशुभ युति झाली होती. टिळकांना दिले जाणारें मानपत्र सगळ्या पुणें शहराचें समजलें जाऊं नये अशी मागणी या मंडळींच्या मार्फत करण्यांत येऊं लागली. खुद्द टिळकांच्या पक्षातल्या कांहीं मंडळींनीं 'टिळकांची मित्रमंडळी व त्यांचे चहाते याच्यातर्फे मानपत्र द्यावें' असें म्हणण्याला सुरवात केली होती. टिळकांना ही गोष्ट कळली तेव्हां ते खवळून उठले! त्यांना सत्काराची अगर मानपत्राची मोठीशी मातब्बरी वाटत होती असें नाहीं. पण ज्या पुणें शहरांत आपण उभा जन्म घालविला त्या पुणें शहराचीच एकमुखी मान्यता आपल्या कार्याला मिळणार नसेल तर बाहेर तरी ती मान्यता का मिळावी, हा प्रश्न त्यांच्या मनांत घोळूं लागला. मानपत्र व सत्कार सगळ्या शहरातर्फेच झाला पाहिजे असा त्यांनीं आग्रह धरला. मानपत्राला विरोध करूं इच्छिणाऱ्या मंडळींच्या प्रमुखांना त्यांनीं पूर्वसूचना दिली. सभेच्या ठिकाणीं आपल्यासाठीं स्वतंत्र जागा राखून ठेवण्यांत येईल आणि सभेंत आपल्याला आपलें म्हणणें मांडण्याला रीतसर अवसर मिळेल, असें या मंडळींना कळविण्यात आलें.

दि. ७-१२-१९ रोजीं संध्याकाळीं ४ वाजल्यापासून रे-मार्केटची मागची बाजू माणसांनीं फुलून गेली. मानपत्राला विरोध करणारे जे वीर उपस्थित होतील त्यांच्यासाठीं वेगळी जागा ठेवण्यांत आली होती. समुद्राप्रमाणे खवळणाऱ्या सुरतेच्या राष्ट्रीय सभेंत विरोधकाची भूमिका घेऊन आपण हिमतीनें उभे राहिलों; त्याप्रमाणेंच आजच्या या सभेंत विरोध करण्यासाठीं कोण झुंझार पुढें येतो हे टिळक उत्सुकतेनें पहात होते. सभेच्या कामाला सुरवात झाली. मानपत्र देण्याच्या सूचनेच्या विरोधकांनीं पुढें यावें म्हणून पाचारण, देण्यांत आलें. पण, विरोधाचे डंके वाजविणारे पराक्रमी लोक सभेंत आलेच नव्हते! त्यांनीं एका पूर्वास्पृष्ट मुलाला आपला प्रतिनिधि म्हणून पाठवून दिला होता. "आम्ही एक सहभोजन करणार आहों, तेथें येण्याचें टिळक कबूल करतील तर आमची मानपत्राला हरकत नाहीं," असें, मयतीत झालेला हा बया

कसें तरी म्हणाला! मानपत्राच्या सभेंत कमीपणा कोठेंच दिसला नाहीं; विरोधकांनीं मात्र स्वतःचें नांवी हसें करून घेतलें.

टिळक विलायतेहून परतून आले होते तरी लोक त्यांना स्वस्थ बसूं देण्याला तयार नव्हते. या महिन्याच्या शेवटीं त्यांना अमृतसर येथील कॉंग्रेसच्या अधिवेशनाला जावयाचें होतें. पण, मद्रासच्या मंडळींचें आग्रहाचें निमंत्रण आल्यामुळें ते तिकडेहि जाऊन आले. मद्रास येथें टिळकांचा मुक्काम दोन दिवस होता. सभा, सत्कार वगैरेंच्या गर्दीमुळें या दोन दिवसांत त्यांना घटकेचीहि फुरसत मिळाली नाहीं. तिकडून परत आल्यावर थोड्याच दिवसांनीं टिळक अमृतसरला जाण्यासाठीं निघाले. लखनौ-कॉंग्रेसच्या वेळीं टिळक व त्यांचे अनुयायी हे ज्याप्रमाणें मुंबईहून स्पेशल गाडीनें गेले होते त्याप्रमाणेंच याहि वेळीं ही मंडळी स्पेशल गाडीनें गेली. वाटेंतील स्वागताचा आणि सत्कार-समारंभाचा थाट पूर्वीपेक्षांहि जास्त वैभवशाली होता.

टिळक व त्यांच्याबरोबरची मंडळी अमृतसरच्या वाटेवर होती त्या वेळींच बादशहांचा जाहीरनामा प्रसिद्ध झाला. या जाहीरनाम्यांत बादशहांनीं दोन-चार महत्त्वाच्या गोष्टींचा निर्देश केला होता. 'नवीन राजकीय सुधारणांची सुरवात म्हणजे नव्या युगाचा प्रारंभ होय' असें त्यांनीं म्हटलें होतें. नवें युग सुरू होत आहे ही जाणीव हिंदुस्थानांतील नोकरशाही व हिंदी प्रजा या दोघांनीहि ठेवावी आणि झाल्यागेल्या गोष्टी विसरून सहकार्यानें वागावें, अशी बादशहांची इच्छा या जाहीरनाम्यांत प्रगट झाली होती. ज्यांना राजकीय गुन्ह्यांबद्दल शिक्षा झालेल्या आहेत अगर ज्यांना संशयावरून स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें आहे अशा लोकांची मुक्तता व्हॉइसरॉयसाहेबांनीं शक्य तितक्या औदार्यानें करावी, अशीहि सूचना या जाहीरनाम्यांत देण्यांत आलेली होती.

टिळकप्रभृति मंडळींच्या वाचनांत हा जाहीरनामा आला आणि त्याच्या अर्थाविषयीं मंडळींत खूप चर्चाहि झाली. ही चर्चा झाल्यावर टिळकांनीं बरोबरच्या सहकार्‍यांच्या संमतीनें बादशहांकडे आभारप्रदर्शक तार धाडली. आपल्या आदेशाप्रमाणें नोकरशाही वागेल तर हिंदी प्रजा तिच्याशीं सहकार्य करील हा अर्थ व्यक्त करण्याचा टिळकांचा मानस होता. टिळकांनीं धाडलेली तार प्रसिद्ध झाली. त्यामुळें अमृतसरला पोंचलेल्या बॅ. दासप्रभृति कित्येक

मंडळी टिळकांवर रुष्ट झाली. ही तार गंगापूर स्टेशनवरून करण्यांत आली होती. कै. अच्युतराव कोल्हटकर यांना टिळकांनीं ही तार घाईनें धाडली असें वाटलें; आणि त्यांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्यांनीं आपली नापसंती व्यक्त करण्यासाठीं 'गंगापूरघाई' हा शब्दप्रयोग बनविला!

पं. मोतिलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं झालेलें अमृतसर येथील कॉंग्रेसचें अधिवेशन अनेक दृष्टींनीं अपूर्व होतें. या अधिवेशनाच्या स्वागतसमितीच्या अध्यक्षस्थानीं हुतात्मा स्वामी श्रद्धानंदजी हे होते. यापूर्वींच्या एप्रिल महिन्यात जनरल डायरनें या ठिकाणीं जो मनुष्यसंहार केला होता त्याचा विचार या अधिवेशनांत व्हावयाचा होता. मनांतील संताप उसळत होता; पण, तो मर्यादेत कसा राखावा, हा या अधिवेशनापुढें प्रश्न होता. पं. मालवीय, गांधीजी असे सौम्य प्रकृतीचे धुरीण एका बाजूला आणि चित्तरंजन दास यांच्यासारखे लढाऊ वृत्तीचे लोक दुसऱ्या बाजूला—अशा भिन्न प्रकृतींच्या स्वकीयांना सभाळून, राष्ट्राला योग्य मार्ग दाखविण्याचें काम या ठिकाणीं व्हावयाचें होतें. सुधारणा-कायद्याच्या बाबतींत कोणतें धोरण स्वीकारावें, प्रसिद्ध झालेल्या बादशाही जाहिरनाम्याच्या बाबतींत कोणतें मत व्यक्त करावें, यासंबंधींची चर्चा या अधिवेशनांत खूप रंगली.

सहकार आणि असहकार या दोन परस्परविरोधी टोकांशीं जाऊन सभोंवतालचे राष्ट्रभक्त आपले विचार आवेशानें मांडीत होते आणि स्थितप्रज्ञ टिळक ही चर्चा बारकाईनें ऐकत होते. शेवटीं त्यांनीं या सर्व मतांतरांचा समन्वय 'प्रतियोगी सहकारिता' या शब्दयोजनेनें साधला. सहकारितेच्या धोरणांत प्रतिपक्षावर विश्वास व्यक्त होत असतो, तोहि टिळकांना संमत नव्हता. असहकाराच्या धोरणांत एक प्रकारचा त्रागा व रुसवा असतो; त्यामुळें हें धोरण प्रतिपक्षाला विरोधी आहे, असा भ्रम आपाततः उत्पन्न होतो. पण, त्रागा करून आणि रुसवा दाखवून प्रतिपक्षी वळेल, असें समजणाऱ्याच्या मनांत प्रतिपक्षी प्रेमळ आहे हीच भावना शेवटीं गूढ असते. राजकारणांतील प्रतिपक्षी प्रेमभावनेच्या आहारीं जाईल हें शक्य नसल्यामुळें, असहकारितेचा खेळ परिणामीं आत्मघातकीपणाचा व निष्फल होय, हें टिळक जाणून होते. म्हणून त्यांनीं निःशस्त्र झालेल्या राष्ट्राच्या प्रगतीचा एकच एक मार्ग—म्हणजे प्रतियोगी सहकारितेचा मार्ग—अमृतसर येथें राष्ट्रापुढें ठेविला. या शब्दप्रयोगाला त्यावेळ विपर्यासहि

बेबनाव झाला असल्याकारणानें, ही सुजाण मंडळीहि या विरोधकांच्या मेळाव्यांत सामील झाली. पण, विरोध जितका अधिक प्रखर तितकी टिळकांची हिंमतहि दुर्दम्य, हाच अनुभव या ठिकाणींहि आला.

विरोधी मंडळी विशेष काहीं करू शकत नाहींत हें जगजाहीर व्हावें म्हणून, टिळकांनी या वेळीं सालपुरास परिषदेच्या ठिकाणाबाहेर व्याख्यानांचें सत्र सुरू केलें. परिषदेच्या मंडपांत शिरून गडबड करावी या हेतूनें विरोधी मंडळींनी पुष्कळ धडपड केली. परिषदेचे अभिमानी आणि विरोधक यांच्या कित्येक झटापटीहि झाल्या. काहीं कार्यकर्त्यांना जखमा होण्यापर्यंत मो झग पटींची मजल गेली. आगामी निवडणुकींत मतदारांना कोणत्या उमेदवारांना मतें द्यावीं याविषयींच्या ठरावावर खूप बखेडा माजला. वक्त्यांची संख्या व सभेच्या कामाचा वेळ यांचा मेळ घालून, अध्यक्ष श्री. केळकर यांनी प्रत्येक वक्त्याला मोजूनमापून मिनिटें देण्यास सुरवात केली. पांच मिनिटांत आपलें सर्व म्हणणें सांगण्याच्या तयारीनें टिळक बोलूं लागले. घड्याळाच्या सेकंदासेकंदाकडे लक्ष ठेवणारे न्यायनिष्ठुर अध्यक्ष आणि टिळकांना बोलण्यास भरपूर वेळ मिळावा अशी अपेक्षा बाळगणारा श्रोतृवृंद, असा जोड या ठिकाणीं जमल्यामुळें, श्रोत्यांपैकीं कित्येकांना अध्यक्षांचें वर्तन रुचलें नाहीं. टिळकांनी मात्र नेमक्या ठरलेल्या वेळेंत आपलें सर्व म्हणणें स्पष्ट करून विरोधकांना उत्तर दिलें. केळकरांच्या न्यायनिष्ठुरपणाबद्दल कित्येकांनी टिळकांकडे कागाळी केली. अध्यक्षाची भूमिका ही न्यायाधिशाची भूमिका होय असें सांगून, टिळकांनी केळकरांच्या वर्तनाचें समर्थन केलें.

नव्या सुधारणा-कायद्यान्वयें होणाऱ्या निवडणुकींत आपल्या पक्षाचे उमेदवार उभे करावयाचे असें टिळकांनी यापूर्वीच ठरविलें होतें आणि जिल्ह्या-जिल्ह्यांतून कोणी कोठें उभें रहावें याविषयींचा विचारहि त्यांनी चालविला होता. मिळालेल्या सुधारणा असुऱ्या आहेत हें पांच वर्षांत सिद्ध करून, सुधारणांचा पुढला टप्पा लवकर गांठण्याची त्यांची या वेळीं महत्त्वाकांक्षा होती. आपला पक्ष कोणत्या तत्त्वावर निवडणुका लढविणार हें मतदारांना नीट समजावें म्हणून, टिळकांनी एप्रिल महिन्याच्या उत्तरार्धांत काँग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाचा जाहीरनामा प्रसिद्ध केला. टिळकांच्या राजकीय विचारसरणीचें सार या जाहीरनाम्यांत सांठलेलें आहे, असें म्हणावयाला हरकत नाहीं.

चिरोल-केसमध्यें टिळकांना अपयश आल्यामुळें त्यांच्यावर जी आर्थिक जबाबदारी येऊन कोसळली होती तिचा परिहार करण्यासाठीं टिळकांच्या अभिमान्यांनीं निधि जमविला होता व त्याची रक्कम तीन लक्ष रुपयांपर्यंत गोळा झाली होती हा निधि टिळकांना समारंभपूर्वक अर्पण करण्याचें काम अनेक कारणांमुळें राहून गेलें होतें. दि. २२ मे रोजीं पुणें येथें हा निधि टिळकांना अर्पण करण्याचा टोलेजंग समारंभ झाला. चिरोल-केसमुळें निर्माण झालेली आर्थिक जबाबदारी कोणत्या रीतीनें पार पाडावयाची हें टिळकांनीं आपल्या मनाशीं ठरविलें होतें. त्यांच्या अनुयायांनीं आपली कर्तव्यबुद्धि जागृत ठेविली व त्यामुळें टिळकांनीं मनाशीं ठरवून ठेविलेली ही रीत सहजच रद्द झाली. लोकांनीं पैसा देऊन आपल्याला ऋणमुक्त केलें हें पाहून टिळकांचें मन कृतज्ञतेनें भरून आलें. कृतज्ञतेची ही भावना व्यक्त करतांना टिळकांनीं या समारंभप्रसंगीं "हा निधि गोळा करून आपण मला विकत घेतलें आहे" असे उद्गार काढिले. पैसे मिळविण्यासाठीं वर्षामागून वर्ष मी प्रयत्नांत घालविणार होतों; तो त्रास न दवडितां आतां मला तुमच्या सेवेंतच राहिलें पाहिजे, हा टिळकांच्या म्हणण्याचा अर्थ होता. वस्तुतः निधि गोळा करणारांची व निधीला द्रव्य देणारांची अपेक्षा कांहींच नव्हती. पण, मनुष्य जातिवंत कृतज्ञतेनें युक्त असला म्हणजे त्याला अशा प्रसंगीं जें वाटणें स्वाभाविक आहे तेंच टिळकांनाहि या वेळीं वाटलें.

मंडालेहून आल्यापासूनच टिळक थकले होते. इंग्लंडहून परत आल्यानंतर त्यांनीं जीं भाषणें केलीं त्यांपैकीं बहुतेकांत अंतकाल जवळ आल्याची सूचना असे. टिळकांनीं आपल्या सांसारिक जबाबदाऱ्या बहुतांशीं पुऱ्या केल्या होत्या. त्यांच्या मुलींचीं लग्नें झालीं होतीं व त्या सुस्थितींत होत्या. त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव मुंबई येथें डॉक्टरीचा अभ्यास करीत होते. लवकर तरी लग्न करण्याची त्यांची इच्छा नव्हती. टिळकांचे दुसरे चिरंजीव श्री. श्रीधरपंत अर्थात् बापुराव हे या वेळीं 'न्यू पूना कॉलेज'मध्यें बी. ए. च्या वर्गांत होते. टिळकांनीं या वर्षाच्या उन्हाळ्यात त्यांचें लग्न करून टाकलें.

प्रत्यक्ष सांसारिक जबाबदारीप्रमाणेंच टिळकांनीं केसरी-संस्थेचीहि जबाबदारी एक प्रकारें पार पाडली होती. कोलंबोच्या मार्गें ते विलायतेस जाण्या-

साठीं निघाले त्या वेळीं, गडबडींत मा होईना, त्यांनीं मृत्युपत्र केलें होतें. केळकर खाडिलकरप्रभृति सहकाऱ्यांनीं यापुढें केसरी-मराठा पत्रांचें नित्याचें काम पहावें, मामुली राजकारण याच मंडळींच्या नेतृत्वाखालीं चालवें आणि आपली उर्वरित शक्ति व आपला उर्वरित काळ यांचा विनियोग वरिष्ठ प्रकारच्या राजकारणी उलाढालींकडे व्हावा, असे विचार या सुमारास टिळकांच्या मनांत घोळत होते. आपल्या राजकारणाच्या धवडग्यांत अनेक निष्ठावंत माणसांनीं अपेक्षेबाहेर स्वार्थत्याग केला, याची जाणीव टिळकांच्या मनांत या अवधींत तीव्रतेनें वसत होती. अशा त्यागी माणसांच्यासाठीं आपण कांहीं विशेष करूं शकलो नाहीं, या जाणिवेनें टिळक या सुमारास फार हळहळत असत.

यापूर्वी गांधींची व त्यांची ओळख चांगलीच झालेली होती.' गांधींच्या पोतडींतून बाहेर पडणाऱ्या सत्याग्रह, अहिंसाप्रेम, असहकार इत्यादि चिजांची पारख त्यांनीं केली होती. या सर्व गोष्टींचें महत्त्व राजकारणांत कोणत्या मर्यादेपर्यंत मानावयाचें याविषयींचा त्यांचा विचार स्थिर होता. गांधीजींनी यापूर्वी त्यांच्याशीं 'शठे सत्यम्' कीं 'शठे शाठ्यम' या मुद्द्यावर वाद केला होता व टिळकांनीं या वादांतली आपली भूमिका स्पष्ट शब्दांत सांगितली होती. या सुमारास सुरू झालेल्या खिलाफतीच्या चळवळीच्या वावटळींत हिंदी राजकारणाचा तोल सुटूं नये, असें त्यांना मनःपूर्वक वाटत होतें. खिलाफतीच्या सभेंत येऊन व्याख्यान द्या, अशी विनंति करण्यांत आली असतां "कॉंग्रेस-बाहेर राजकरणी प्रतिपादन करणार नाहीं" असें त्यांनीं तडकावून सांगितलें होतें. गांधीजींच्या ध्येयवादाबद्दल टिळकांना नेमकें काय वाटत होतें हे गांधीभक्त श्री. काकासाहेब कालेलकर यांनीं लिहिलेल्या पुढील* शब्दांतच वर्णन करणें श्रेयस्कर आहे.

समुद्रांत सफर करणारें जहाज ध्रुव ताऱ्याकडे लक्ष ठेवून चालत असतें; पण, तें कांहीं ध्रुव ताऱ्यावर जात नाहीं. ...धार्मिक ध्येय हवें तेवढें उच्च असो; पण, व्यवहारांत, व्यवहाराचें म्हणून निराळें ध्येय असलेंच पाहिजे. नुसतें धार्मिक ध्येय ठेवून जगांत चालवयाचें नाहीं. ध्रुवाकडे लक्ष असूं द्या; पण ध्रुवावर जातां यावयाचें नाहीं, हेंहि लक्षांत असूं द्या.

* आठवणी व आख्यायिका : खं. १ : भा. १ : पृ. १११.

ऑगस्ट महिन्यांत कलकत्ता मुक्कामीं होणाऱ्या कॉंग्रेसच्या जादा अधिवेशनाच्या अध्यक्षपदासाठीं टिळकांचें नांव सुचविलें जाऊं लागलें होतें. बेझवाडा येथें व्हावयाची स्पेशल कॉंग्रेस स्थलांतर करून कलकत्त्यास कां चालली हें टिळकांनीं ओळखलें होतें. असहकारितेचा कार्यक्रम संमत होण्याच्या दृष्टीनें बेझवाड्यापेक्षां कलकत्ता येथें मुसलमानांची मदत अधिक होईल हें ओळखणाऱ्या धोरणी लोकांनीं हें स्थलांतर घडवून आणलें असल्यामुळें, कलकत्ता येथील अधिवेशनांत काय काय कारवाया होतील याचें अचूक चित्र टिळकांनीं स्वतःच्या मनाशीं रेखाटलें होतें. पं. मालवीयजींनीं टिळकांच्या नांवाचा पुरस्कार चालविला. याचाहि अर्थ टिळकांनीं मनोमन ओळखला होता. अध्यक्ष होऊन आपले हातपाय जखडून घेण्यापेक्षां, अनिष्ट प्रवृत्तींना कसून विरोध करण्यासाठीं मोकळें रहाणेंच श्रेयस्कर, असें त्यांनीं ठरविलें होतें.

पण, कॉंग्रेसचा दिवस उजाडण्यापूर्वींच सगळा ग्रंथ आटोपला! जगन्नाथमहाराजांच्या दत्तक-प्रकरणांतल्या कांहीं कामानिमित्त टिळक दि. १२ जुलै रोजीं मुंबईस गेले. यापूर्वींच त्यांना थोडाथोडा ताप येत असे. दि. २० जुलै रोजींहि त्यांच्या अंगांत थोडा ताप होताच. अशा स्थितींतच ते दिवाण चमनलाल यांच्या आग्रहामुळें मोटारींतून हिंडावयास गेले. दुसऱ्या दिवसापासून त्यांचा ताप वाढला. ताप मलेरियाचा आहे अशा समजुतीनें पहिले पांचसहा दिवस उपचार चालले. पुढें मात्र न्यूमोनियाचीं लक्षणें दिसूं लागलीं. उत्तम उत्तम डॉक्टर मंडळी अहोरात्र उपायांच्याशीं कसून प्रयत्नांची पराकाष्ठा करीत होती. दि. ३१ पर्यंत नाडी क्षीण होती व मधूनमधून शुद्ध जात असे; तरीहि, थोडीफार आशा वाटत होती. त्या दिवशीं दुपारपासून मात्र सर्वांची आशा सुटली!

टिळक आजारी आहेत ही वार्ता सर्वत्र पसरल्यामुळें सर्व ठिकाणच्या लोकांचें लक्ष मुंबईंत केंद्रित झालें होतें. टिळकांच्या मृत्यूची वार्ता दि. १-८-२० रोजीं सकाळीं हिंदुस्थानभर पसरली! त्या वेळीं रावापासून रंकापर्यंत सर्वांना परमावधीचें दुःख झालें. कोल्हापूरचे छत्रपति हे राजकारणाच्या दृष्टीनें टिळकांचे विरोधक होते. टिळकांच्या मृत्यूची वार्ता त्यांना समजली त्या वेळीं ते शिकारीच्या उद्योगाकडे वळत होते. हे सर्व उद्योग तत्काळ थांबवून झाल्याप्रमाणें त्यांनींहि आपले सर्व व्यवहार तात्पुरते थांबविले!

# चित्रांची अनुक्रमणिका



# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४९ | २ | स्थित्यतर | स्थलातर |
| १९१ | १५ व १६ | जून | जुलै |
| २१७ | १६ | ८ जून १९०८ | ८ जून १९१४ |
| २७० | सेनेटची | (ओळीच्या सुरवातीस 'हा' हा शब्द गळला आहे). | हा |